# Selection No. 37

## *THE KARNATAK EXPEDITIONS OF MADHAVRAO I (1761–1772)*

This selection brings together a large number (over 200) of very useful papers, which mainly relate to Peshwa Madhavrao I's undertakings in the region usually called the Karnatak, extending from the river Krishna right south up to Madras and Tanjore and westward to Seringapatam and Bednore. It will be remembered that this region was mostly subdued by the Marathas under the glorious lead of this Peshwa's father, Balajirao. The papers relating to that subject have been published in a previous selection, No. 28. The unforeseen disaster of Panipat at the beginning of the year 1761 not only undid much of the success which the two previous Peshwas had achieved in their endeavours to establish Maratha supremacy throughout India, but indirectly helped the rise of Haidar Ali, who cleverly managed to suppress the Hindu Ruler of Mysore, and, immediately on receipt of the news that the Marathas had been humbled at Panipat, seized the opportunity to consolidate his strength so as to become a rival both of the Marathas and the British, who had been for some time casting longing eyes on that part of India.

The Marathas had not found time to establish a firm hold on their southern conquests, and the sudden rise of Haidar upset their previous calculations. Murarrao Ghorpade, who was the only prominent Maratha Jagirdar in the territory concerned, had established himself at Gooty to the south of the Tungabhadra and consequently had to bear the full brunt of Haidar's first crushing onslaughts. A few important news-letters included in this selection speak eloquently of the heroic stand that Murarrao made.

In order to follow carefully the contents of these papers the student will do well to remember the following main expeditions of the Peshwa into the south :—

(1) October 1763–June 1765.—The conquest of the region between the Krishna and the Tungabhadra.

(2) October 1766–June 1767.—Maratha penetration into the districts south of the Tungabhadra.

(3) October 1769–1770.—The same expedition continued to the south of the Tungabhadra and led to some stiff fighting.

(4) Up to June 1772.—The Peshwa was prevented by ill-health from being personally present in this last expedition, which consequently was carried to completion by his able generals Trimbakrao Pethe and Gopalrao Patwardhan.

It appears that Haidar, consummate general though he was, miscalculated the young Peshwa's ability and felt greatly relieved upon learning that he had been overtaken by the lingering and mortal disease which

श्री

श्रीमंत राजश्री दादा

स्वामीचे सेवेसी

सेवक जगंनाथ विसाजी कृतानेक नमस्कार विनंती. येथील क्षेम तागाईत छ २३ रमजान मुकाम मडकशिरें येथें आपलें प्रतापेंकडून स्वस्तिक्षेम असो विशेष. राजश्री मुरारराव घोरपडे ममलकतमदार यांनीं श्रीमंत राजश्री नानासाहेबास व आपणांस पत्रें लिहिलीं त्यांवरून सर्व भाव कळों येईल. राजश्री श्रीनिवासराऊ भानजीचा पु(त्र) कंदुकूरवाले यांनीं दगा करून मारिला व गुमनाइकर पाळेगार यांनीं हुलड मांडिली व घटमकर यांनीहि बहुत उपद्रव सरकारच्या ठानियासी उपद्रव केला, ते पत्र बजिनस रायास दाखऊन रायानी त्यास कुमक स्वार १०० व प्यादे हजार व जेजाला पंचवीस देविली व दारूगोळी, सरंजाम करून पाठविलें. पत्र येतांच दुसरे दिवशीं रवाना केले. आपणांस तो उभयेतां भगवंतराऊ व श्रीनिवास भानजींनी पत्रे लिहिलीं असतील. तीं पत्रें बजिनस तीर्थरूप याजकडे पाठविलीं. त्यांच्या नावें लिहिलीं. आपणहि मागोन घेऊन पाहावीं. सर्व इस्तार लिहिला. आपण तो देशाकडे जातात. इकडे पाळेगार यानीं लबाडी करावी आणि आपण तिकडे जावें. ठानियांतील लोक कैसे ठरतील? रुपयेयाची मिठी सोडून लोक यांस पोटास देऊन तूर्त दोन हजार फौज जागां जागां ठेवावी, कांहीं गाडदीहि ठेवावे. इकडे चहूकडून पाळेगार यांनीं हुलड मांडिली. तुम्हाकडे जोडी पाठविली, खुद्द तुमची सरकारची आली, तर हें काम कांहीं सरकारचें नाहीं ऐसें चित्तांत भासतें की काय? असो; नानाप्रकारें पेंचीं धरून निपिद्ध करून संबंध ठेवावा. येथें जे जासूद आहेत ते आजारी. येकास नारू जाहाला, येक रोगी आहे, येक दरबारीं पाहिजे. तुम्हास यैसे करणें होतें तर आम्हास बातमीस कशास पाठविलें? आमचे पोट न भरलें तर पोटात काव्या घालूं. परंतु तुमचा प्रकार तो कोन्हीकडून सुंटे पाडून उगेच पेचीं धरावें. असो; राजश्री भगवंतपंतीं व श्रीनिवास भानजी यांनीहि येथें जोडी पाठविली. त्यास रायानीहि उत्तर देऊन रवाना केले. राव तोहि प्रसंग संभाळून सरकारच्या ठानियास कस्त करून जागां जागां बंदोबस्त करवितात. या प्रकारें लिहिलें तर स्वामींनीं रागास न यावें. सेवक सर्व प्रकारें आडाणी आहे हे तों आपण जाणत असतां, आपण तुंगभद्रातीरीं राहोन इकडे पाळेगारांनीं धामधूम बेरव्यांनीं करावी, आपण उगेंच राहावें, हे आपणां उचित नाहीं. श्रीमंत नानासाहेबाकडील वर्तमान उत्तम प्रकारें राजश्री नागोजी श्रीनिवासराऊ यांनीं लिहिलें, रावहि संतोष जाहले, बरचेवर जो गृहस्त व राव याचा वाणदार

व सरकारचा जासूद याजबरावर बारीक मोठे वर्तमान लिहीत जातो. आपणास तो पावत असेल. परंतु आज्ञापत्र येत नाहीं. कंदकूरकर याचे पारपत्यास कोण्ही नामी सरदार पाठऊन बंदोबस्त व्हावा यैसे आहे. इतकियावर आपल्या मर्जीस जो मजकूर येईल तो करवा. श्रीनिवास मानजीनी पत्र लिहिलें कीं, आम्ही मुलें लेकरेंसहित अग्निसंवस्कार करून मरावें. जर आपणांस ठाणियाचीं अगत्ये असिलीं तर त्यास कुमक पाठवावी; नाहीं तर सोडून येतील. गुमनाडकराने पांच हजार प्यादे जमा करून नानाप्रकारें मुलकांत खराबी करावी. तुम्ही संनिध असतां हा प्रसंग न घडावा. त्यास ताकिदा पाठवाव्या. बरें. तुम्ही गेलिया सरदार दो महिन्या श्रीमंत दादासाहेबाकडून बंदोबस्तास यावया योग घडवावा. सांप्रत्यकाळी वर्तमान तो या प्रकारें आहे, आपल्यास मजकूर थोडा लिहिला. यापेक्षां नानासाहेबांस बारीक मोठें वर्तमान यथाप्रकारें लिहिले. सताजी नाईक म्हणतो कीं, दोन वरपें जाहालीं; कर्जदार जाहालों; घरास जातों. लग्न करून येईन म्हणतो. त्यास आज्ञा काय ते लिहिणे. येथे कोण नाईक व जासूद पाठवावयाचे असेल तरी पाठवावें. नाही तरी सोडून यावे. सेवेसी श्रुत होये हे विनंती.

¶*Jagannath Visaji requests Visaji Krishna to send a strong force to put down disorder created by the Palegars of Kundkur, Gumnad and other places.*

---

*No. 3*] [*2-2-1762?*

श्री

अपले बापूने चरणावरी मस्तक ठेऊन सिरसाष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना. तागायत छ १ साबानपावेतो मुकाम पुणे येथें वडिलांचे आसीर्वादेकरून सुखरूप असो विशेष. वडिलीं छ २४ रजबूचे आसीर्वादपत्र पाठविले ते पावलें. तेथें कितेक प्रकारांची आज्ञा होती, त्याचा मजकूर सर्व कचा लिहिला आहे. श्रुत होय तपसीलवार:

राजश्री बाबूराव बाबा यास पत्र दिल्हें. त्याणी दोनतीन वेळ वाचून पाहून चिटणिसाचे हवाला केले. निरुतर घ्यावयाविसीं दोन दिवस विनंती करीत होतों. जावसाल न होय. काल छ ४ साबानी प्रहर

राजश्री त्रिंबकराव मामा लस्करांत गेले, आद्याप पावलियाचे पत्र आलें नाहीं. त्यास पत्र वडिलीं लिहिलें आहे तें लस्करांत सरकारचे जासूद आथवा सांडणीस्वार जातील त्यास रुपया दोन रुपये देऊन पाठवितों. जावसाल

---

+ फडणीस.

रात्रीस विनंती केली तेसमई बोलिले कीं, आम्ही काय म्हणोन मजकूर त्यास ल्याहावा? तेव्हां मी बोलिलों कीं, स्वामींच्या चित्तास येईल तैसे लेहून देवावें. त्यानंतर बावाच बोलिले कीं, सुभा निघाला म्हणून हे त्यास काय ल्याहावे! तदनंतर मी विनंती केली कीं, सुभा निघाल्यास चिंता काय आहे? स्वामी पहिल्यापासून त्याजवर कृपा करीतच आहेत. तेहि स्वामींच्या पदरचेच आहेत. तेथें सुभ्याचा मजकूर काय? याहीपेक्षां विशेषाकारें सांगणार सर्व प्रकारें स्वामी समर्थ आहेत. याजवरून बावानी निरुतर केले की, ते समर्थच आहेत. इतके जाबसाल होतच आहेत तो राजश्री आपाजीपंत मजमदार सुरतकरहि आले. त्यांणीहि विनंती कितेक प्रकारे केली. त्याचा सारांष कीं, हा प्रकार लस्करांतच जाहाला. यास आमचा उपाय काय आहे म्हणोन बावानी निरुतर केले. तदोनर आपाजीपंत बोलिले कीं आपण त्यास घरोब्या

आलियावर इनाम द्यावे येणेप्रमाणें करार करून पाठविलों. निरुतर आलियावर सेवेसीं पाठवीन कलम १

राजश्री बापू सासवडींच आहेत. लस्करांत जावयाचा प्रकार दिसोन येत नाहीं. सासवडींच राहणार येैसे भासतें कलम १

श्रीमंतांचा मुकाम चिकोडीपर्लीकडे पांचसा कोसावरचा होता. उभयतां श्रीमंत तुंगभद्रातीरपर्यंत जाऊन कर्नाटक प्रांतें दबाव बसऊन खंडणी त्या प्रांतांत करावी, तुंगभद्रातीरापुढें न जावे, देसीं उभयतांनीहि यावे. येणेप्रमाणें तूर्त मजकूर दिसोन येतो. ठरतां ठरेल तो खरा. श्रीमंताजवळ तूर्त कारभार राजश्री बाबूजी नाईक व रामचंद्र गणेश व दिनकरपंत वगैरे शागीर्द मंडळी करीत आहेत. मामा गेलियावर मामानी करावा. येणेप्रमाणें.

[पुढील दोन बंद गहाळ.]

¶*The writer, one Bapu, gives news about Baburao Fadnis, Trimbakrao Mama, Sakharam Bapu and says that the Peshwa and Raghunathrao intend returning home after having gone up to the river Tungabhadra.*

---

*No. 4*] [*27-2-1762*

## श्री

राजश्रिया विराजित रामान्य राजश्री

नारोपंत नाना स्वामींचे सेवेसी

पो त्रिंबक भास्कर सा। नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम तागाईत छ २ माघ यथास्थित असो विशेष. आपणाकडील फार दिवस वर्तमान कळत नाहीं.

सविस्तर लेहून सतोपर्यात असावें. यानंतर इकडील वर्तमान श्रीमंत राजश्री दादासाहेब व रावसाहेब कर्णाटक प्रांतें अर्कटाकडे जातात आहेत. कोलापूर प्रांती खडणी घेतली. पुढेहि त्या प्रांतें पाचसात लाख (खं)डणी जाहाली. राजश्री बाबूजी नाईक दिवाणगिरीचा कारभार श्रीमंतापासी करितात व राजश्री बाबूराव फडर्णास पुण्यात कारभार करितात व त्रिंबकरावमामा बहुतावरून लस्करास गेले असतील, त्याणी कारभार करावा येसा करार आहे. मातुश्री गोपिकाबाई बहुतास आहेत. याप्रमाणे वर्तमान आहे. श्रीमंत बापू सासवडी आहेत. तूर्त लस्करास जावयाचा मार काहीं नाहीं. श्रीमंताची येक दोन पत्रे आली होती. येणे म्हणौन आली नव्हती, उगीच आली होती. तीर्थरूप रा हरिपंत काकाचा सांभाळ करीत जावें. आपल्या मामलतीचा मार तरी दोन महिन्यात पैका उगऊन घ्यावा. माहालाची आशा धरून पैका आजचा उद्या घ्यावा येसा प्रसंग नाहीं. जितकी उगवाउगव केली तीच उपयोगी आहे. बहुत काय लिहिणे, लोभ आसो दीजे, हे विनंती.

¶*Trimbak Bhaskar reports to Naro Shankar the movements of the Peshwa and Raghunathrao Dada in the Karnatak; the activities of other principal sirdars are also alluded to.*

---

*No 5]* *[March 1762*

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
बाबूराव राम स्वामी गोसावी यांसी

पो माधवराव बलाल प्रधान नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष. खासा स्वारी कितुर प्रांती आली. कितुरच्या ठाण्यास मोर्चे दिल्हे. ठाणे जेर होऊन देसाई रा गोपालराव गोविंद याचे मारफातीने भेटीस आला.. खंडणीहि मातबर जाली. पैक्याटक्याचा निर्गम मत्वरच होईल. या उपरी सोंधे बिदरूरच्या सरदेस जात असो. तेथील निर्ग(म) करून घेऊन हरपन्हली चित्रदुर्गाकडे जाऊन तेथील गुंता उरकून उपरांत खासा स्वारी होणार. सविस्तर तीर्थरूपास लिहिले आहे त्याजवरून कळेल. [पत्र येथवेच अपूर्ण लिहिलेले आहे.]

¶*The Peshwa writes to Baburao Ram that he subdued Kittur and is proceeding towards Sondha-Bednore.*

6301

No. 6] [1-3-1762

घडणी रु. नं. ९१२

## श्रीशंकर

यादी सरंजाम फौजेकरिता राजश्री बाबूराव सदासिव फौज ८००१ आठ हजार सरंजामी समजुती तयार राखावी, ज्या समई म्हटले त्या वेलेस तयारी राखावी. सर्व प्रकारे पेशव्याचे दौलतंची अंगेजिनी करावी. हिंदुस्थान वगैरे सोडऊन दौलत उभी करावी. याकरितां सर्व येकचित जाले. सन सलास सितैन मया व अलफ

९०००००० देसी सरजाम [ पुढे तपशील ]
९०००००० गुजराथेत महीकिनारियास
१०००००० मालव्यात.

२४०००००

येणे प्रा चोवीस लक्ष सरंजाम सन मजकुरी नेमून द्यावा.

छ ४ माहे साबान फाल्गुन मास सन इसन्ने सितैन मया व आलफ.

*¶Baburao Sadashiv is given an assignment of twenty-four lacs by the Peshwa in order to conciliate him and secure his co-operation in re-establishing the Peshwa's prestige in India lost by the reverse at Panipat.*

---

No. 7] [20-3-1762

पौ छ ८ रमजान

चैत्र शुा ११ मुा तुंगभद्रा.

## श्रीमंगलमूर्ति

*सेवेसी विसाजी बाबूराव विज्ञापना येसीजे.* राजश्री मुरारराव हिंदुराव घोरपडे ममलकतमदार यांहीं राजश्री सिवराव घोरपडे व खंडेराव घोरपडे यासमागमे दोनी अडीच हजार फौज छ २० सावानीं देऊन गुर्डाबिड्याहून सिलगडेस पाठविली. तथून तीन कोस बालापूर. त्यानी जमावसुदा बालापुरास दोनी कोसावर येऊन उभे राहतात. हैदरखान यानें मोरचे लावले असतां मोरचे कायम करून बंदोबस्ती करून तीनी हजार फौज, हजार बार तुरक स्वार, दोनिसे लाहानी तोफ घेऊन स्वार मात्र पुढे आले. तुरक स्वार काहीं व * व बान दोनी च्यारसें राऊत हैदरखान देखील घोडा पाहोन दवा धरून फौज तोंडावर देऊन दुतरफा * ज जालें. इतकियांत हैदरखान व तुरक स्वार * * घोरपडेचे फौजेस पोटी

\+ दिशेष पुरा झालेली.

गवसोन जूज जाले. छ २३ सावानी शनवारी दो प्रहरा जूज होताच हैदरखान याजला [ फाटले ] न जाले. हैदरखानाकडील लोक ठार जखमी जाले. हें वर्तमान साइकाळीं रायास कललिया रात्री जाली. छ २४ सावानी रविवारी येकादसी प्राथःकालींच स्वार होऊन वालापूरचे रोखे नाईकजी थोरात व मुकुंदराव वेंकट-गिरीकर किरकोळ लोक सेपनास घेऊन उदलकोंडा दो कोसावर तेथूनं सिलगटे पाच कोस तेथपावेतो जाऊन रानोजी देवकर थोराताकडील याजबरोवर पंचवीस राऊत देऊन पुढे सिलगटियास पाठविले. तेथें लोक जमा जालेले त्यास घेऊन सिवराव घोरपडे व आनखी जखमी परभारें पांच साहा कोस रायाचा मुा कोडींकोड तेथे पाठविले. इनसखान बार फिरंगी वगैरे गुडीविड्यात आहेत. रावहि व फौजहि गुडीविड्यांत आहे. येथून बालापूर पांच कोस. राजश्री गोपाळराव सवनीस यासमागमे रायाकडील दोनी हजार प्यादा व वालापूर याजकडील [ फाटले ] जमाव करून नर्दागडास पाठविले. रात्रीं सद पाहोन किल्यातून इतबारी येनार. प्यादें किल्यांत संद पाहोन जावे. इकडून रायानी खा [ फाटले ] हैदरखानास दिखाई (?) देऊन फौज बाहेर ये * * * नदीगडाकडून प्यादे यानी निकट करून किल्यात येऊन पावावें यैसे केले आहे. वालापूर जेर जालें आहे. [ फाटले ] आहे. खंदक भरितात, दमदमा तयार करीन आहेत. याकडील फौज थोटकी. त्याहीमध्यें कोन्ही पाडाऊ कोन्ही जखमी. येक दोनी वेळां घोरपडे कचकरले, यामुळें राव खासा इनसखान बार फिरंगी जमाव घेऊन फौज सुधां जानार आहे. याजकडील पाडाऊ लोक गेले, आहेत. त्याभवत्या चौकिया ठेविल्या. याज-कडील वकील त्यासहि चवकी ठेविली आहे. कडपेकर यानी रायाकडे सांडनीस्वार पाठविला. पहिले वचन आलेच होते. समये हाच आहे. बसालतजंग सिधवटा आले. त्यासी जुजावे लागते. तुम्हाकडील उपराळा यावा म्हणोन कडपेकरानीं लिहिले. वजिनस सांडनीस्वार आला आहे त्यासी काहीं जवाबसाल जाला नाहीं. बसालतजंगास मिरजोवलकर व मुस * * ना येक या दोघानी वीर भरून सिधवटास घेऊन गेले आहेत. अवदुल मजीदखानाचा लेक यासी बाहेर काहाडावें म्हणोन योजना करून गेले आहेत. महमदअलीखान अरकाटेंत आहे. नेलूर सर्वोपलीकडे जाऊन बंदोवस्ती करून माघारे अरकाटेस आले, येलूरास येणार आहे. हैदरखानाकडे रायाचे पनास घोडे व पाडाऊ लोक गेले आहेत. त्यांत भानपाचा पुत्र तिमपा पाडाऊ गेला. रायानी भस्मागी पाहाडी किला घेतला होता तो हैदरखानाने मागती घेतला, त्याजकारतां कांही त्यासी वांकडें बोलत आहे. गरीब कोन्ही फकीर येतात ते सागतात. त्यासी चौकिया मातबर ठेविले आहे. सिवराव घोरपडे यास जखमा पांच हलक्या आहेत. पाडाऊ गेले नाहींत.

6303

जुजले फार. लोकांनी कमी केली, खंडेराव घोरपडे वगैरे लोक पाडाऊ नेले आहेत, त्यास ते स(डे) जाले आहेत. स्वामींची खासा स्वारी तुंगभद्रेतीरास आहे म्हणोन दाटी आवाई जाली आहे, यावरून हैदरखान यानीं मोरचे पुढें सरकाविले. गंदक भरितात. रायाकडील लोक व प्यादे यासीं जुमज खाऊ देत नाहीं. सरकारची फौज आलियानें हैदरखान पळोन बेगरुळास जात आहे. सरकाराकडून आनंदराव वैद्यकर वकील त्याजपासी होता त्यास बेगरुळास पाठविले. सडी फौज व तुरग स्वार तीन हजार व बान ठाहानी तोफा बाळापुराहून पुढें दोन कोसावर येऊन उतरले आहे. यानी गुर्डीविच्याच्या आसरियानें आहेत. राजश्री मल्हार रघुनाथ व सेवकास निरोप स्वामीकडे जावयाचा जाहला. कागदपत्र लेहून तयार केले. इतकियांत सिल्गटी * स्वार राऊत पळो आले. त्यानीं सांगितले जे फौज बु * * खामे पाडाऊ करून घेऊन गेले म्हणोन छ २३ शावानी (शनि)वारीं दोन प्रहरा जूज जाले. शनवारीं माईकाळीं वर्तमान आले * * राव दिलारी होऊन रविवारीं प्रात:कालींच स्वार होऊन पुढें जाऊन जखमी * * किरकोल लोक चहुंकडे गेलेले तेही खारीस (?) आले, तेव्हां वर्तमान ठीक कळले. हाजार फौज निवल व सिवराव घोरपडे व कितेक जखमा मिलगऱ्यांत ठेविले आहेत. येका दो रोजीं रायापासीं येणार आहेत. गुमनायेडपाळी याकडील हजार प्यादा हैदरखानापासीं आहे. तो पाळेगार मात्र हैदरखानापासीं आहे. येका दो दिवसीं सेवकास निरोप देणार. निरोप आलिया सेवेसीं येत असो. राजश्री भगवंतपतानीं येक दोनी ठाणी माघारी घेतली. या समयांत फौज आलियानें उपयोगी पडेल. गेलेलीं ठानीं हस्तगत होतील. हैदरखानाचे पारपत्य उत्तम प्रकारें होऊन येईल. जासूदजोड्या नाहीत याजकरितां अर्जुदार हरकारा जोर्डावरावरी विनंतीपत्र लेहून सेवेसीं पाठविले आहे. यास रुपये पांच देऊन पाठविले आहे. सेवेसी विदित होये हे विज्ञाप्ति.

¶*Visaji Baburao gives an account of an encounter between Murarrao Ghorpade and Haidar Ali in which Murarrao suffered heavy losses.*

---

*No. 8*] [*16-4-1762*

छ २० रमजान सुा इसने
सितैन मया अलफ.

श्री

वेदशास्त्रसंपन्न राजश्री रामशा-
स्त्री स्वामीचे सेवेसी

विद्यार्थी माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें विशेष. खासा स्वारी कर्नाटकच्या बदो-

वस्तास आली. कितूरकर देसायाचे पारपत्य करून खंडणी घेऊन सोंध्याचे सरहदेस आलो. तेथीलहि खंडणीचा निर्गम करून घेतला. विदरूरचेहि मातबर आले. खडणी निल्हे लाविली. लहान मोठी संस्थाने राहिली ती चुकऊन घेऊन प्रजन्यकालाचा आवकाप पाहून मागारे फिरोन देशास येऊ. आपल्यास कलावे यास्तव लिहिले आहे. आपले संतोष वृत वरिचेवरी लीत जावे. बहुत काय लिहू हे विनंती.

¶*The Peshwa Madhavrao writes to Ramshastri about his successes in the south.*

---

*No. 9*] [*15-7-1762*

## श्रीह्वेरंब

मंजूर . होळकर छ २२ जिल्हेज

विशेष. तुम्हाकडून सांप्रत पत्र येऊन वर्तमान कळत नाही. तुम्ही कोठपावेतो पोहचला, कोणकोणाकडील वकील आले, हिंदुस्थानचे काय वर्तमान आहे, तरी सविस्तर लि॥. इकडील वर्तमान तरी हैदरआलीची व चिरंजीवाची गाठ पडिली. हैदर मागे सरोन झाडीत गेला. हाली परजन्यकाळ आला. शत्रूवर हात पावत नाही. स्या तिकडे छावणी कर्णे प्राप्त जाली. तेव्हा फौजेचे पोटास पाहिजे. याची ·हरतरतूद करून रुपया तिकडे पाठवावा लागतो. यास्तव काही सरकार माहालच्या रसदाचा यैवज व आपल्याकडील यैवज यैसा तिकडे पाठवावयाची योजना केली. हा यैवज वरर्त्तसीर जाऊन त्यास पावला तरीच फौजेची स्थित राहील. करनाटक प्रांते महर्गता भारी, आणि शत्रूसी गाठ, यैसा प्रसंग वनला आहे. त्यास तुम्हाकडे सरकारचा यैवज येणे तो रा गंगाधर येशवंत यानी देऊन जावे यैसा करार तुम्हीच केला होता. त्यास मशारनिले तै(से) न करिता परभारेच तुम्हाकडे गेले. राहूर्जीपंत कृष्णराव हुजूर कामाकाजावद्दल ठेविले. यानी सरकारच्या यैवजाचा निकाल करून द्यावा ते काहीच घडत नाही. नाना प्रकारचे मुदे मात्र मनमाने तैसे घालितात. पैकी जे करून देणे ते येथारितीनि तुमचे मनोदयासाठी सरकारातून करूनहि दिल्हे. ऐसे आसता आद्याप यैवजास ठिकाण नाही. सरकारात तरी यैवजाची वोढ. कारण की मसलत भारी पडली. हे सर्व तुम्ही जाणतच आहा. ये प्रसंगी तुम्हास उचित हेच की, सर्व प्रकारे यैवजाचा सरबराहा करून मसलतीस उपयोग पाडावा. तरी तुम्हाकडे सरकारचा यैवज मागील येणे आहे तो व पुढील यैवज हिंदुस्थानचा वगैरे त्यापैकी

कांहीं, यैसा यैवज तुम्हीं आपले स्वदेसचे माहालावर नेमून द्यावा आणि वराता माहालीमाहाली पाठवाव्या. येथे सरकारात यैवज घेतला जाईल. मागील यैवज, तरी यापूर्वीच सरकारात येऊन पोहचावा. त्यासहि दिवसगत लागली. याउपरी लावणिवर न घालावे. स्वदेसीं आपले माहाल आहेत, त्यापैकी यैवज नेमून वराता पाठवाव्या. यैवज घेतला जाईल. तूर्त हिंदुस्थानातून रुो पाठवणे, आपल्यास हुडणावल दुहीरी वगैरे मजकुरासाठी सोईस पडणार नाही. देसचे माहालचा यैवज सोईस आहे. सरकारातहि यैवजाची निकड आहे. हाच रुपया उपयोगी जल्द पडेल. यास्तव लिा प्रो वराता पाठवाव्या. करनाटकचे मसलतीमुळे, हरतरतुर्दाने यैवज मेळवावा लागतो. कळले पाहिजे. गाईकवाडी-कडील दोन लक्ष आपण देवविले, त्याचीं पत्रेदेखील तुमचे कारभारी देत नाही. आम्हावर मनसुब्याचे पेच मोठे पडले व पडतात. निजामअली व हैदर नाईक दोन शत्रू मोठे. याखेरीज इगरेज हबसी याचाहि पेच कोकण प्रांते. ऐसे तिहींरी पेचामुळे दौलत मोठे संकटात[१] आहे. परंतु ईश्वरी दया येक साधन मोठे आहे. त्याचेच दये करून सर्वेहि पेच वारतील. आपण काळजी करू नये. हिंदुस्थान प्रांतीचा सरकारचे मुलकाचा व आपले प्रांताचा बंदोबस्त करून ऐवज व बाहेरील ऐवज मेलऊन पाठवावा. हेच मोठी आमची कुमक आहे. हिकडे जसे बनेल तसे करून मनसुबा सेवटास नेत आहो..

¶*This is a draft letter of Raghunathrao addressed to Holkar asking him to remit money at once to meet the expenditure of the campaign in the South. The writer describes how Haidar in a skirmish with Madhavrao was repulsed and forced to flee into the forest. "There are at present three great enemies to the State—Haidar, Nizam Ali and the English ; but, by God's grace, they will all be subdued," he adds.*

---

*No. 10*] [*19-7-1762?*

[१]श्री

पुरवणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान
स्वामीचे सेवेसी

विज्ञापना. मालोजी व बाबाजी जासूद याजबरोबर छ ४ जिल्हेजचीं आज्ञापत्रे पाठविलीं तीं छ २६ जिल्हेजीं काल साईकालीं होसकोटास सादर जाहालीं. कितेक मजकूर आज्ञापत्रीं लिहिला तो सेवकास कलोन समाधान जाहाले. हालीं

---

१ यापुढील मजकूर राघोबाच्या हातचा. तसाच आरंभीचा 'मंजूर' हा शेराहि त्याचाच आहे.

इकडील वर्तमान लिहिणे ते अलाहिदा पत्रीं लिहिलेंच आहे. साराश नबाब बसालतजग व हेदरआलीखान येकत्र होऊन आमचे गळीं पडणार. हैदरआलीखान यास सिरेयाच्या सुभ्याच्या सनदा नबाब याणी दिल्या. हैदरआलीचे लिहिले आले कीं, किला सोडून देणे. त्याजबरून साफ जाब सागणे तो सागितला. तो येऊन गळीं बेमुरवत पडणार. सिबदी ठेवणें ठेविली आहे. परतु कानडे माणोस देशचे विस्वासू माणूस मारले मात्र आहेत ते दोनसें पावेतो होतील. यात परिणाम लागणे धण्याचे पुण्य आहे. फौज काहीं तरी आल्यासिवाय शत्रूचें पारपत्ये केसे होतें? होसकोच्यात हजार माणोस कनिष्टपेक्षा असावे ते दोनसें मारले आहेत, बाकी हे प्राताचे आहेत, त्याचा विश्वास काये? सुगम दिवस होते तो उत्तम चालिले, हालीं दिवस येसे आले! दोनच्यार हजार फौज ज(ल)दीनें रवाना केली पाहिजे. आम्ही सेवक लोक; स्वामीचे कामावर खर्च व्हावे हेच वासना श्री सेवटास नेईल. स्वामीचे निदर्शनास येईल परतु पुढें मेवट नाहीं. याउपर आपण धणी आहेत. हे विज्ञापना.

¶*The writer requests the Peshwa from Hoskota to send succour to enable him to stop the advance of Nawab Basalatjang and Haidar*

---

*No. 11*] [*20 8-1762?*

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीपत स्वामीचे सेवेसी

पोष्य बाजी गोविंद साष्टाग नमस्कार विनती उपरी येथील कुशल तागाईत छ २९ मोहरमपावेतों वर्तमान येथास्थित असें विशेष. अलीकडे पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तर ऐसें नसावें. हर घटीं पत्र पाठऊन सतोषाचे वर्तमान व दरबारचे मर्जीचे लिहावें. राजश्री तात्याचें कूच कधीं होणार, कोणत्या मार्गे कर्नाटकात जातात ते लिहावे. इकडील वर्तमान तर करवीरकरास शंकराजी घोरपडे वगैरे जाऊन मिळाले त्याचा जमाव प्रस्तुत बराच आहे. आमची फौज दाहा हजार जमा जाहाली. त्याचा काट काहीं चालावयाचा नाहीं. पोटाची मात्र अबाळ फार आहे. राजश्री दारकोजी भालेराव याजकडे आमचा कर्जाऊ रुपये ५५ पचावन येणे. त्याचे रावताची नेमणूक पुण्यात जाहाली आहे, त्यास रोजमरेयात वजा करून ऐवज उगऊन द्यावा आणि खासगत कामकाज असेल ते आपण मनावर घेऊन करून देत जावे. बहुत काय लिहिणें, लोभ असो दीजे, हे विनंती.

¶*Baji Govind inquires of Balajipant about the probable time Haripant would leave for the Karnatak*

No. 12] [1763?

## श्रीगणपत

### पुरवणी राजेश्री दादासाहेब

विज्ञापना. या संस्थानचे मुस्य कर्तर (?) व प्रधानपंते व दोडमां कर्तराची आई व नजराज हे मुल्ये चौघे जन व हर्की व अनंत्र येक दोन सरदार याच्या मायेचे ते व देव ब्राम्हन आदीकरून हे सर्वत्रहि आपले फौजेचा मार्ग लक्षितात. येथें आवई जे, तुम्ही फौजसुद्धां फिरून गेलेत. हे प्रतीहि पुसतात, फौज येती की नाही? फौजेत त्रान आहे कि नाही? आद्याप तुम्हांस पत्र कां न ये? फौजा येत नाहीत. लटक्या गोष्टी तुम्हीं आम्हांसीं येकांत करितां. याप्रमाणे हे म्हनतात. तर आपण कोठे आहां, फौज किती आहे, मनसबा काये हे येकांत पत्रीं आज्ञा करावी. व मुल्यांस दिलभरवसा होये असे पत्र मुल्यास व सामादिकांस हे येकांतीं पत्र आपन लिहून उपचार थैल्या आगर कांही नको, सेवकाच्या लाखोट्यांत घालून येकांतीं आज्ञा यावी म्हणजे त्याचें समाधान होईल. कितीक गोष्टी त्यासी बोलतो हे प्रमाण. हर्ली यासी लडाईकरितां तुम्हांस पुरवना. चहूकडे तानावे. येथे आहे काये? जगदेवाच्या मुलकांत येक दोन हजार फौज पाठवावी. घाटाखालीं येकदाच हजार फौज पाठवावी. येथील बाहेर पटला आहे त्यास मिलऊन घ्यावे. आनिख फौजा मिलून तूर्त याच्या नमुदास सिरे आलीकडे पांच हजार फौज पाठवावी. कडूर बानावराकडून आपण ठानी घेत यावे. पुढें कोने कोने जागां हे बंदोबस्ती करितान पाहू वेरे? कमें वर्तमान तें वरचेवर सेवेसी विनंती करितों. या पत्राची प्रति उत्तर मुतरस्त्राराबरोबर लवकर यावी. हे पत्र कोन्हाचे हातीं न पडावे. फाडून टाकावे.

¶*A Maratha envoy at the Court of some Karnatak chieftain intimates to Visaji Krishna that the appearance of Maratha forces in the Karnatak would be hailed with delight.*

---

No. 13] [15-2-1763?

पौ छ २० शाबान.

## श्री

### श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामीचे सेवेसी

विनंती. सेवक शेषो नारायण करद्वये जोडून सा नमस्कार विनंती प्रार्थना. ता छ १ माहे शाबान मुा नजीक सांगोले स्वामीचे कृपावलोकनें सेवकाचे वर्तमान येथास्थित असे. मेवेसी प्रार्थना ऐसीजे. स्वामी ईश्वरपूर्णअवतार. सेवकाचे

आराध्य दैवत. स्वामींचे चरणाविना निजध्यास सेवकास दुसरा नाहीं. स्वामींचे स्मरणमात्रे सर्व जनाचे तापत्रये दूर होतात. स्वामींची आज्ञा तारक मानोन आज्ञेप्रमाणे वर्तणूक केली. सन इसनेच्या कारभाराचा तगादा सेवकाचे माथा भारी राहिला. स्वामी साभिमानी, कृपावंत. तेव्हां सेवकाची उपेक्षा होऊन तगादा राहील असें कदापि घडणार नाहीं. श्रीमंत राजश्री प्रधानपत यांस व राजश्री बापू यांस करवीरचा कारभार करारानुरूप निर्लेप लावून देणे आणि सेवकाचे तगादेचा निर्गम होणे येविशीं स्वामींनी आगोदर आज्ञा केलीच आहे. त्याच आन्वयें श्रीमंत व बापू सेवकांसीं बोलतात परभारेंहि चिकोडीकराची रदबदल करणार; करितात. परंतु बापूचे लक्ष स्वामींचे आज्ञेविना दुसरें नाहीं. आणिखी सेवकाचे आगत्यवादाविसीं बापूस आज्ञापत्रीं आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Shesho Narayan requests Raghunathrao Dada to induce the Peshwa to settle once for all the affairs of Kolhapur in the spirit of the agreement which has been already proposed.*

---

*No. 14]* *[19-2-1763*

श्री

श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामींचे सेवेसीं

विनंती सेवक रामाजी महादेव मुक्काम कल्याण चरणावरी मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ ९ माहे शाबानपावेतो स्वामींचे कृपावलोकनें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामींचे आज्ञापत्र छ १८ माहे रजेवचे सादर जाहाले ते छ ४ मिनहूस सेवकास पावले. तेथें आज्ञा कीं, गोपाळराव गोविंद अमर्यादा करून गेले. उपरांत गोविंद हरि मिरजेचे ठाणे बलाऊन होते, यास्तव किल्यास मोर्चे लाऊन मारगिरीखाली जेर केले. पुढे परिणाम उत्तम नाहीं हे जाणोन गोविंद हरि यानीं आन्यायें माफ करून घेऊन येऊन भेटले. छ १७ रजेबी किल्ला फत्ते जाहाला. हे हर्षाचे वर्तमान सेवकास आज्ञापत्र सादर जाहाले त्यावरून बहुत संतोष जाहला. ज्यानीं अमर्यादा केली ते शासन पावले. स्वामींचा पुण्यप्रताप समर्थ आहे. ज्यावर अवकृपा होईल ते पादाक्रांत होतील, तेथें मिरजेचा मजकूर काये आहे! सेवेसीं श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Ramaji Mahadeo acknowledges receipt of a letter from Dadasaheb giving news of the surrender of the fort of Miraj by Govind Hari Patwardhan.*

No. 15] [4-9-1763

[वरील भाग फाटला आहे.] देव नामजाद प्रांत साष्टी गोसावी यांसी सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार. सुा अर्बा सितैन मया व अलफ. खासा स्वारी मजल दरमजल कर्नाटक प्रांती हेदर नाइकाच्या पारपत्याकरिता तुंगभद्रातीरास चालली, याजकरिता तुम्ही जंजिरे विजेदुर्ग व सुवर्णदुर्ग प्रांतीचा बंदोबस्त करून ते प्रांतपैकी तूर्त खर्चास रुपये नख्त ५०००००० पनास लक्ष सरकारात जलदीने पाठऊन देण. येक घडीचा दिरंग न लावणे. जाणीजे छ २९ सफर. बहुत काय लिहिणें?

¶*The Peshwa requisitions money from Vijaydurg and Suvarnadurg to prosecute his Karnatak campaign.*

---

No. 16] [1764?

२

बोलले की, हैदरनायेकाने गुदस्ता आपल्या सरकारात सा लक्ष रुा दिल्हे अवंदाहि आठ लाख रुा सरकारांत देतो व दोन तीन लक्ष रुा दरबारखर्चाचे देतो. हे न करून त्याची कुमक न करावी, तो पैका देतो तो टाकावा आणि श्रीमंतासी सख्य राखावे यात नफा काये? या आन्वये हैदरनायेकाचा पक्ष धरून गुलाम सैदखान फार बोलले. तेव्हा समसामुदौलानी व माा कवीरखानानी उतर दिल्हे की, हैदरनाईक उदंड जाले तरी जमीदार. त्याची कुमक नवाबानी करावी ही गोष्टी [एक ओळ फाटली.] मनुश्य. प्रस्तुत तुम्ही द्रव्यावर दृष्ट देऊन त्याची कुमक कराल. तो बलावल्यावर तुमच्या प्राणाचाच ग्राहक होईल. त्यास हैदर नायेकाची कुमक सहसा न करावी व त्याचा पक्ष न धरावा. श्रीमंतासी ज्या रीतीनं कलेल त्या रीतीने सख्य करावे आणि उभैतानी येकमते होऊन हैदरनायेकाचे उतम प्रकारे पारपत्य करावे. त्याचे निर्मूलच करावे. तो बलावल्याने नवाबास व श्रीमंतास वाईट आहे. याप्रा समसामुदौला व माा कबीरखां फार बोलले व हेहि बोलले की आपण हैदरनायेकाचे कुमकेस जातील ही गोष्ट श्रीमंतास लोपेल की काये? आपण हैदरनायेकाचे कुमकेस जातात हे श्रीमंतास कळल्यावर ते हैदर-नायेकाचा पिछा सोडून आपल्याच सुमारे येतील. श्रीमंत दादासाहेब नासिकांत फौजेची तयारी करितात ते तिकडून येतील, मुलकाची खराबी करितील. तुम्हांसी बार्+ येतील. या प्रकारे फार बोलले. याचे उतर गुलाम सैदखानानी दिल्हे की, नवाब व भोसले व हैदरनाईक येकत्र (एक ओळ फाटली.) नाहीं. त्यास

---

+ बंदुकीचे आवाज.

समसामुदौलानी व मा कबीरखानानी उतर केले की, गुदस्ता भोसले व श्रीमंताचे सरकारचे सर्व लोक व सपूर्ण राज्य तुम्हाजवल मिलोन होते, तेव्हा काये साध्य जाले जे पुढे काये होणार? ह्या गोष्टी परस्परें खराब व्हावयाच्या मात्र आहे. या प्रकारे दरबारी परस्पर फार बोलणी जाली. सारांश समसामुदौला उमदे माणूस दुरंदेस व सर्व प्रकार त्यांणी पाहिले आहेत. त्यास दोहीकडील बऱ्याच्या गोष्टी त्याणी सांगितल्या. केवल नवाबाचे पदरचे म्हणून (पुढील मजकूर गहाळ.)

¶*This mutilated letter gives the substance of a discussion at the Nizam's court between Samsam-ud-daula and Said Khan regarding a proposed alliance between the Nizam and Haidar against the Peshwa.*

---

*No. 17]* *[1764*

छ ६ सावान

श्री

चिरंजीव राजश्री राव प्रधान यासी आसीर्वाद उपरी. आपण पत्र पाठविलें ते प्रविष्ट जाहाले. त्रिंबक खंडेराव याजकडील गाडदी काहीं आबाजी नाइकाबराबरी व कांही रेणको आनाजीबराबरी गेलेच आहेत. बाकी असतील त्याजसी कर्नाटकचे स्वारीस रवाना करावे व आणखी एक दोन पथके तेथे गाडदी अ * * * * * * * * * * * * * * * वर * * * वर तोफा * * पाऊण शेर गोल्याच्या व * * * तीची पावणे दोन शेर गोल्याची ये * * * आहेत. गर्दी घ्यावयाच्या उपयोगी नाहीत हे जाणून येथें ठेविल्या. बरकड तोफा आम्हाबराबर नाहीत. त्रिंबक खंडेरायाच्या तोफा आबाजी नाइकाबरोबर गेल्या. आपण रेणकोपंतास बलावावें. मजकडे त्याचा कारकून आला होता त्यास मी रगडून सांगितलें. आपणाकडे रवाना केले आहे. *त्याजबराबर च्यार तोफा त्रिंबक खंडेरायाकडील* आहेत त्या येतील. ते गाडदी व तोफासुधां रेणकोपंत बलाऊन घ्यावे हे आशीर्वाद.

¶*Raghunathrao Dada writes to the Peshwa about despatch of artillery and contingents for employment in the Karnatak.*

---

*No. 18]* *[1764 ?*

श्री

सेवेसी विज्ञापना. खानानी बहुत प्रकारें हैदरखानास सांगितलें, परंतु मान्य न करितां स्वार होऊन जात आहेत. तयारी जाली आहे. सेवेसी विदित जाले पाहिजे.

6311

No. 15] [4-9-1763

[वरील भाग फाटला आहे.] देय नामजाद प्रांत साष्टी गोसावी यांसी सेवक माधवराव बलाल प्रधान नमस्कार. सुा अर्बा सितैन मया व अलफ. खासा स्वारी मजल दरमजल कर्नाटक प्रांती हेदर नाइकाच्या पारपत्याकरिता तुगभद्रातीरास चाळली, याजकरिता तुम्ही जंजिरे विजेदुर्ग व सुवर्णदुर्ग प्रांतीचा बंदोबस्त करून ते प्रातपैकी तूर्त खर्चास रुपये नख्त ५०००००० पनास लक्ष सरकारात जलदीने पाठऊन देण. येक घडीचा ढिरा न लावणे. जाणीजे छ २९ सफर. बहुत काय लिहिणे?

¶*The Peshwa requisitions money from Vijaydurg and Suvarnadurg to prosecute his Karnatak campaign.*

---

No. 16] [1764?

२

बोलले की, हैदरनायेकाने गुदस्ता आपल्या सरकारात सा लक्ष रुा दिल्हे. अवदाहि आठ लाख रुा सरकारात देतो व दोन तीन लक्ष रुा दरबारखर्चाचे देतो. हे न करून त्याची कुमक न करावी, तो पैका देतो तो टाकावा आणि *श्रीमतासी सख्य राखावे यात नफा काये?* या आन्वये हैदरनायेकाचा पक्ष धरून गुलाम सैदखान फार बोलले. तेव्हा समसामुदौलानी व मा कबीरखानानी उत्तर दिल्हे की, हैदरनाईक उदंड जाले तरी जमीदार. त्याची कुमक नवाबानी करावी ही गोष्टी [एक ओळ फाटली.] मनुश्य. प्रस्तुत तुम्ही द्रव्यावर दृष्ट देऊन त्याची कुमक कराल. तो वलावल्यावर तुमच्या प्राणाचाच ग्राहक होईल. त्यास हैदर नायेकाची कुमक सहसा न करावी व त्याचा पक्ष न धरावा. श्रीमतासी ज्या रीतीने *कलेल त्या रीतीने सख्य करावे आणि उभैतानी येकमते होऊन हैदरनायेकाचे उत्तम* प्रकारे पारपत्य करावे. त्याचे निर्मूळच करावे. तो वलावल्याने नवाबास व श्रीमंतास वाईट आहे. याप्रा समसामुदौला व मा कबीरखां फार बोलले व हेहि बोलले की आपण हैदरनायेकाचे कुमकेस जातील ही गोष्ट श्रीमतास लोपेल की काये? आपण हैदरनायेकाचे कुमकेस जातात हे श्रीमतास कळल्यावर ते हैदर-नायेकाचा पिछा सोडून आपल्याच सुमारे येतील. श्रीमत दादासाहेब नासिकांत फौजेची तयारी करितात ते तिकडून येतील, मुलकाची खराबी करितील. तुम्हांसी वारं येतील. या प्रकारे फार बोलले. याचे उत्तर गुळाम सैदखानानी दिल्हे की, नवाब व भोसले व हैदरनाईक येकत्र (एक ओळ फाटली.) नाही. त्यास

---

+ बदुकीचे आवाज.

समसामुदौलानी व मा। कवीरखानानी उत्तर केले की, गुदस्ता भोसले व श्रीमंताचे सरकारचे सर्व लोक व सपूर्ण राज्य तुम्हाजवळ मिळोन होते, तेव्हा काये साध्य जाले जे पुढे काये होणार? ह्या गोष्टी परस्परे खराव व्हावयाच्या मात्र आहे. या प्रकारे दरबारी परस्पर फार बोलणी जाली. साराश समसामुदौला उमदे माणूस दुरंदेस व सर्व प्रकार त्याणी पाहिले आहेत. त्यास दोहीकडील वऱ्याच्या गोष्टी त्याणी सांगितल्या. केवळ नवाबाचे पदरचे म्हणून (पुढील मजकूर गहाळ.)

¶*This mutilated letter gives the substance of a discussion at the Nizam's court between Samsam-ud-daula and Said Khan regarding a proposed alliance between the Nizam and Haidar against the Peshwa.*

---

*No. 17*] [*1764*

छ ६ साबान

श्री

चिरंजीव राजश्री राव प्रधान यासी आसीर्वाद उपरी. आपण पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहाले. त्रिंबक खंडेराव याजकडील गाडदी काहीं आबाजी नाइकाबराबरी व कांही रेणको आनाजीबराबरी गेलेच आहेत. बाकी असतील त्याजसी कर्नाटकचे स्वारीस रवाना करावे व आणखी एक दोन पथके तेथे गाडदी अ * * * * * * * * * * * * * * * वर * * * वर तोफा * * पाऊण शेर गोल्याच्या व * * * तीची पावणे दोन शेर गोल्याची ये * * * आहेत. गडी घ्यावयाच्या उपयोगी नाहीत हे जाणून येथे ठेविल्या. वरकड तोफा आम्हाबराबर नाहीत. त्रिंबक खंडेरायाच्या तोफा आबाजी नाइकाबरोबर गेल्या. आपण रेणकोपंतास बलावावे. मजकडे त्याचा कारकून आला होता त्यास मी रगडून सांगितले. आपणाकडे रवाना केले आहे. त्याजबराबर च्यार तोफा त्रिंबक खंडेरायाकडील आहेत त्या येतील. ते गाडदी व तोफासुधां रेणकोपंत बलाऊन घ्यावे हे आशीर्वाद.

¶*Raghunathrao Dada writes to the Peshwa about despatch of artillery and contingents for employment in the Karnatak.*

---

*No. 18*] [*1764?*

श्री

सेवेसी विज्ञापना. खानानी बहुता प्रकारें हैदरखानास सांगितलें, परंतु मान्य न करितां स्वार होऊन जात आहेत. तयारी जाली आहे. सेवेसी विदित जाले पाहिजे.

6311

याप्रमाणे लोक हवालदील जाले आहे. किल्याची जागा आणि वस्ती मोठी. फाहाटपसारा आणि आवया याप्रमाणें पडतात आणि त्यांमा स्वारी मागे सटली आहे. जागा नाक्याची जमीन केवळ लांडार्सा. श्रीरंगपटणापासून सिन्यापर्यंत सरकार अमलाची जागा कोणी मोठी मध्ये नाही. त्यापेक्षें मर्जीस आल्यास दोन हजाराचे आलीकडे जमेत जितकी बारगिर येईल तितकी पाठविल्यास जागाचा नक्ष राहील येैसे दिसोन येते: मर्जी असिल्यास सत्वर रवानगी करावयास आज्ञा करावी. हजार दीड हजार स्वार व गाडदी पांच सातसे असिल्यास मुलकास भरवसा पडेल, आणि खासा स्वारी वेठणीचे व दाण्याचे तगच्याईमुळे आलीकडे पलीकडे गेल्यास किल्यापासून दाहापाच कोसावर पुढे दबाव राहील येैसा विचार आहे. त्यांत स्वामीची मर्जी असेल ती खरी. मी गलबलून लिहितों येैसे ध्यानात येईल तरी मी घाबरा जालों नाहीं. परंतु चित्तात गोष्ट आली ती सुचविली आहे. बहुत काय लिहिणे, कृपा लोभाची अभिवृधि असिली पाहिजे हे विज्ञापना.

¶*The Peshwa is requested to strengthen the post from which the writer sends out this despatch*

---

*No 23*] [*January 1764?*

### श्रीभवानीशंकर

विनती विज्ञापना येैसीजे. बातमीचे वर्तमान लि॥ ते आक्षरशा वाचून उतर पाठऊन देणार स्वामी समर्थ आहेत.

हैदरनायेकाचे लस्करातून धोंडाजीपंत वकील नवाबाकडील होता तो आला. च्यार लक्ष रुपयेहि पा॥ नवाबानी मतलब लि॥ होते ते हैदरनायेकाने कबूल केले. वकीलहि दुसराहि वकिलासमागमे देऊन नवाबाकडे आले असे. मनसुबा दिसोन येतो, की नवाबाची फौज कुमकेस घेऊन जावी. हैदर नायेक आणि मनसुबीयात दगाहर्ची गोष्ट आहे. सुलाह जाली हे वर्तमान लोकप्रसिद्ध, परंतु सुलाह जाली हेच लटकी. रावसाहेबाकडे सुलाहाची गोष्ट टाकावी, इकडे आपली मजबुती करावी, तोपावेतो पावसाला जातो, नदीनाले उतरतात, युध करावे हा त्याचा खुलासा आहे. हे वर्तमान दरगाह कुलीखानाचे पत्रात आले ते लि॥ आहे. कलले पाहिजे.

दुसरे वर्तमान. रावसाहेबाचे लस्करातून सोळा दिवसाचे मनुश आले. कागदहि दरगाह कुलीखानास आला. त्यातहि हैदरनायकाचा मजकूर सुलाहावर गोष्ट घालावी, आशा दाखवावी, पैका देऊ दिलाऊ, पावसाला जाये तो या गोष्टीवर राखावे, नवाबाकडील फौज घेऊन येऊन युध करावे हे वर्तमान आले, तेहि लि॥ आहे.

कागद बाधोन पाठविले आहेत. तिकडील नवल विशेष वृत्त लिहीत जावें. श्रीमंत राजश्री दादा फडणीस अद्याप आले नाहीं. कळावें. मल्हारबा दवंडाहून पुढें तीन मजली गेले म्हणोन येथे वर्तमान आहे. गंगाबा राहूजीपंत कोठें आहेत ते लिहून पाठवावे. श्रीमंत त्रिबकास कधीं जाणार? सांप्रा काळीं मनसुबा काय? तुमचें काही काम लागतें की नाही? सविस्तर लिहावें. बहुत काय लिहिणे, कृपालोभ असो दीजे, हे विनंती.

*¶Mahadaji Ballal and Hari Ballal, writing from the Peshwa's camp at Nazre, inform Bajipant that they will reach the Krishna in about a week's time. The addressee is further requested to forward certain papers, concerning Malharji Holkar to Raghunathrao.*

---

*No. 25]* *[2-3-1764?*

श्री

श्रीमंत राजश्री त्रिबक * * * *
स्वामीचे सेवेसी.

सेवक विसाजी बाबूराव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल छ २१ शाबान मुकाम गुडीबिडा प्रांत चिकबालापूर स्वामीचे कृपेंकरून येथास्थित असे विज्ञापणा येसीजे. हैदरखानासी बसालतजंगासी वाकडें जालें. याजकरितां बसालतजंग कडपीयाकडे गेले. हैदरखान यानी चिकबालापुरास मोरचे लाविले. याजकरितां राजश्री राव ममलकतमदार यांसी चिकबालापूरकरानी लक्ष रुपये व इटगीदुर्ग द्यावे येसा करारमदार करून मातबर दरमियाने घेऊन कुमक करावी. जर करितां कुमक न करावी तर बालापूर गेलियावर मडकसिरे पिनगुडारा (इतका) सरंजाम पाहिजे, म्हणोन योजना करीत आसता वर्तमान. आले. श्रीमंत खासा स्वारी कोल्हापुरास आली. या प्रांतें येतात म्हणोन राजश्री नागोराव यानी रायासी लिहिलेंवरून अवसान धरून रायानीं गुत्तीहून कूच करून पिनगुड्यास बुनगे हती जडभारी तोफा ठेऊन सडे होऊन येथें आले. येथून पांच कोस बालापूर. येथून स्वारी पाठविली. हैदरखानाचे कहीं भरावयास आली होती. वीस उंटे दोनिसें तट्टे दाहा घोडीं दोनी हजार बैल घेऊन आले. तुकोजी नलगे जखमानी चूर व आनिक येक दोनी मातबर पाटाऊ याजकडे आले. बुलगे वगैरे यास सोडून दिल्ही. हैदरखानानें पेठ घेऊन दरवाजेपावेतों मोरचे कायम केले आहे. रायाकडील लोकानी निकड करून पेढारी वगैरे दोनी हजार राऊत (फाटले). खंडेराव घोरपडे छ * रोजीं (फाटले) हैदरखानाच्या पाच (फाटले) माने तहकीक

त्याही गर्ये हैदर (फाटले) न्हाचा नाहीं. रायास चहुकडील टप * * त आहे. खुद राव जात नाही. जर करिता राव खुद गेले तर यासी त्यासी जूज भारी होईल. घोरपडे दुरूनच जे कांहीं जालें तेंच. महमद अलीखान वेलुरांनच आहे. बसालतजंग यानी महमद अलीखानास लिहिलें जे, तुमची आमची भेटी व्हावी म्हणोन लिहिलें. त्यास महमद अलीखान नेलुर मर्व्रापलीहून अरकाटेस येऊन येलुरास यावें. पुढें भेटीस येऊं म्हणोन दिसगतीवर घातले म्हणोन बसालतजंग कडपियास गेले. श्रीरंगपटनी मखदूम नाईक याचें प्रबल जाले आहे. रायाच्या चितांत जे, सरकारची फौज, आलियानें हैदरखानाचे पारपत्य करावे येसे परिछिन राव बोलिले. त्यास उत्तर दिल्हे पहिलेच मनमत्रा पाहोन केला नाहीं * (जर) करिता हैदरखानासी बसालतजंगासी गाठी पडों दिली नसती तर तो का शेर होता? राव बोलिले जे येसें होईल हे ठाऊक नाहीं. बालापूर घेतलियावर मडकसिरे पिनगुडा कोठे राहों देनार नाही. हे आतां रायास सुचलें. खासा स्वारी श्रीमंत स्वामींची आली म्हणजे या मुलकांत दाब बसन्हा. रायाची रीत येक प्रकार जाली आहे. कोन्हाचा इतबार करीत नाहीं. कोन्हाचा मनसबा, मनास येत नाहीं. जे करणें तें आपले अनुमते करावे. याची सलाबत मात्र आहे. फौज म्हणावी तर कांहीं जीव नाहीं. सरकारची फौज दरसालास या प्रांते येती त्या प्रमाने रायापासीं फौजेचा सरजाम.

¶*Visaji Baburao communicates to Trimbakrao that Murarrao Ghorpade thinks of engaging Haidar provided the Peshwas' troops be despatched in time to his help.*

---

No. 26] [4-3-1764

पौ छ ६ रमजान
आर्वा फालगुन मास
डा कासीद

श्री

सेवेसी माहादाजी बलाळ व नारो गंगाधर व [illegible] कृतानेक नमस्कार विज्ञापना. ता छ ३० साबान मुक्काम [illegible] वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामींनीं छ २९ साबानाचीं पत्रे [illegible] पाठविलीं ती काल पावलीं. जाब मागाहून पाठऊं. [illegible] जाले. [illegible]

ओल्यावर मुकाम होईल. मनोलीचें सुमारें जात आहेत. चिकोडी कागल वगैरे ठाणीं घेऊन शेपोपंताचे हवाली करावयास राजश्री विठल शिवदेव पाठविले आहेत. ते तिकडील गुंता उरकून लौकरच लष्करास येऊन मिळतील. श्रीमंत राजश्री दादा फडर्णीस चतुर्दशसि लस्करास आले. कळलें पाहिजे. राजश्री नारो शंकर श्रीकोल्हापूरास गेले होते तेथून लस्करास आले. च्यार रोज जाले. फार बरें वाटत नाहीं. मोडशी जाली म्हणतात ; परंतु थाखा फार आहे. उतार पडला म्हणजे लिहून पाठवितों, हें विज्ञापना.

राजश्री वज्याबाचें नालबंदीवर देणें जालें. पैका नेमून द्यायाविशी येक दोन वेळां श्रीमतांस पुशिलें, परंतु देतां देतों म्हणतात. दर येका ये जागा नेमून घेतों. कळावें हें विज्ञापना. दमाजी गायेकवाड याजकडे दीड लक्ष बाकी होती, त्यास कृष्णाजी नाईक कड्ड व कांबरस मिळोन येक लक्षाची बरात दिली. बरकड किरकोळ बराता जाल्या, बाकी कांहीं येक पैसा राहिला नाहीं. मागाहून यादी पाठवितों. हें विज्ञापना.

¶*Mahadaji Ballal and Hari Ballal write home from Yedur Manjri to say : " Vithal Shivdeo has been despatched to restore Kagal Chikodi to Sheshopant. Manoli is the next place where the army encamps."*

---

*No. 27]* *[19-3-1764*

पौ छ २२ रमजान सन आर्बा

श्री

आपत्ये मोरोबाने साष्टांग नमस्कार विनंती. ता छ १५ रमजान, मुा मनोळी सुखरूप असो विशेष. आपण एकदोन पत्रे पाा ती पावली. इकडील वर्तमान तर मनोळीस मोर्चे लागले. च्यार रोज जाले. ठाणे चांगले. दोन हजार प्यादा आंत आहे. निकड केली तर आठरोज लागतील. हे काम जाल्यावर मग हैदर नाईकाकडे जावयाचा विचार. हैदर नाईक बिदरुरांत आहे. तिकडील सविस्तर वर्तमान लेहून पाठवीत जावें हे विनंती.

¶*Moro Baburao writes that batteries have been erected at Manoli and that after subduing the place they would march against Haidar.*

No. 28] [24-3-1764

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य
राजश्री बाजीपंत दाजी स्वामीचे सेवेसी

पोष्य माहादाजी विष्णु सां नमस्कार विनंती येथील कुशल ता फाल्गुन वद्य सतमी मंदवार जाणून स्वकीय लिहीत जावे विशेष. येथील वर्तमान तरी श्रीमंतानी मनोळीस मोरचे लाविले आहेत. आजी आठ दिवस जाले. चौकडून मोरचेबंदी करून तोफाची मारगिरी होत आहे. सेनासमुदाय झाडून जमा जाला आहे. याउपरी कोण्ही यावयाचे नाहीं. मनोळीत कृष्णाबाई सिंदी आहे. तिचे मानस ग्डणी जीवनमाफीक द्यावी. याचे मानस ठाणे घेऊन शेपोपत यांसी द्यावे. त्यास ते कबूल करीत नाहीं. सर्वांनी मरावे ऐसे म्हणतात. किला फारकरून जेर जाला आहे. दो च्यौ दिवसीं जमिदोज होईल. आपणास कळावे. श्रीरंगपटण येथे हैदर नाईक याचा मेहुणा कारभारी होता, त्यास जुने कारभारी एकत्र होऊन त्यास कैद करून मारिला. आणखी त्याची ठाणी होती ती घेतली. हैदर नाईक खासा बिदनुरीच आहे. तुम्ही आपणाकडील वर्तमान लेहून पाठवीत जावें. कृपा केली पाहिजे. तूर्त या मुकामी महर्गता विशेष आहे आणि तृणहि मिळत नाहीं, तेणेकरून लोक बहुत हैराण आहेत. पुढेहि यापेक्षां माहागाईची आवाई ऐकतों. कृपा कीजे हे विनंती.

¶*Mahadaji Vishnu reports to Bajipant Daji that a brother-in-law of Haidar was assassinated by his rivals in Seringapatam. Manoli—continues the writer—will soon be captured.*

---

No. 29] [21-2-1764 ?
or April 1764 ?

श्री

विज्ञापना. आपलें पत्र छ १८ साबांनचे जासुदासमागमे आलें ते पावलें. बुराणदीन हो! मीकटे याजवर कूच करून आला, तुम्हीं बहुत सावधपणे राहावें, दगेखोर आहे, बातमी राखून सावध आसावे म्हणोन लिहिलें. त्यास येथेहि बातमी आली. त्यांत टोनसे राऊत व येक हजार बार व च्यार तोफा संद आनसर घेऊन धारवाडास खजिना न्यावयास रवाना जाला, तो मिश्रीकोट्यापलीकडे तीन कोशपरियंत आला. रातोरात धारवाडीस येणार म्हणून बातमीचा माणूस आज सकाळीं प्रहर दिवसास आला, त्याणे काल त्या फौजेस सोडिलें. त्यापक्षीं रात्रींच धारवाडास फौज त्याची

6321

आली आसावी. *. * बातमी आज चौ घटकेत यावीसी आहे. त्यां * * ल बातमी प्रो॰ आला असलियास खजिन्यार्चे का * * खाडासच आला. इतकेंच काम झाहून कूच करून आला असलियास दग्यासच आला'आहे. त्यास आपण दोन दिवसानीं त्या सुमारें येतों म्हणोन लिहिलें. त्यास त्याचें येणे जाले, त्यापक्षीं त्याचे तोंडावर निकडीनेच आलें पाहिजे. इकडे जागाजागा फौजा पसरल्या आहेत. संट पाहून कोठें दगा करील याजकरितां ही बातमी तहकीक आहे. * * न कूच सत्वरच होऊन इकडे येणे घडावें. येथील स्थलाचा मजकूर तरी काल नवे हुबलीस ठाणें घातलें, येविसींचा मजकूर लिहून पाा आहेच. जुने हुबलीचा मजकूर आजपवेतों उरकला आसावा. आत खबरदारी कांहींच नाहीं. माणूस थोडें, नेट बसला आसतां थोडक्यातच उरकावें असा आहे; परंतु याची * * * वरचेवर येते, याजमुळें नेट बसविता येत नाहीं (भ) य प्रदेशकडून घडल तिकडे करावयाचें, याप्रमाणे वर्तमान आहे. याउपरी होईल तें मागाहून लेहून पाठवीन. आम्ही सावधच आहों. इकडे आला हे वर्तमान तेथें आणऊन मग वडिली कूच करून यावें. बहुत काय लिहिणे हे विज्ञापना.

¶*The writer refers to the impending arrival of Buran-ud-din, one of Haidar's commanders near Dharwar and the consequent preparations made by the writer to check his aggression*

---

*No. 30*] [*17-4-1764*

—च्या कृपेकरून क्षेम असे विशेष. येथील वर्तमान तर हुबलीचे ठाणें घेतल्यावर दरमजल मुा मजकुरास आलों. छ १२ सवाली हकिमियाँ सावनूरकर याच्या भेटी जाहाल्या. काल सारे सरदार समेत श्रीमंत मेजवानीस शहरात गेले, ते बारा घटका रात्रीस डेरियास आले. श्रीमंत रा दादासहि नेले होते. आज सावनूरकरास येथे मेजवानी आहे. आपली फौज दरमजल येथे आली म्हणोन सावनूरकराचा बच्याव जाहाला. नाहीं तर मीरफैजुल्ला दाहा हजार फौजनसी, हणगलावर आला होता. सावनूरकरास नस्तनाबूद करावा हे मानस होते. परंतु श्रीमंत लौकर येऊन पोहाचले. मोठे येहसान त्याजवर केले. खासा हैदर नाईक माहादेवहळी विदरुदापासून तीन मजलीं आहे तेथे येऊन राहिला आहे. बंकापुरास दोन हजार फौज पाठविली आहे. मखदुमखान त्याचे मेहुणा बसवा-

---

१ हकीमखान. २ मोरोबा फडणीस; ३ कृपा; उपकार.

पटणास हजार राउतानसी आला आहे. गोपालराव याजकडील ठाणी झाइन आली. येक बंकापूर धारवाट मात्र त्याजकडे राहिले आहे. सावनूरकर पठाण समागमें येणार. येका दो रोजी कूच करून तुंगभद्रा पार होणार. हैदर ना झाडीत आहे, बाहेर येत नाही. या फौजेने[१] झाडीत जावत नाही. दिवस अखेरीचे आले. अद्याप येक पैसा खंडणीपैकीं आला नाही. आपली फौज चाळीस हजार देखील सरंजामी जमा जाहाली. रोजमरा कोणास पोचत नाही. नालबंदी तो पावलीच नाही. महर्गता फार जाहाली आहे. छावणी करावी न करावी हाच मनसबा घाटत आहे. रामचंद्र जाधवराव मोगलआली निजामअलीस जाऊन भेटले, ही वातमी आली नकले. छावणी केल्यास नि (अपूर्ण)

*¶This fragmentary letter reports the meeting of the Peshwa and the Nabab of Savanur at his Capital. The letter also speaks about the movements of the enemy in different parts of the Karnatak.*

---

[6-5-1764

No 31]

श्री

श्रीमत राजश्री दादासाहेब
स्वामींचे सेवेसी

सेवक माधवराव सदासिव सा नमस्कार विज्ञापना. वैशाख शुध ५ पर्यंत रटेहळी स्वामीकृपेने सुखी आसों. सेवेसी विनंतिपत्रें तीन पाठविलीं, परंतु कृपा उत्तर सांभाळ न जाला. सेवक पदरचा आणि स्वामी कृपेस पात्र आसे. सांभाळ करणार धणी आसेत. श्रीमत रावसाहेब संडे जाले. हैदर नाइकाची गाठी प्रतिपदेस पातली. युध जालें. शत्रूची बहुत खराबी जाली. दोनसें घोडे दोनसें मनुष्य ठार जाले. जखमी किती असतील न कळे. त्या उपरि नित्य संडे त्याभोवते उभे राहातात. त्याने किले मजकूरचा आसरा केला असे. सावणूरकर तरी पूर्वीच भेटला आहे. तो आज येणार. राजश्री मुरारराव घोरपडेहि आज दाखल होणार. हरपनहलीकरहि चौं दिवसांत येणार. स्वामीचे कृपेने व आशीर्वादें शत्रूचे पारपत्य लौकरच होऊन येईलसे दिसतें. प्रताप माहाराजाचा भारी असे. सेवकाचें विस्मरण आंतःकरणातून न करावें. चरणदर्शनाची इछा विशेष आसे. बहुत काय लिा कृपा करावी हे विज्ञापना.

---

१ फौजेन म्हणजे फौजेच्याने. फौज=पायदळ.

राजश्री चिंतोपंत तात्या व राजश्री कृष्णाजीपंत स्वामीस नमस्कार. लोभ असावा. राजश्री रामचंद्रजी बाबा यासी आर्सीवाद. लोभ करून उत्तरें पाठवित जावी. हे विनंति.

*¶Madhavrao Sadashiv informs Dadasaheb of a fight between the Peshwa and Haidar in which the latter sustained a heavy defeat.*

---

*No. 32*] [*6-5-1764*

पौ। छ १८ जिल्काद

**श्री**

श्रीमंत राजश्री दादासाहेब
स्वामींचे शेवेसी

विनंती सेवक कृष्णराव बल्लाळ व रामचंद्र गणेश, कृतानेक सा। नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता। छ ४ जिल्काद मु॥ नजीक रत्त्यळी, प्रांत बिदनूर, सेवकाचे वर्तमान यथास्थित असें विशेष. कृपा करून पत्र पाठविलें तें पावोन परम संतोश जाहला. आज्ञा कीं, तुम्हांकडून बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तर सविस्तर लिहिणें. ऐसियास विशेष वर्तमान स्वामींचा *निरोप घेतल्या ता। कांहीं ल्याहावया योग्य जाहालें नाहीं. यास्तव लिहिलें नाहीं.* राजश्री केशो नारायण यांस, तिगस्तां स्वामींनीं वचन दिल्हें होतें. त्या वचनाचा उधार श्रीमंत राजश्री रावसाहेबीं करून, बंदोबस्त करून दिला. तदनंतर दर-मजल खासां स्वारी सौनुरास आली. सौनुरचे पठाण भेटले. हजार, बारासें स्वार, हजार प्यादा त्याजसमागमे आहे. हैदर नाईक बिदनूरचे झाडींत होता. खासां स्वारी सौनुराहून हवनुरास, तुंगभद्रातीरास गेली. इतक्यांत हैदरनाईक हरिहरा-वर पंचवीस हजार प्यादा व बार दाहा हजार फौजेनसी आला. इतक्यांत खासा स्वारी हवेरीची पेठ मारून, तेथून संड हांऊन, तीन कोस पुढें आले. हे वर्तमान हैदरनाइकास कळल्यावर कूच करून, बिदनूरचे रोखें कूच करून रत्त्याळीचा मुकाम केला. राजश्री गोपाळराव व विठ्ठल सिवदेव, वैशाख शुद्ध २ प्रातःकाळींच कूच करून संड फौजेनसी गेले. रत्त्यालीजवळ गांठ पडली. हैदर नाईक थोडी फौज पाहून, उभयेतांवर चालोन आला दोन आडीच कोस, इतक्यांत खासां स्वारीहि आली, दोप्रहरां गांठ पडली. तेव्हांपासून दीड प्रहर पा। परस्पर तोफांचा मार होत होता. आम्हांकडील तोफांनीं *शेंसवाशें, दीडशेंपर्यंत, माणूस त्यांजकडील* ठार, पांच सातशें जखमी, घोडे सवाशें ठार, याखेरीज जखमी, आम्हांकडील चालीस पंनास माणूस ठार, दोनशें जखमी, घोडे शंभर ठार, याप्रमाणें होऊन

सायंकालचे चऊं घटका दिवसास फौजांनीं चालोन घेतले. परंतु गारदी फार यास्तव त्यांणी गारद्यांचे बुरूज बांधोन, आपले फौजेस हात लागूं दिला नाहीं. लोक जखमी होऊं लागले, तेव्हां फौजा निवाल्या. मातबर सरदार कोणी जायां जाहाला नाहीं. राजश्री बाबूजी नाईक यांचा पुतण्या रघुनाथ बावा. गोळी लागून ठार जाहला. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Krishnarao Ballal and Ramchandra Ganesh report to Dadasaheb particulars of the Peshwa's doings in the Karnatak, particularly the fighting with Haidar at Rattehalli.*

---

श्री

पुा श्रीमंत दादा साहेब स्वामींचे सेवेसी

विज्ञापना. त्या दिवसीं जूंज जाहालें, त्याजमुळें त्याजवर दाब आपले फौजेचा फार राहिला, नाहीं तर तो मगरूर छापे घालिता. इतक्या उपरी तोच आपलें गोटाची रातची बंदोबस्ती करीत अस्तो. त्यास कळलें कीं ज्या दिवशीं फिरोन निकड करतील; त्या दिवशीं आपली स्थित राहाणार नाहीं. मुरारराववहि चऊं कोसावर आले. उद्यां भेटी. तीन हजार फौज, तीन हजार गारदी, हरपन-(ह)ळीकरहि पांच हजार प्यादा, पांचशे राउतांनसी भेटीस येत आहे. स्वामींचे पुण्येकडून अमित्रांचें पारपत्य लौकरीच होईल. आपल्यास खर्चाचा पेंच मात्र भारी आहे. ईश्वर इच्छा प्रमाण. श्रीमंत रावसाहेब स्वामींचे चिंतन करीत अस्तात कीं, जे होणे ते वडिलांचे पुण्येकडून होईल. गुदस्तां वडील होते, त्यांचें ते करीत होते. प्रस्तुत मला चिंता करावी लागते. बरें. सर्व वडिलांचे पुण्येकडून बरेंच होईल, याप्रमाणे निजध्यास आहे. आम्हीं म्हटलें कीं, दादासाहेब आम्हांस कागद लिहीत नाहींत. तर ते आम्हांस विसरले. इतक्यांत स्वामींचे पत्र आलें. त्याजवरून जीवनकला आली. आम्हांस स्वामीखेरीज दुसरें जीवन आहे असा पदार्थ कोणीच नाहीं. विशेष लोभहि नाहीं. येक लोभ स्वामींचे पायाचा मात्र आहे. यांत आमची सर्व जिंदगानी आहे. स्वामींनीं आपले लेकोंप्रमाणें आमचें चालविलें आहे; स्वामींचें शरी(र) बहुत नातवान जाहालें म्हणून आइकलें. त्याजवरून चित्तास स्वस्थ नाहीं. तर स्वामींनीं औषधीउपाय करून, पथ्य करून ज्या गोष्टीनें शरीर स्वस्थ राहिल्यास त्या शरीरापासून दौलतीचा उपभोग अथवा तपस्येचाहि उपभोग होत असतो. तर सारांश, शरीराची जतन करावी. हे विज्ञापना.

¶*Krishnarao Ballal and Ramchandra Ganesh report to Raghunathrao, stiff fighting between the Peshwa and Haidar. The writers praise the high qualities of Dadasaheb and attribute all the Peshwa's achievements to his blessing. Evidently they are trying to please him by sweet words.*

6325

No. 39] [12-7-1764

श्री

राजश्रिया विराजित राजन्य राजश्री
बाजीपंत अणा स्वामीचे सेवेसी

पोष्य हरी बलाल कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल तागायत छ १२ मोहरम जाणून स्वकीय कुशल लिहीत जावे विशेष. इकडील वर्तमान तर श्रीमंत मुदगल सरकारांत गेले होते. त्यास हैदर नाईक बंकापुरास आला म्हणून बातमी आली; त्याजवरून माघारे फिरले. आतां हैदर नाईक हणगलावर गेला म्हणून वर्तमान आहे. श्रीमंत गजेंद्रगडाजवळ आले आहेत. आठ पंधरा दिवस इकडेच कर्मणूक करणार; मग पुढें जातील. पुढें होईल ते लिहून पाठऊं. श्रीमंत राजश्री नाना पुण्याहून तिकडे कधीं गेले, काय वर्तमान, ते लिहून पाठवावें. चिरंजीव राजश्री गोविंदपंत पिंपळनेराहून तेथे आले आहेत, त्यांस लखोटा पाठविला आहे तो प्रविष्ट करावा; तेथ नसिले तर पिंपळनेरास पाठवावा. कामाचा कागद आहे. कळावें. कृपा केली पाहिजे हे विनंती.

¶*With the Peshwa's move towards Gajendragad, Haidar is reported to have retired upon Hangal, writes Hari Ballal to Bajipant Anna at Nasik.*

---

[13-7-1764

No. 40]

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
बाजीपंत अणा
स्वामीचे सेवेसी

पोष्य बापूजी राम सोमण कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल तागायत छ १३ मोहरम मुकाम मौजे मुधोळ तालुके गजेंद्रगट जाणोन स्वकीये कुशल लिहीत असावे विशेष. आपणांस येक दोन पत्रे पाठविलीं तीं पावलींच असतील; परंतु येकाहि पत्राचें (उत्तर) पाठऊन साभाळ न केला. तेणेंकरून चित्त उद्विग्न आहे, तरी ऐसें न करावें. सदैव पत्रप्रेषणेंकरून मैत्रकाचा सांभाळ करीत असावें. यानंतर इकडील वर्तमान तरी हैदर नाईक झाडींत गेल्यावर खासा स्वारी माघारी फिरोन, सरकार मुदगल व गदवाल प्रांतें जावयाचा मनसबा करून, मजल दरमजल गदवालानजीक येऊन पोहचले, तों हैदर नाईक झाडीतून बाहेर निघोन बंकापुरास आला, हे वर्तमान राजश्री

गोपाळराव गोविंद थाणीं सावनुराहून लिहून पाठविलें; त्यावरून श्रीमंत सावनूरच्या रोखें मागलीं फिरले. येक दोन मजल्या सावनूर राहिलें. हें वृत्त नफर मजकुरास कळलें; त्यावरून फिरोन वंकापूर सोडून झाडीच्या रोखें हनगलाजवळ गेला. तदनंतर सावनूरचा रोख सोडून मुकाम मजकुराचे रानांत व धारवाडचे तालुक्यांत महिना पंधरा दिवस फिरस्ते असावे, याप्रमाणें दौल आहे. मौजे मुधळ तालुके मजकुरास छ ११ मोहरमीं मोर्चे लाविले आहेत. आज हल्ला होणार आहे; ठाणें घेऊन दौलतराव घोरपडे यास द्यावें. सावनूर * * चाळीस राजश्री गोपाळराव गोविंद आहेत. नफर मजकुराची फौज वंकापुरींहून येक दोन रोज सावनूरचे नजीक येई तेव्हां मशारनिलेचें पथक तयार होऊन, शहर सोडून कोस दीड कोस जाऊन नजरानजर मात्र होई. येक दिवशीं गांठ पडली, त्यास नफरास नतीजा पोहचऊन माघारे फिरविलें व स्वारीहि आली; तदनंतर झाडींत गेला. कळावें. सर्व आपणांस क्षणाक्षणाचें वर्तमान कळतच आहे; परंतु सूचना मात्र सेवकानें लिहिली असे. बहुत काय लिहिणें, कृपा लोभ निरंतर असों दीजे. श्रेहांत अंतराय न कीजे; पत्रीं दर्शनातुल्य लाभ देत असावे हे विनंती. आपण ज्या क्षेत्रीं आहांत, तेथें आमचे श्रीस नमस्कार सांगावे.

¶*Bapuji Ram Soman reports the tactics of Haidar against the numerically superior Maratha forces. With the approach of the Peshwa he retired into the woods from which it was difficult to dislodge him and when the Peshwa moved away towards Gadval he suddenly appeared before Bankapur and threatened to march upon Savanur. The Peshwa on getting the news fell back upon Savanur when Haidar too disappeared in the forests. In a skirmish he had with Gopalrao he suffered heavily. Mudhol is being invested adds the writer.*

---

*No. 41]* *[20-8-1764 ?*

पो छ २७ रबिलावल

श्री

श्रीमंत राजश्री दादासाहेब
स्वामीचे सेवेसी

पोष्य भिकाजी नाईक रास्ते कृा सा विा. येथील वर्तमान तां श्रावण वद्य ८ पावेतो स्वामीचे कृपेकरून येथास्थित असे विशेष. स्वामीकडून बहुत दिवस पत्र येऊन परामृष होत नाहीं; तरी सदैव कृपा करून, सांभाळ करीत जावा.

श्रीमंत रा राव छावणीस करनाटक प्रांती राहिले आहेत. हैदर ना याचे मसलतीस गुंतले आहेत. आपण वडील आहेत; तरी सर्व प्रकारे कुमक करून, शत्रू पराभवाते पावे तो अर्थ करावा. स्वामी तो तरतूद करीतच असतील; परंतु सूचनार्थ लि॥ असे. स्वामी पुण्यसील, स्वामींचे आसीर्वादे येश येईल. बहुत काये लि॥ कृपा लोभ असो द्यावा हे विज्ञापना.

*¶Bhikaji Naik Rastia writes to Raghunathrao to render assistance to the Peshwa to enable him to humble down Haidar.*

---

No. 42] [25-8-1764

पौ छ १२ रावल खमस

श्री

राजश्री जानोजी धुळप गोसावी यांसी

ॐ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री माधवराव बलाळ प्रधान आसीर्वाद सु॥ खमस सितैन मया व अलफ. कोकणपट्टीत सोधे बिदनूर याप्रो हैदरनाईकानी ठाणीठुणी घातली आहेत, ती काबिजात करून तो प्रांत सरकारच्या आमलात आणावा, हे मसलत तुम्हास सांगितली आहे; तरी तुम्ही व फिरंगी व सावंत येकत्र होऊन जलमार्गे व खुशकीने जिकडून साधेल तिकडून प्रांत सर करणे. येकसान आहा जाणून मसलतीची आज्ञा केली आहे. सरकार कामकाज जाहाल्यावरी तुमचे मनोद्यानरूप ऊर्जित केले जाईल. कितेक साहित्याविसी राजश्री विसाजी केशव यास देशजी आज्ञा केली आहे. व हालीहि पत्र लिहिले आहे. साहित्य करितील व तालुकियाकडील लोक दोन हजार देविले आहेत त्याप्रो येतील. मसलतीस खर्चवेच लागेल, तो सरकारांतून राजश्री पांडुरंग मुरार पाठविले आहेत, याचे वियमाने करीत जाणे. वरकड आज्ञा करणे ते रा चिंतो नारायण यास केली आहे. हे व पांडुरंग मुरार सांगता करतील. फिरंगी यास वगैरे यास सरकारची पत्रे तुम्हाकडे पाठविली आहेत. त्यास फिरंगियाकडील वगैरे राजकारणे चालून मायेममतेत येऊन सरकार कामावर उपयोगी पडे ते करणे. जाणिजे छ २६ सफर बहुत काय लिहिणे.

*¶The Peshwa commands Janoji Dhulap to attack Haidar from the sea and reoccupy the states of Sondha and Bednore, with the help of the Portuguese and the Sawant.*

घाल्रून, कोलाविसी राज़ीद जाले. त्याजवरून कौल देऊन त्यास बाहेर काढून छ १० जमादिलोवली सरकारचे निशाण चढऊन किला फत्ते केला. तुम्हास कलावे याजकरिता लिहिले असे. तुम्ही अरमारची व खुशकीची तयारी करून स्वारीस निघालेच असाल. प्रस्तुत कोठे आहा; मोधे बिदनूरचे तालुकियात कशी येणार ते सविस्तर लिहिणे. जाणिजे छ ११ जमादिलोवल बहुत काय लिहिणे.

¶The Peshwa intimates Dhulap the capture of the Dharuar fortress and enquires how he was proceeding with the task assigned to him

No 54] [8-11-1764

पौ छ २७ जाोवल

सन खमस कार्तिक

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री

बालाजी जनार्दन स्वामी गोसावी यासी

पोष्य माधवराव बल्लाल प्रधान नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत जाणे. विशेष. तुम्ही छ ४ जमादिलावलची पत्रे पाठविली ती छ १० मिा पावोन लिा वर्तमान सविस्तर कळलें. दारूगोळे सिसे बाण याची रवानगी पुण्याहून मिरजेस केली, त्याचे तेरीज पाठविले तें पावलें; त्यावरून कळलें. त्यास याउपरी गोळे व सिसे याची रवानगी न करणे. दारूची तर्तूद पेशजी लिहिल्याप्रमाणे करून, पचवीस तीस खर्टीपर्यंत आणखी दारू मिरजेस पाठऊन देणे. तेथून लस्करात आणिली जाईल. व बाण तयार होतील ते पाठवीत जाणे. गोळे व सिसें याची तर्तूद येथे आहे, दारू व बाण मिळत नाही; याजकरिता लिहिले प्रो रवाना करणे. रा छ १३ जौवल मुा खमस मितैन मया व अल्फ बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶Madhavrao Ballal writes to Nana Fadnis to send a fresh supply of rockets and powder Cannon balls and lead—adds the writer—are not required

No 55] [2-12-1764

पौ छ १९ जाखर सन खमस

श्री

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

पौ बालाजी शंकर कृतानेक सा नमस्कार विनंती. येथील क्षेम ता छ ८ जाखर मुा नजीक जटीहाळवटी लस्करात क्षेम असो विशेष. स्वामीचा निरोप घेऊन आलो ते लस्करास सुखरूप पावलो. इकडील वर्तमान तर हैदरनाईक

जर्डीहणवटीवर आहे. त्याम व आपणाम दोन तीन कोशाचे अतर आहे. ,वाला नदीपलीकडे दीडा कोशावर झाडीत आहे. त्यास दोन तीन रोज श्रीमताची व त्याची गोल्यागोली जाहाली. काली मंदवारी मार्गसीर्ष सुध ८ प्रात:काली श्रीमंताची स्वारी खासा वगैरे सर्व मरदार गेले होते. त्याम आपल्या नौफा त्याचे लस्करावरी लाविल्या होत्या. त्याणे पाच साहा हाजार गाडदीयानसी व पाचसात तोफा घेऊन आपले तोफावरी चालून घेतलें. तेव्हा मुरारजी घोरपडे याजवरी मार जाहाला; तेव्हा खासी हुजरान जरीपटका व श्रीमंत याणी उठावणी केली. त्याजकडून हाजार दीड हजार गाडदी वगैरे ठार जाहाले. पाडाव तोफा सुमार ६ व घोडी सेकीडसे आली. मोठी फत्ते जाहाली. उदईक ठरतो की जातो पहावें. इतक्या दिवसात कालची जरब त्याम भार्ग बमली. याउपरी फत्तेच आहे. वरकड वर्तमान मागाहून सविस्तर येईल. स्वामीस कळावे. बहुत काये लिहिणे. कृपा केली पाहिजे हे विनती. जासूद जलद आलियास इनाम देवावे हे विनंती.

¶*The action of Jadi Hanwati in which Haidar sustained a severe defeat is reported to Nana Fadnis by Balaji Shankar*

---

[1765?

No 56]

श्रीव्यंकटेश

सकलगुणालकरण अखडितलक्ष्मीअलकृत

राजमान्य राजश्री दादासाहेब

स्वामी गोसावी यास

पोष्य नारायण व्यकटराव कृतानेक साष्टाग नमस्कार विनती. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करीत आसिले पाहिजे विशेष. आपणाकडून बहुत दिवस पत्र येऊन परामर्ष होत नाहीं; तेणेकरून चित सापेक्षित आहे. तरी येसे नसावे. सदैव पत्रद्वारे साभाल करीत असावे. यानंतर आम्हाकडील वर्तमान तरी, फौजेसुधा सांवे प्राते जाऊन, ममलत उगवून, परगणे हणमसागर प्राते येऊन मुकाम जाहला आहे. येथील व अनगुंदी व कनकगिरी संस्थानाकडे सरकारची बाकीचा येवज येणे आहे. त्याचा निशा करून घेऊन, पुढे आदवानी प्राते जात असो. हे स्वामीस विदित व्हावे याकरिता लिहिले आहे. वरकड कितेक वर्तमान श्रीमंताचे पत्री लिहिले आहे त्यावरून कळेल. बहुत काय लिहिणे लोभ असों दिला पाहिजे हे विनंती.

¶*Narayan Vyankatesh Ghorpade of Ichalkaranji writes to Raghunathrao informing him that the writer is proceeding to Adoni after finishing the affairs of Kanakgiri and Anagundi.*

त्रिदरूर प्रांतीची हवा फारच वाईट. फौजेस विसा पंचविसा दिवसीं रोजमरा देतात. लोकात काही हाल राहिले नाही. याउपर होईल वर्तमान ते मागाहून लेहून पाठवीन. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*News-letter from Baji Govind says : Peace negotiations with Haidar broke down and the Peshwa marched on Harnhalli. It surrendered without resistance. The Peshwa then besieged Kumsi which despite resistance was reduced in a couple of days. Faizulla Khan fell back from Anantpoor when he heard of the Peshwa's intention to attack it. Haidar is reported to be encamped at Bednore.*

---

*No. 60]* *[12-3-1765*

पो छ २८ रमजान
सन खमस.

श्री

सेवेसी विज्ञापना. ता। छ १९ रमजान मु॥ अनंतपूर स्वामीचे कृपेकरून येथास्थित असे विशेष. वारीनी ठाणी कुमसी, हरणहल्ली, येनूर वगैरे घेऊन ठाणी वसविली. येथे दारूगोळा बाण वगैरे सरंजाम सापडिला. तेथून वारीआंत येऊन अनंतपुरास मोर्चे लाविले. रामचंद्र कणवी सा कोस आहे तेथे मजबुदी फार आहे. अनंतपुरास मोर्चे लावून चार दिवस जाले. त्याचा वकील समागमे होतान. तहाच्या गोस्टी बोलू लागले. अनंतपूर घेतल्यावर पुढें निदान सेवटच मांडले. येश अपेश भगवंताधीन यास्तव दोहीकडून सलूख करणे जरूर प्राप्त जाणून निश्चयांत आले. येन अठावीस, नजर पाच, खर्च दोन याप्रो पस्तीस जाहाले. बंकापूर बसवापट्टण द्यावे, राजश्री मुरारराव याची ठाणी सोडावी, नबाबाची पहिलीच सुटली. येथून काली राजश्री नारो शंकर व हरि गोपाल तिकडे गेले आहेत. करारमदार होऊन तेथून मीर फैजुला येईल असे आहे. निमे ऐवज रोख येईल, निमेची निशा महादसेटीची होईल. झाडीतून बाहेर जावे, ठाणी वसल्यास मग कोणीकडे जातील, या प्रमाणे ठरले आहे. गेले आहेत ते आलियावर ठरेल ते प्रमाण. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*The letter reports the terms of the agreement proposed between the Peshwa and Haidar Ali.*

No. 61] [12-3-1765

श्री

सेवेसी माहादाजी बलाळ व हरि बलाळ कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. ताा छ १९ रमजान मुाा मौजे अनंतपूर प्रांत बिदनूर क्षेम असो विशेष. येथील वर्तमान तर हैदर नाइकाचा तह जाहाला. अठावीस लक्ष खंडणी जाहाली. सरकार तालुक्यापैकी बंकापूर, हरिहर, बसवापटण व गोपाळराव याचे बंधु सोडून द्यावे. मुरारराव सावनूरकर पठाण यांचा मुलूक सोडावा, या प्रा तूर्त कालानरूप ठरले, पका तह करावयाकरिता राजश्री नारो शंकर, हरि गोपाळ काळच निघोन गेले आहेत. सविस्तर मागाहून लेहून पाठऊ. आम्हा उभयेतास बरे वाटत नाही. ज्वराची पीडा जाहाली आहे. काही उतारावाली आहो. स्वामीच्या पुण्यप्रतापेकरून सीघ्रच आरोग्य होईल. इकडील हवा फार वाईट आहे. सला लवकरच होऊन स्वारी मागारी फिरेल. विदित जाले पाहिजे. पुढे होईल ते लिहून पाठऊ. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

राजश्री नारोपंत नाना देशमुख आपाजीपंत सर्व मंडळीस कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. कृपा केली पाहिजे हे विनंती.

*The terms of the treaty concluded with Haidar are communicated in this letter by Mahadaji Ballal and Hari Ballal.*

---

No. 62] [13-3-1765

पो छ १८ रमजान सनखमस
फाल्गुन मास

श्री

श्रीमंत राजश्री नाना
स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक माहादाजी विष्णु व बाबूराव केशव कृतानेक सां नाा विा. येथील कुशल ताा फाल्गुन वद्य शस्टी भोमवार मुाा अनंतपुर नजीक बिदनूर येथे स्वामीचे कृपेकरून क्षेमरूप असो विशेष. स्वामीकडून प्रस्तुत आसीर्वादपत्र येऊन सांभाळ होत नाही याकरितां चित्त सापेक्षित असे. तरी ऐसे नसावे. येणारासमागमे पत्र पाठवावयासी लेखकाम आज्ञा जाली पाहिजे. येथील वर्तमान तरी हर्फनली चित्रदुर्ग येथील निर्गम करून इकडे आले. हैदर नाईक याजकडील

6347

ठाणी हरिहर, हरपणअली, कुमर्मा घेऊन अनंतपुरास मोर्चे लाविले, तो त्याजकडून वकील आले. खंडणीचा करार ठरला. पैन आठावीस यांची नजर व दोन दरबारखर्च या प्रो जाला. बमुलास राजश्री नारो शंकर राजे व राजश्री हरि गोपाळ उभयेता कार्ला गेले. निमे रोख निमे मावकाशे निशा या प्रा .येकिले वर्तमान मेवेसी लिहिले आहे. हे विज्ञापना.

¶*Mahadaji Vishnu and Baburao Keshav report to Nana Fadnis that the Peshwa proceeded to Anantpur and invested the place, after capturing Chitradurg, 'Harpanhalli and other places. It also refers to the subsequent treaty.*

---

*No. 63]* *[30-3-1765*

पो छ २२ सवाल चैत्रमास
हा जामूद जथे भिकाजी ना
आ १ लक्ष्मण
१ [ कोरी जागा ]
———
२

**श्री**

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
बाळाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसी

पो माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार. विा उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष. बिदरूर प्रातची ठाणी दोन च्यार घेऊन फौजसुधा बिदरूरच्या झाडीत सिरोन अनंतपुरास मोर्चे दिल्हे. ते ठाणे घेऊन पुढे जाऊन बिदरूरच घ्यावे इतक्यावर मजकूर जाला. तेव्हा हैदर नाटकानी वकील पाठऊन मोठे वजीदीने तहाचा पैगाम केला. तीर्थरूपाचे विचारे, मसलत लांबऊ नये, त्याजवरून तह केला. अठावीस लक्ष रुा करार करून निमे रोख व निमेस मुदत केली व बंकापूर व सावनूरकराची ठाणी मुलूक व रा मुरारराव घोरपडे याचा मुलूक ठाणी दिल्ही. या प्रो होऊन माघारे फिरोन तुंगभद्रातीरास आलो. रा छ ८ सवाल सुा खमस सितैन मया अलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*The Peshwa Madhaorao intimates to Nana Fadnis that he has concluded a treaty with Haidar, in pursuance of the advice of Raghunathrao Dada.*

*No. 64]* *[26-4-1765*

पौ छ १७ जिल्काद म्मस वैशाख

श्री

सेवेसी बाजी गोविंद कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ ५ जिलकादपावेतों मुकाम नजीक सेडर पाले वर्तमान येथास्थित असे विशेष. आज्ञापत्र पाठविलें तेथें आज्ञा कीं, वराडचें मजमुविशीं श्रीमंतास पत्र पाठविलें आहे, देऊन उत्तर घेऊन पाठवणें. त्यावरून पत्र दिल्हयावर कारभारी यास बोलाऊन आणून रागें भरले. गैरवांका समजाऊन पत्र कोणी दिल्हें ? कारभारी, पहिलें आपणांस ठावकें नाहीं, म्हणत होते, मग देण्याची याद चिटणिसाकडून आणविली. ती राजश्री चितोपंतांनींच मखलाशी लिहिली आहे, तेव्हा वेगळे वाटेनें रागें भरोन ताकीद करून लवकर ताकीदपत्रें देविलीं, ती ताकीदपत्रें व पत्राचें उत्तर पाठविलें आहे. आपले आसामीची त्यास फारच गोष्ट लागली कीं आपण नानाकडे आसामी करार करून दिल्ही. नानाचें अगत्य आपणांस पुरें. माझी ममता नानाचे जागां फार हे यास ठावके असोन गैरवांका आमचे कानावर न घालितां मखलाशी करून दिल्ही. याप्रमाणे येकादोवाजवळ भाषण केलें. सदाशिवपंताचें पत्रावर आपले स्वदस्तुरें दाहा ओळी लिहिल्या आहेत. आपले-विशी राजश्री हरिपंत भिडे फारच श्रीमंतांची खातरदास्त करीत असतात. कळावें. श्रीमंत मोरोबादादा श्रीमंतांचा निरोप घेऊन आजच कोल्हापुरास, तेथून पुढेयाचे गणपतीस, तिकडूनच पुणेयास येतील. इकडील कामकाजाचा गुंता फार करून उरकला. याउपर दरमजल कूच करून दरमजल ज्येष्ट शुद्धांत पुणेयास येतील. थोरले श्रीमंत आठ दाहा दिवस पुण्यास राहून मग चावडसेस जाणार असा विचार आहे. घडेल तें खरें. फौजेस सालमजकुरीं नालबंदीस पैसा नाहीं. हैदरनाइकाकडील पुढील हप्त्याचे चवदा, त्यापैकीं पांच लक्ष रुपये तूर्त सावकारा-पासून व्याज कापून घ्यावें व कांहीं खाजगीकडून पांच लक्ष पावेतों कर्ज घ्यावें व सावकारांपासून पाचपावेतों कर्ज घेऊन पंधरा लक्षांवर फौजेची रवानगी करावी, याप्रमाणें मजकूर. पडल्या घोड्यांचा वगैरे अजमास पाहाता, दोन्हीं स्वाऱ्यांचे फौजेस पंचवीस लक्ष रुपये असावे, त्यांत ऐवज सदर्हूप्रमाणें दिसतो. सेवेसी कळावें. घोरपडे याजकडे बारा हजार रुपये नजरेचा ऐवज करार केला तो पुण्याचे खर्चास द्यावयाविशी श्रीमंत रावसाहेबांस विनंती केली आहे. तूर्त आम्ही श्रीमंत दादासाहेब श्रीकार्तिकस्वामीजवळ राहिले आहेत, यांजवळ आपण आहों. श्रीमंत रावसाहेब पुढें बल्हारीकडे गेले; दोहोचोहो दिवशीं गांठ पडल्यावर कागद पत्र घेऊन पाठवितो. राजश्री गोपाळराव व रास्ते विसाजी नारायण यांस

छावणीस राहा म्हणतात, अद्याप त्याचें बोलणें चालणें निव्हेस लागलें नाहीं. बकापुरचा किल्ला गोपाळरायास दिल्हाखेरीज छावणीस राहात नाहीं. थोरल्या श्रीमताचे विचार तूर्त किल्ला सरकारात ठेवावा ऐसें मानस आहे, ठरेल तें खरें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The letter, written from the camp near Sondur Pale, reports that Moroba Fadnis would shortly go to Poona via Kolhapur, that the Peshwa had advanced upon Bellari and that Raghunathrao would reach Poona in about a month*

---

*No 65*] [*30-4-1765*

पौ। छ १७ जिल्काद
सन खमस ह्या
साडणीस्वार.

श्री

सेवेसी माहादाजी नारायण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान तागाईत छ ९ जिल्कादपावेतों मुकाम नजीक केचनगुड क्षेम असें विशेष. श्रीमत उभयेतां श्रीविरूपाक्षदर्शन घेऊन विरात्र क्षेत्रीं क्रमिली उप्रात कूच जाहल त स्वामीच दर्शन जाहाल. प्रथम दिवशीं कनिष्ठ येजमानानीं दर्शन घेतलें आरले श्रीमत विरात्रपावेतो क्षेत्रीं राहिले कनिष्ठ फौजसमेत कूच करून वरहारी, कनकगिरि, केचनगुडच्या कारभारास्तव दोनतीन मजल आले त्यास वरहारी पनास ठरली गुड व कनकगिरीचाहि गुता आजउद्या उरकेल. थोरलेहि श्रीमत यात्रा करून उदयिक येतील, तदनंतर मनसबा होणे तो होईल. आदवानी, रायचूर भनुकोताल इकडे जावयाचा येक मनसबा आहे. दुसरा प्रकार, बकापूर अद्याप हस्तगत जाहलें नाहीं तपसीलच लागला आहे. खासा स्वारी फारच लांबलीं. वीस गावें येथून बकापूर राहिल. नारो शंकराचें पत्र कालच आल कीं, सा रोजाचा वाइदा किल्लेदारानें केला आहे. त्यास सा रोजीं हस्तगत जाहल तर उत्तम, नाहीं तर खासा स्वारी मावारी फिरावी लागेल म्हणोन पत्र आल होत त्यास तेहि मार्गप्रतीक्षा करावी लागते. येकूण वैशाखी पोर्णिमा तुगभद्रेपर्लीकडेच होईल. देशीं भोसल्याचे गडबडेविशीच्याहि खबरा येतात. नालजदीस ऐवज तो काहींच नाहीं असा प्रकार आह. श्रीमत राजश्री दादा फडणीस स्वामीच्या क्षेत्राहून आज्ञा घेऊन कोल्हापुरास गेले. समागमें माहादाजी विष्णु गेले. तेथून श्रीगणपति पुळें येथील दर्शनास कोंकणात

जाणार. विदित जाले पाहिजे हे विज्ञापना. गोपाळराव, मुरारराव, रास्ते सावनूरकर पठाण यास छावणीस ठेवणार. याच्याहि कारभारास आठ रोज लागतील. हे विज्ञापना.

*Mahadaji Narayan writes from the Peshwa's camp in Karnatak that the tribute from Bellari had been fixed at Rs 50 thousand and that the fort of Bankapur had not yet capitulated.*

---

*No 66]* *[28-5-1765*

नकल बा असल.

श्री

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य
राजश्री नरसोबा नाईक तांबेकर गोसावी
यासी

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार. सुा खमस सितैन मया व अल्लफ. पेठ बुधवार का पुणे येथील कमावीस तुम्हाकडे आहे. त्यांस तुम्ही विनंती केली की, साल्गुदस्ता पेठ मजकुरची घरे मोगलाचा दंगा होऊन लुटली व जळाली, त्यामुळे इस्तावियाचा कौल दिल्यास वसाहत होऊन पेठेची आबादी होईल म्हणोन. त्यावरून पेठची आबादीवर नजर देऊन इस्ताव करार झाले बितपसील:

सन आर्बा सितैन. मोगलाने पेठ सन सलासात जाळली, सा सन मजकुरी माहाल मजकूर कार्यकारण पट्टी करून वसूल करावा, सरकारात काही देऊ नये. सा माफ.

सन खमस सितैन. साल मजकुरी बा पेसजी मख्ता रूपये १२५० पौ वजा पेठेस कौल देऊन वसाहत करविली सा सूट २००.

सन सीत सितैन पेस्तर साल

| | |
|---|---|
| मख्ता रुपये १२५०. | बाकी मख्ता रूपये १०५०. |
| तपसील: | तपसील: |
| २०० तूर्त रसद | २०० तूर्त रसद. |
| ९५० हप्तेबंदी | ७२० हप्तेबंदी |
| २०० पौष | १५० पौष शुध १ |

| | |
|---|---|
| १९० माघ | १२९ माघ शुध १ |
| १९० फाल्गुन | १२९ फाल्गुन शुध १ |
| १९० चैत्र | १२९ चैत्र शुध १ |
| १९० वैशाख | १२९ वैशाख शुध १ |
| १९० जेष्ट | १०० जेष्ट शुद्ध १ |
| ९९० | ७९० |

१२९० | १०९०

येणेप्रमाणे सालगुदा सन आर्बा सितेन पेठ मजकुरी माहाल मजकुर खर्चास कार्याकारण पट्टी करून वसूल करावा. सरकारात काही बेऊ नये. माफ केला असे. साल मजकुर सन खमस सितेन साडेदाहामे रुपये व सन सीत सितैन साडे बारामे रुपये येकूण तिसाला सदरहुप्रो इस्तावा करार केला असे. करारप्रो उगवणी करून पेठेची आबादानी करणे. जार्णाजे छ ७ जिल्हेज. वार.

*¶The Peshwa grants remission of the cess to Narsoba Naik Tambeker to whom the Kamavisi of Budhwar Peth in Poona City was assigned The concession was granted owing to the Nizam's attack and depredations in the city*

---

*No 67]* *[8 6-1765*

पौ छ १८ जिल्हेज
सन सीत सितेन जेष्ट.

श्री

सेवेसी शकराजी राम विज्ञापना यसाजे. तागाईत छ १ जिल्हेज जाणून किले बकापूर वर्तमान येथास्थित असे. विशेष. किले मजकूरचे वर्तमान फत्ते जाहालियाचें साडणी स्वारासमागमें सेवेसी लिहिलें होन विदित जाहालेंच असेल. साप्रत किला हस्तगत जाहाला. येक रोज राजश्री नारो शकर राजबहादर येथे मुकाम होता. छ [पुढील अर्धा पत्र फाटलेला]

[फाटलें.]

२ घब्यालची
२ भालदार चोपदार
२०

अमलात चालत होता. हाली दिव्यास तेल मात्र देवितों. सेवेसी आज्ञा चालवणार स्वाम समर्थ आहेत.

0352

वीस आसामी ठेविले विना कामाचे
नाहीं. दस राज करार केले. जार्मान
घेऊन ठेविले.

किल्याचे खबरदारीविशी व बंदोबस्तांविशी रात्रंदिवस खबरदार आहों. सेवेसी विनंती लिहिली आहे. श्रुत होऊन उत्तराची आज्ञा करणार स्वामि समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The capture of the fort of Bankapur is reported to the Peshwa by Shankaraji Ram.*

---

*No. 70]* *[21-7-1765?*

पौ छ २४
सफर श्रावण
मास.

श्री

राजश्री दादासाहेब
गोसावी यांसी

॥ श्रीसकलगुणालंकरण अखडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेहांकित दमाजी गायेकवाड सेनाखासखेल शमशेरबहादुर दंडवत विनंती उपर. येथील कुशल जाणून स्वकीय निजानंद लेखन करीत असिलें पाहिजे विशेष. आपण पत्र पाठविलें ते पावलें. लेखनान्वय ध्यानास आला. तेथें लिहिलें कीं, हैदरनाईक यांचे पारपत्य होऊन स्वारी देशास आली. पुढें मातबर मनसबा करतव्य यास्तव येथे असावें, या गोष्टीस विलंब न करावा, ऐसें लिहिलें. त्यास इकडे आम्ही आज सातआठ मास विसानगरास आहों. येथील बंदोबस्त जालेविणा उ * * * यते? यानी मागती हिंदोस्तानचे वृत्त ऐकून मुरईकर (!) यांजकडे मातबर माणांस पाठऊन त्याजकरवीं फौज मातबर ठेवितात. पुढें बाजे बरसात त्याजला यां प्रांती घेऊन यावे. हेहि दाहा हजार फौजेनसीं आहेत. त्यास (हे) पारपत्ये होऊन या प्रांतीचा बंदोबस्त न जाहाल्यास प्रांत राहाणें कठिण हे साहेब जाणत आहेत. याचा साकल्यार्थ राजश्री रामचंद्र बसवंत विनंती करितील त्याजवरून ध्यानास येईल. सेवेसीं श्रुत होये. चिरंजीव राजश्री सयाजी गायेकवाड याची रवानगी [फाटलें.] पडल्या आज्ञेप्रमाणे सत्वर येऊन पोहचतील. इकडेहि दंगा आहे याजकरितां

विनती लिहिली आहे. आमची नजर येक साहेबाच पायासी आहे. अन्यत्र देवत नाहीं. श्रुत होये. रवाना छ २ माहे सफर. बहुत काय लिहिणे, कृपा केली पाहिजे हे विनंती.

*¶Damaji Gaikwad pleads inability to participate in the grand expedition of Raghoba on the ground of troubles within his domains*

---

No 71] [19-9-1765

श्री

तीर्थरूप राजश्री दादासाहेब वडिलाचे सेवेसी

आपत्ये माधवराव साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ता छ ३ रबिलाखरपावेतो वडिलाचे आशीर्वादे येथास्थित असे विशेष. राजश्री विठलराव सिवदेव याचे सातसे राऊत आजमासे आहेत म्हणान पहिले लिहिले होते. त्यास छावणी करावयाचा मनसुबा ठरला तेव्हा सर्वाच लोक उठउठोन देसी गेले, त्याजबराबर याचेहि लोक गेले. प्रस्तुत मारनिले सावनुरास ठेविले आहेत. याचे लोक प्रस्तुत जमा होत चालिले. सरजामाप्रमाणे राऊत सत्वरच महिनापंधरा दिवसी जमा होतील. मारनिलेविसींचा कोणेविसीचा सशय चितात न आणावा. शरसी श्रुत होय. सालमजकुरी याणी चाकरी चागली केली. दोनतीन जुजे केली. वडिलास कळावे हे विज्ञापना.

*¶Madhavrao informs Dadasaheb that the troops under Vithal Shivdeo were disbanded but would be soon remobilised "Vithal Shivdeo rendered good service this year", adds the writer*

---

No 72] [3-12-1765?

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
गोविंदपंत तात्या स्वामीचे सेवेसी

पो मलार खंडेराव सा नमस्कार विनंती. येथील कुशल ता मार्गसीर्ष वद्य शेष्टी मु शेहर हदराबाद स्वामीचे कृपावलोकनेकरून येथास्थित असो विशेष. बहुत दिवस आपणाकडोन कृपापत्र येऊन परामर्ष न जाहाला. तरी सदेव पत्रद्वारे साभाळ केला पाहिजे. आम्हाकडील वृत तरी आपण श्रीमंत राजश्री नाना आदिकरून मर्पीरलमुलुक यासी व राजश्री सोयरोपत यासी पाच

च्यार पत्रें आपण पाठविली, परंतु अद्यापि निरोप देऊन मार्गस्त करीत नाहीं. तेथें आम्हापासोन रुपये घेतले व पंचवीसा हजाराचा रोखा घेतला त्याचे बोलण्याची तो वार्ताच नाहीं. त्याणे रुपये घेतल्या खेरी(ज) अजपावेतों पांच हजारांचे खर्चाचे पेचात आलों. माणूसपण राहिले नाहीं. दैववलेतरी कीं स्वामी सारखे मुरबी असतां प्रयत्नहि बहुत करून पत्राची पुरवणी फारच केली. दुसरे, श्रीमंताचे पदरचा कारकून हे सर्व या राज्यांत ठावके जाले. दुसरे कोणाची मामलत केली नाहीं, अथवा कोणाचे हवाला घेतला नाहीं, अगर कोणापासी जबाणीहि गुंतली नाहीं. ऐसे मिऊण चालून एक श्रीमंताचे पायाचा आधारावर व स्वामी मुरबी या तवक्याणे त्या प्रांती वस्तीस राहतो. बारा महिने पुणियात राहून गरीबीनें सर्वांचे आर्जव करून काळक्षप करीत होतो. ऐसे असतां प्रारब्ध-गतीणे येथें येऊन फसलों आहों. येंदा मागाईचा समये. दुसरे, घरीं येदा दोन लग्न जरूर कर्तव्य. प्रकार तरी या गतीचा जाला आहे. परंतु येक भरवसा आहे की, स्वामी माझे रुणी आहेत. सर्वदुःखे परिहार करून उर्जिति कराल. दुसरे, या राज्यांत सर्वांस कळले कीं, मल्हार खंडेराव श्रीमंताचे पदरचा, याचे आगत्य श्रीमंत राजश्री नानास फार आहे. दुसरे याजकडे काही लांड्यां नसतां हैदरअलीनें बदमामली करून धरून रुपयेहि घेतले व खराब केले. ऐसे असतां मर्पारिलमुलकांनी अगत्य धरून थार्सा मार्गस्तहि करून देत नाहीं. तेथें पका घेतला आहे त्याचा विचार काय! लौकिकांत बोलतात कीं, हा सरकारचा कारकून, लांड्याखेरीज खराबीत आणला आहे. याचा अभिमान श्रीमंतास पटोन हैदरअलीचे पारपत्य करतील, येंस इकडीलच लोक बोलतात. त्यासी लांड्या खेरीज मजला नाहक पेचात घातले आहे, याजविसीं हैदरअलीचे पारपत्य करणेंहि श्रीमंत राजश्री नाना स्वामीस अपेक्ष्य नाहीं. दुसरे, त्याचे म्हणविल्यास त्याजकडे कोणी पाहाणार नाहीं. मी तो सरकारचा. दुसरे, माझेविसी पत्रेंहि वारंवार आली असतां हे माणीत नाहीत. त्यापक्षीं श्रीमंतास क्षेमा होणार नाहींच. पारपत्य करून, मजला खराब करून सर्वश्व नाप केला आहे तोहि भरून घेऊन त्याजपासून गुन्हेगारीहि घेतील कीं, पुढें कोणी धन्याचे मंडळीकडे व्यग्रता न पाहे. आणि यात नक्ष आहे. असो. सविस्तर श्रीमंतास श्रुत करून राजश्री गोविंदराव मामास सांगोन आपणहि ममतेनें वाटेणे बोलणे याचें पत्र मर्पारिल-मुलुक यासी व सोयरोपंतास पा पाहिजे कीं, पांच पत्रें तुम्हास आम्ही लिहिली व उभयेतां श्रीमंताणी तुम्हांस व मर्पारिलमुलुकास पाठविली असतां अद्यापि त्यास निरोपच नाहीं, तेथे येवजाचा वगैरे मार्ग होणे कळतच आहे. याजवरून

१ मानगड, मढंग.

आतां वरा आहे. सारा दिवस कसाला होत नाहीं. प्रकृत एकसारखी राहत नाहीं. औषध घेतो. दरबारास एकवेळ च्यार घटका जातो. स्वामीची कृपा माझे ठाई पूर्ण आहे तेणेकरून मजला चिंता काय? भोग आहे तो भोगिला पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Haripant to Nana Fadnis reporting the doings of the Peshwa and his vicinity to the Nizam and inquiring after the health of the addressee.*

---

*No. 75]* *[8-3-1766*

श्री

राजश्री रामचंद्र गणेश

गोसावी यांसी

उपरी. आजी शुक्रवारीं प्रहर रात्री राजश्री बाबूराव सदाशिव न पुसतां निघोन गेले. त्यास तुम्ही व चांगलीं चांगलीं पथकें पत्र पावताच जीन ठेवून त्याचा पाठिलाग करणे. मोहरीचा घांट व वांगीचा घांट दोन्ही तिन्ही घाटाची खबर आणून येक दोन दिवस पाठिलाग करून त्यास हस्तगत करणे म्हणजे तुमचे सेवेचा मजरा होईल. राजश्री आतांच निघोन गेले. तुम्ही पत्र पावतांच खासा तुम्हीं पाठिलाग करणे आणि हस्तगत करणे. जाणीजे छ २६ रमजान.

¶*Ramchandra Ganesh is asked by the Peshwa to proceed at once in pursuit of Babuji Naik and capture him.*

---

*No. 76]* *[9-3-1766*

श्री

राजश्री माधवराव रामचंद्र गोसावी यासी

मुा सीत सितैन मया व अलफ. राजश्री बाबुराव सदाशिव यांजकडील पागा व जामदारखाना वगैरे सरंजाम जत करून मोजदाद करून ठेविली आहे. त्यास सारी बाडबिछादी आणावयास सदासिव वेंकाजी कारकून याजबराा राऊत देऊन पााठविले आहेत. याचे पदरी सर्व चीजवस्त घोडी हत्ती वगैरे असेल ते बाटून घोड्यास धरावयाची माणसें वगैरे सोय करून देऊन पाठऊन देणे. राजश्री नारो कृष्ण जोसी तेथें आहेत त्याजकडे बाबूजी नाईक यांची वस्तभाव जी असेल ते त्यास पुसोन त्याजपासून घेऊन सदासिव वेंकाजी याजबरोबर पाठऊन देणे. जाणिजे.

छ २७ रमजान. आज्ञा प्रमाण. सिलेदार लोक आहेत त्यांस हुजूर पाठऊन देणे. आज्ञा करणे ते केली जाईल. भगवंतराव कडेकर याजबा फौज गाददी देऊन पाठविले आहेत याजवा सर्व चीजवस्त व सिलेदार लोक नाइकाकडील यास हुजूर पाठवणे छ माार.

¶*The property and all the belongings of Babuji Naik are ordered to be confiscated by the Peshwa's order.*

---

*No. 77]* *[9-3-1766*

पैाा छ ६ सवाल सीत
अधिक चैत्र

श्री

*सेवेसी माहादाजी बल्लाळ व नारो गंगाधर व हरि बल्लाळ कृतानेक साष्टांग नमस्कार* विज्ञापना. ताा छ २७ रमजान मुाा मनरथ वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान तर राजश्री बाबूजी नाईक छ २६ रमजानी शनवारी आवशीचे प्रहर रात्रीस दोनसे स्वारांनसी पलोन गेले. फार करून सोलापुराकडे जातील. वातनी कळतांच फौज पाठीमागे लाविली. दाहापंधरा थोर थोर पागाच पाठिलागास आहेत.

राजश्री रामचंद्र गणेश फौजसुधा आठ कोसावर राहिले होते, त्यास रातोरात चिठी गेली कीं, तुम्ही फौज घेऊन पाठीलाग करणे. त्यास ते सडी फौज घेऊन जातील. तूर्त प्रतिनिधीकडे जाण्याचा मजकूर राहिला. सारे येकत्रट जमा व्हायास आठचार दिवस लागतील. मोगल येथून सा कोसांवर आहे. त्याजकडून मीरमुसाखान सेरजंग जगंनाथ धोंडाजी काल येथे आले. आतां बोलणे हेच कीं, परस्पर रहस्य असावे, पुढे मसलत काय, हेच आहे. आज उद्यां जातील. तूर्त नाईक गेले हाच शोध आहे. पुढे जे ठरेल ते लिहून पाठऊं. नाइकाची सारी फौज रामचंद्रपंतावाा चाकरीस दिल्ही होती. दोनसें खास पागा मात्र जवळ होती. बाजिदागिरी करून गेले, परंतु पाठीलाग लवकर जाला. सांपडणे न सांपडणे ईश्वरी इच्छा. हे विज्ञापना.

¶*Nana Fadnis is informed of the movements of Babuji Naik who slunk away all of a sudden and who was therefore being pursued by Ramchandra Ganesh.*

---

*No. 78]* *[About 9-3-1766*

श्री

विज्ञापना राजश्री बाबूजी नाईक याजपासी सोलापूरचा व नंदनचा किला मागणार हें वर्तमान कर्णोपकर्णी नायेकास कळले, त्याजवरून त्याणीच किल्याच्या

चिठ्या श्रीमंतास आणून दिल्हा. सरकारचे ठाणे गेले असतां किल्ला हस्तगत न जाला हे,वर्तमान येकोन फाल्गुन वद्य त्रयोदशीस रात्री नाईक श्रीमंतास न पुसता गेले. च्यार घटकानंतर श्रीमंतास वर्तमान कळले. मागे फौजा पाठविल्या, परंतु फौजेची त्यांची गांठ न पडली. नाईक सोलापुरास जाऊन पोहोचले. मार्गी जाता कळंबांत गेले होते. दत्ताजी ठाकूर कलमचा देशमुख त्याणें नायेकास येक रात्र ठेऊन घेतलें होतें, याजकरितां श्रीमंतानी दत्ताजी ठाकूर यासी धरून आणिले. कलमांत ठाणें बसविले. यादवराव जगथाप याणें नाइकास सोलापुरास पोहचाविले याजकरितां त्यास शासन केले. नाइकाची फौज व हत्ती थोडी ठिकाणीं लागली तीं सरकारांत आणिलीं, त्याचे परगणे वगैरे जप्त केले. नाईक सोलापुरीहून हैदर नायेकाकडे गेले म्हणून वंदता आहे. श्रीमंत सोलापुराकडे फौज पाठऊन आपण ग्वासाहि च्यार दिवस त्याच शहावर जाणार असे आहे. हे विज्ञापना.

¶*The flight of Babuji Naik from the Peshwa's camp to Sholapur, and the punishment inflicted on those who sheltered him on the route are mentioned in this letter.*

---

*No. 79]* *[10-3-1766*

**श्री**

राजश्री माधवराव रामचद्र गो।

सुा सीत सितैन मया व अलफ. बाबूजी नाईक कलमांत कोंडिले आहेत. त्यास पाच तोफा नारो आनंदराव याजबा देऊन जलद पुढे रा करणे. तुम्ही गोटसुधा कूच करून बुनगेसुधा मागाहून जाऊन पोहचणे. तोफा फार जलद पाठवणे. जाणिजे. छ २८ रमजान. आज्ञा प्रमाण.

¶*Madhavrao Ramchandra is instructed to send with all possible despatch five pieces of artillery to Kalamb where Babuji Naik has been besieged.*

---

*No. 80]* *[10-3-1766*

**श्री**

राजश्री माधवराव रामचद्र गो।

सुा सीत सितैन मया व अलफ. बाबूराव सदासिव कलमात आहेत. सरकारची फौज गावाभोवती आहे. तोफा तुम्हाजवळ आहेत त्या आणावयास

१. ९-३-१७६६

रामचंद्र गणेश याणी तुम्हास लिा आहे. तर जलदीने तर्तूद करून तोफखान्या-कडील नारो आनंद याजबा तोफा देऊन जलद रा करणे. उत्तर पाठवणे. जाणिजे. छ २८ रमजान. आज्ञा प्रमाण.

¶*Madhavrao Ramchandra is asked to send without delay Naro Anant with guns as desired by Ramchandra Ganesh.*

---

*No. 81]* *[10-3-1766*

श्री

राजश्री रामचंद्र गणेश गो

उपरी. राजश्री बाबूराव सदासिव यांस कलमात कोंडिले. तुम्ही फौजसुधां भोवतें आहा. जमिदारास तुम्ही सांगोन पा की, नाइकास आमचे हवाली करणे. त्यास त्याणे सांगितले जे, माझे घरास आले, मी देत नाही, असा जावसाल केला म्हणोन तुम्हाकडून सांटणी स्वार आला त्याणे जबानी सांगितले. ऐसियास तुम्ही जलदी करून गाठिले, गावात कोंडिले, ही मोठी गोष्ट जाली. सरकारची फौज गावाभोवती उभी असतां गावकरी यांनी दर्म धरणे, ही गोष्ट कलतच आहे. तेव्हा इमान प्रमाण द्यावे ह * * * * असे राजकारण लावतील तर ती गोष्ट परिछिन कार्याची नाहीं. कोणे समई कोणती गोष्ट करावी हे तुम्ही जाणतच आहा. हा समय वचन प्रमाण द्यावयाचा नाही. परिछिन धरावे. त्याजकडील राऊत, सिलेदार अथवा सेवटचा लाहान माणूस असेल त्यास कोणी जामीन राहून आमचे हवाली करा म्हणतील तर ऐकूं नये. खाशापासून सेवटचे माणसापर्यंत सारेच बिन्हाड हुजूर घेऊन यावे; येथे आलियावर कर्तव्य ते केले जाईल. चिरंजीव राजश्री नानासमागमे फौज देऊन रवाना केले. त्यास जाते समई सांगितले तेहि तुम्हास सागतील. सारांश गोष्ट जी न व्हा(वीसी) ती जाली. याउपरी त्यास घेऊन हुजूर येणे. कदाचित गावकरी याच्याने निभावेना तेव्हा बाहेर लाऊन देतील अथवा तेच जाहाली करून बाहेर निघतील, तर तो समय सांभाळून मिठी घालून जिवंत दस्त करणें. त्यातही लोकांची दाटी जाल्यावर मग त्याचे भवितव्य असेल तसे होईल. जिवंत धरावयाचा मात्र प्रत्न होईल तो करावा. सारांश गोष्ट वचनप्रमाणास कोणासी काही न गुंतणे. लिा प्रा करणे. वर्तमान वरचेवर लिहीत जाणे. जाणिजे छ २८ रमजान.

¶*Ramchandra Ganesh invested Kalamb where Babuji Naik sought refuge and asked the headman to surrender the refugee. The latter refused. The matter being referred to the Peshwa, the addressee was instructed that his business was to take Babuji a captive and not to be deterred by any opposition.*

No. 82] [11-3-1766

पौ छ ६ सवाल सन सीत
चैत्र अधिक वा राऊत.

श्री

शेवेसी विज्ञापना. ता छ २९ रमजान मुा नजीक पोहनेर वर्तमान यथास्थित असे विशेष. राजश्री बाबूजी नाईक न पुसत गेले, हा मजकूर आलाहिदा पत्रीं लिहिलाच आहे. आपली फौज पाठीमागें लागली व रामचंद्र गणेश तिकडून धावले. त्यास रविवारी चार घटका दिवसास नाइकाची गाठ पडली. पंनास राउतानसी होते. आपली फौज पाहातांच पळाले ते कसबे कलब पा धारूर या गावांस सिरले. आपली फौज गावाभोवतीं उभे राहिले. जमीदारास सांगोन पा जे, चोर आमचे हवाली करणे. त्याणे सांगोन पाठविले की, माझे घरास आले, देत नाही. गांव वेढिला आहे. सांडणीस्वार तेथून सोमवारी सध्याकाळी आला, त्याणे सांगितले त्यावरून येथून राजश्री नाना पुरंदरे हुजुरात राहिली होती ती देऊन संध्याकाळीच रवाना केले. जिवंत धरून आणावे अशी श्रीमंत स्वामींची आज्ञा आहे. स्वामीस कळावें. पुढे आढळेल ते लिहून पाठवीन. राजश्री नारोपंत नाना पाळंदे नानासमागमें गेले आहेत. हे विज्ञापना. येथें सात आठ मुकाम होतील हे विज्ञापना.

*¶Haripant reports to Nana Fadnis details of the pursuit of Babuji Naik by Ramchandra Ganesh.*

---

No. 83] [11-3-1766

श्री

राजश्री रामचंद्र गणेश
गोसावी यांसी

उपरी. तुम्हीं पत्र पाठविलें तें पावलें. चिरंजीव राजश्री नाना फौज घेऊन येतील. तुम्ही आपले नेमणुकेप्रमाणें फौज घेऊन ज्या कामास गेला त्या कार्यास जाणे. जातां जातां पांगरी व सिराढोण हे दोन्ही घेऊन तेथील बंदोबस्त करून पुढे खानापूरच्या रोखें जाणे. पांगरी सिराढोणी आमलदार असतील ते धरून कैद करणे आणि आपले कमाविसदार काईम करणे. बाबूजी नाईक याची बातमी कोठें आहेत, पुढें उद्योग काये करितात, सोलापुरास पावले न पावले, भवानरायाकडे कागदपत्र पाठवितील याचा पुर्ता शोध करून वरचेवर वर्तमान पाठवीत जाणे. जाणिजे. छ २९ रमजान. बहुत काय लिहिणे.

*¶Ramchandra Ganesh is asked to capture Pangri and Shirdhon and to put into confinement the officers there, and to be watching the movements of Babuji Naik.*

No. 84] [12-3-1766

श्री

चिरंजीव राजश्री नाना यांसी आसीर्वाद. उपरी: यादवराव जगथाप दिा माहाराव निंबाल्कर याणीं बाबूजी नाइकांची कुमक करून काढून दिल्हे, म्हणून तुम्ही लिहिले ते कलले. ऐसियास, निंबाळकराकडील खिजमतराऊ व येशवंतराव पोतनीस आहेत त्यास सांगितले. त्याणी सांगितले कीं, ये गोष्टींचा आमचा गुंता नाही. सरकारातून बदोबस्त करावा. त्यावरून तुम्हांस लिहिले असे. तर दोनसे राऊत पाठऊन यादवराव जगथापाचे घर मांडवे व वासी व विटकूर या तीन जागामध्ये आहे ते जफ्त करून, वस्तभाव, घोडी, गुरढोरे, कुल जे असेल त्याची मोजदाद करून व मुलेमाणसे आपल्याजवल आणून हुजूर पाठऊन देणे व यादवराव यासहिं हुजूर पाा. यादवरोव जगथाप घरी नसला तर त्याचे लेक वाऊवद जे सापडतील ते पाठवावे. तीनसे राऊत समागमे देऊन बंदोवस्तीने पाठवणे. रवाना छ २० रमजान. ' धारूरकर दताजी देशमुख व त्याची मुलेमाणसें व गावांत मातवर सावकार कोणी असला तर त्याजबाा राऊत देऊन पाठऊन देणे. राा छ मजकूर. देशमुखाची वस्तभाव, घोडीपिढी, जराबाजरी, जें असेल ते हुजूर पाठऊन देणे. छ मजकूर हे आसीर्वाद.

¶*Nana Purandare is asked by the Peshwa to confiscate the property of Yadavrao Jagthap and arrest him with his relatives and family for having helped Babuji Naik in his flight.*

---

No. 85] [14-3-1766

श्री

आसीर्वाद उपरी. राजश्री रामचंद्र गणेश याची रवानगी प्रतिनिर्धाकडे करणे. मशारनिलेनी जाता जाता ढोकी व पागरी येथील ठाणी बैसऊन पुढे जावें. दत्ताजी ठाकुर देशमुख व यादवराव जगथाप यासं कबिलासुद्धा घेऊन हुजूर येणे. हरदू जणास कोणी जामीन होतील, हातीं वेतील, तर कोण्हाचे हातीं न देणें, त्यास येथेंच घेऊन येणे. अत:पर तुमचे काम तिकडे नाहीं. पत्रदर्शनीं तुम्ही फौज सुधा येणे. रवाना छ २ सवाल. बहुत काय लिहिणे ? हे आसीर्वाद.

¶*Ramchandra Ganesh is ordered to capture the villages of Dhoki and Pangri and to imprison Dattaji Thakur and Yadavrao Jagthap and not to release them on securities The writer of the letter appears to be the Peshwa*

6363

No. 86] [15-3-1766

कै(तानिक) ता छ २ स(वाल)
न यथास्थित असे विशेष. आपण छ * रमंजानची पत्रें पा ती पावोन लिहिले वर्तमान सविस्तर कळले. राजश्री नारो शंकर यानी आठ हजार रुपयाची चिठी राजश्री विष्णुपंत गद्रे याजवर लेहून दिल्ही, ती येथे राहिली होती, ती हाली पा असे. उतर पाठवावे. इकडील वर्तमान, राजश्री बाबूजी नाईक पळोन सोलापुरास गेले. याउपरी आपली फौज दोन हजार सोलापुराभोवती राहिले. नवाबाजवळ येऊन राहिले होते. त्याजकडील कारभारी येऊन बोलूनचालून गेले. ते बेदराकडे [ पुढील सात आठ ओळी मजकूर फाटण्यांत गेला आहे. ] कोणी सापडेल त्यास जत कराव(याची) मसलत आहे. कमलाकर भास्कर व दिवाकर जोसी याजविसी राजश्री कृष्णराव बलाळ व मी विनंती केली, हे फकत कादार, याजकडे गुंता काय ? बरबीर कांही जत करू नये, असे करार जाले. त्यास पत्रहि पा असे. त्याणी सरकारचे चाकर असे होऊन, नाइकाकडील दुसरे जे कोणी असतील त्यांस दाखऊन द्यावे असे केले आहे. जोसीबावांस सांगावे, चितामण नाईक ओंकार याणी उपकर्णे ठेविली याजकरितां पेचांत आले, राहटीस गारदी यांची [ पुढील मजकूर फाटला आहे. ]

¶*A mutilated letter from Haripant probably to Nana Fadnis reporting the trouble created by Babuji Naik at Sholapur.*

---

No. 87] [Recd 15-3-1766

पौ छ १ सवाल सीत.

श्री.

सेवेसी विज्ञापना. सर्वा मानकरीयांचा निमे ऐवज नालबंदीपैकी दिल्हा. महिपतराव घोरपडे यांचा ऐवज पावला नाही म्हणोन त्याचे कारकूनाचें पत्र आलें, त्यावरून खटे आहेत. महिपतरायानी चाकरी सर्वा मानकऱ्याहून अधिक केली व अबोलणा, येकनिष्ठ, सार्वकाल स्वामीचे कल्याण त्याच गोष्टी सांगत असावें, असा यांचा प्रकार असतां यांचा ऐवज न पावावयाचें कारण काय ? स्वामीची पत्रे येतात कीं, मानकरी यांचा निमे ऐवज दिला. त्यावरून आम्ही यांस सांगतो कीं, तुमचा ऐवज पावला. असें असतां याप्रो त्यांचे कारकुनाचें लिहिलें आलें. यास्तव सेवेसी विनंती लिहिली असे. वरकडाप्रमाणे याचा ऐवज पावता करून

१ पत्र हरिपंताचे.

त्यांचे कारकुनाचें पत्र यावें. वरकड मानकरी घरीं गेले त्यांला पैका स्वामींनीं दिला. मानकरीं यांपैकीं खंडेराव दरकरे व माहादजी भोसले व महिपतराव घोरपडे लोक सुधां येथें राहून, पैका पावला नाहीं, यामुळे फार खष्ट आहेत. कृपा करून याचा ऐवज पावता करून कारकुनाचीं पत्रें यावीं. महिपतरायाचा ऐवज सन आर्बाचा राहिला आहे तो देवाजयास आज्ञा करावी. महिपतराव चाकरीस फार उपयोगी आहेत. हे विज्ञापना.

¶*Haripant requests Nana Fadnis to pay off the expenses incurred by the several Sardars who exerted loyally in the Peshwa's services. Mahipatrao Ghorpade and others are mentioned as instances who had not received their dues.*

---

*No. 88]* *[15-3-1766*

नकल

### श्री

### राजश्री रामचद्र गणेश गोसावी यांसी

उपरी. बाबूजी नाईक याचे जुजदान[1] सापडले, त्यात ऐवजाची याद सापडली. त्यात साडेच्यार लक्षपर्यंत नख्त व मोहरा मिळोन सिलक आहे, तो ऐवज बारामतींसि पुरला आहे असी बातमी कळली. त्यास माहीत भुजंग नाईक व सेटी आबव जामदार आहेत हे उभयता बारामतीसच आहेत. जड जवाहीर कुल यास ठाऊक आहे. ऐमियास बारामतीचे जप्तीस नारो राम समसेरबाहद्दराकडील व माणिकराव सामराज रा। केले आहेत. त्याजवळ राऊत नाही, याजकरिता येक शाहाणा माणूस व पाचसे राऊत देऊन पत्र पावताच रवाना करणे. त्याणी नारो राम याजवळ जाऊन लिाप्रमाणे करावे. तुम्ही नारो रामास याप्रो लिहिणे. उभयतास मुळे माणसेंमुधा आधी दस्त करून वस्तभानेंचे ठिकाण लावावें. आबाजी त्रिंवक बारामतीचे फौजदार याची जप्ती करावी. वस्तभाव तेथे बंदोवस्त करून भुजंग नाईक व जामदार व आबाजी त्रिंबक यास हुजूर पाठऊन देणे. येथून हुजरे दोन रा। केले आहेत ते तुम्हाकडे येतील. त्यामच बराबर पाच राऊत देऊन आधी रवानगी बारामतीची करणे. मोलापूरचे किल्यांत जमातदार आहेत, कासीराम हजारी येक व दुसरा सुभानसिंग. दोघा माणसे जफ्ती करावी लागतात. त्यास सुभानसिंगाची माणसे कुगांव परगणे इंदापर येथे राहतात व कासीरामाची इंदापुरीच राहतात. त्यास नारो रामास लेहून हरदू जणाचीं माणसें जफ्त करवणे. त्याचे घरची चीजवस्त कुल जफ्त करविणे.

---

१ जुजदान=सुटे कागद ठेवण्याची वही

रामचद्र गोविंद याची माणसें बारामतीस आहेत ती जप्त करवणे. जाणिजे छ २ सवाल सुा सीत सितैन मया व अलफ. या कामाची जलदी सत्वर करणे. प्रतिनिधीचे वर्तमान जे येईल ते वरचेवर इकडे लिहीत जाणे. बहुत काय लिहिणें?

¶*Ramchandra Ganesh is asked to attach the whole property of Babuji Naik and to imprison the Naik's servants Bhujang Naik and Jadhav, who knew where the Naik's cash and the jewels were hidden.*

---

*No. 89]* *[17-3-1766*

पैवस्ति छ ६ सवाल

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री

रामचंद्रपंत तात्या

स्वामीचे सेवेसी·

पोष्य जगनाथ बाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल तागायत छ ५ सवाल प्रात:कालपर्यंत मुकाम कसबे मार्डी येथे वर्तमान येथास्थित असे विशेष. तुमचें पत्र काल संध्याकाळीं आलें तेव्हांच श्रीमताचीं पत्रे आम्हांसहि सांडणीस्वाराबरोबर आलीं. त्यांत मजकूर कीं, मागाहून फौज रवाना करितो, तुम्ही मजबूद ठाणें पाहोन बहुत खबरदारीनें राहाणें, पांच सात दिवसांत फौज येऊन पोंचेल. परंतु आम्ही ठाणी तीन घेतलीं आहेत, त्यांत प्यादे मात्र ठेविले आहेत. राजश्री बाबूजी नाईक याचा मनसबा आहे कीं, तोफा बाहेर काढून, ठाणीं बसविलीं आहेत हीं तोफा लाऊन मागती फिरोन घ्यावी येसा मनसबा आहे. यास्तव तुम्हांस हें पत्र लिहिलें आहे. तरी आपणांस येक दोन रोज गुंता असेल तरी पांचसें राऊत चांगले पाठऊन द्यावे म्हणजे बहुत उपयोगी पडतील. या कामास हैगै न करावी, पत्र पावतांच आधीं पांचसें स्वार रवाना करून जलद येऊन पोहचेत ते करावे. आपण लिहिलें कीं, श्रीमताची परवानगी पाहिजे, त्यास पत्र जाऊन येईतोपर्यंत आवकाश लागतो, यास्तव श्रीमंताच्या पत्राचा उजूर न करितां पांचसें स्वार सत्वर रवाना करावे. हेहि अनुकूल न पडे तरी वाईकर देवकर हे पथक आपणांजवळ आहे, त्यास निरोप देऊन आम्हांकडे जलद पाठवावें. त्याविसीं आपणांस श्रीमंतांचा शब्द लागला तरी त्याचा जाब आम्ही करूं. ऐ गोष्टीची फिकीर किमपि न करावी. बहुता अर्थी पांचसें स्वार आधीं पाठवावे. नाही तर हे पथक तरी अगत्य पाठऊन द्यावें. याउपर फौज पाठवीत नाहीं तरी ठाणी तोफा लाऊत घेतील. यास्तव पांचशे स्वार सत्वर आठ दिवस पाा. अनमान न करणें. बहुत काय लिहिणे, कृपा लोभ कीजे, हे विनंती.

¶*Jagannath Baji writes to Ramchandra Ganesh asking him to send 500 troops to prevent Babuji Naik from recapturing the places taken from him.*

No. 90] [18-3-1766

पौ छ १२ सवाल सन सति चैत्र अधिक.

श्री

विज्ञापना. ता छ ६ सवाल मुा नजीक पोहनेर वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान, राजश्री नाना पुरंदरे फौज सुधां मावारे आले. कलमांत बाबूजी नाईक होते. तेथील देशमुख धरून आणिला. बेडी घातली. ब्राह्मण आहे. यादवराव जगथाप मातबर माणूस. त्याणे नाइकास धीर देऊन काढून दिल्हे, आणि फिरोन नानांस भेटावयास आला. तो येथे आणिला. पाऊणशें वर्षांचा, शंभर जखम आंगावर होती. त्याचा शिरच्छेद केला. पुढें होईल ते लिहून पाठऊं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The letter reports the confinement of the Deshmukh of Kalamb and the execution of Yadavrao Jagtap who helped the Naik to escape.*

---

No. 91] [31-3-1766

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य
राजश्री रामचंद्रपंत तात्या स्वा-
मींचे सेवेसी

पोष्य नागो राम भागवत साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता आधिक चैत्र वद्य ५ जाणून स्वकीये कुशल लेखन करावें विशेष. आम्हीं बिडास जातेसमई आपली आमची भेटी जालीच होती. बीडचे कामकाज करून मागती श्रीमंताकडे लस्करात आलो. आपण राजश्री बाबूजी ना याजकडे स्वारीस गेला. आमची आपली भेट जाली नाही. लस्करात आठ दाहा दिवस होतो. तेथून श्रीमतानी च्यार पागा समागमे देऊन बारामतीस रवाना केले. येथे च्यार दिवस राहून नाइकाचे मुलेमाणसे घेऊन पुणियास गेलो. तेथे च्यार दिवस राहून पागा दवंडेस ठेऊन वामोरीस जाणार, हे तजवीज आहे. श्रीमत परळीस[१] दर्शन करून सत्वरच नासिकास येणार. चिरजीव राजश्री भगवंतराव याणीं वेदमूर्ति राजश्री लक्ष्मणभट नामजोसी यास पैठणाहून सासवडास मुलीस पाहावयास पाठविले होते. ते मुलीस पाहून मागती पैठणास आले म्हणोन चिर-जिवाचे पत्र पैठणाहून आम्हास आले. घटीत तो उतम आलेच होते. लस्करात

---

१ परळी वैजनाथ.

तुम्ही आम्ही आसता शोध केलाच होता. ऐशास घटीतहि उतम आलें व तुमचेंहि घरी सर्वांचे मानस की, योग घडोन यावाच. याचप्रा आमचे घरी सर्वांचे मानस ब्रह्मसूत्र आसल्यास ईश्वर योग घटवील. तुम्हासहि सासवडाहून पत्र आलेच आसेल. लग्ने वैशाख मासीं आहेत. दिवस मध्ये सवा महिना राहिला आहे. यास्तव सूचनार्थ मजकूर आपणास लिहिला आहे. जर आपला निश्चये असला तर चिरंजीव भगवंतराव यास पत्र आपण लेहून पा. तेहि आपणास उत्तर लिहितील. आम्ही घरी आसलो तर उतमच आहे. कोठे साहेब चाकरीस खावंदानी पा तर आमचा गुंता न ठेवावा. आइते समई आम्ही येऊं. तोपर्यंत साहित्य करून ठेवावे. बहुत काये लिहिणे, लोभ असो दीजे, हे विनंती.

¶*Nago Ram Bhagwat of Wamori writes to Ramchandra Ganesh Kanade on the subject of the marriage of the latter's daughter into the writer's family and incidentally mentions that Ramchandra Ganesh was pursuing Babuji Naik.*

---

*No. 92]* *[March 1766*

श्री

राजश्री माधवराव रामचंद्र गो

मुा सीत सितैन मया व अल्फ. तेथे बाबूजी नाइकाचे कारभारी यादवराव व राघोपंत पोतनीस वगैरे जे कोणी असतील त्यास पाठऊन देणे. रामचंद्र गणेश किती फौज घेऊन गेले? कोठपावेतो पोहचले? बातमी कसकसी आली? तुम्हाजवल फौज किती आहे? ते लिहून पाठवणे. नारो कृष्ण जोसी (अपूर्ण)

¶*The Peshwa asks Madhavrao Ramchandra to send to his presence Yadorao, Raghopant Potnis and others who were in the service of Babuji Naik.*

---

*No. 93]* *[2-4-1766*

श्री

सेवेसी आज्ञाधारक दादो उधव चरणावरी मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ २१ शवालपर्यंत स्वामीचे कृपेकरून वर्तमान यथास्थित असें विशेष. राजश्री बाबूराव सदाशिव श्रीमंत राजश्री रावसाहेबाचें लस्करांतून रुसोन गेले, त्यांजवर सरकारच्या फौजा रवाना जाहाल्या, तेव्हां मशारनिल्हेस लुट्रन घेतले, आणि सडे पांचसात स्वारांनिशी जाऊन किल्ले सोलापुरांत दाखल जाहाले, बाहेर सरकारच्या फौजा बसल्या आहेत, किल्ल्यांतून गोळी वाजवितात, मुलेंमाणसें सर्व जप्तींत आहेत, गांव सरंजाम सर्व जप्त केले, पंचमाहालांत राजश्री विसाजी कृष्ण याची रवानगी होऊन सडी स्वारी पुणियास गेली,

म्हणून कमत्रे बाहादरपुरा प्रगणें आशेर येथें वर्तमान जासुदानें• जबानी सांगितलें त्यावरून सेवेसी विनंती लिहिली आहे. सेवेसीं श्रुत होये हे विज्ञापना.

¶*This is a news-letter mentioning the movements of the Peshwa and Babuji Naik and the latter being shut up in the Sholapur fort.*

---

*No. 94]* *[About 2-4-1766*

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
बच्याजीपंत स्वामीचे सेवेसी

पोष्य निळो केशव खरे कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल जाणून स्वकीये लेखन केलें पाहिजे, विशेष. बहुत दिवस आपणांकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं, तरी असें न करावें. निरंतर पत्रद्वारें सांभाळीत जावें. राजश्री रामचंद्रपंत तात्या फौजसुधा पंढरपूर प्रांतें आले म्हणोन वर्तमान श्रवणात आलें; त्यास, पुढें मसलत कोण्हीकडे आहे, फौज किती समागमें आहे, राजश्री बाबूजी नाईक सोलापुरास आले, त्याच्या पाठीमागें फौज श्रीमतांनीं रवाना केली, त्यास नाईक कोठें आहेत, सरकारची फौज पा। हो कोठें आहे, हे तपशिलें लिहिलें पाहिजे. आमच्या येजमानाचे वर्तमान आपल्या श्रवणांतच आहे. त्यास प्रसंगीं तेथे तुम्हीं आहां. त्यास तात्याचा मोकाम या प्रांतें आहे किंवा मजल दरमजल पुढें जाणार? येजमानाच्या विचारें तात्याची भेट होऊन आपली स्थापना व्हावी असें आहे; त्यास, तुमचें उत्तर आल्यावरी येथून कारकून पाठवितों. बहुत काय लिहिणें, कृपा लोभ कीजे, हें विनंती.

¶*The writer Nilo Keshao makes enquiries about the pursuit of Babuji Naik.*

---

*No. 95]* *[3-4-1766*

पौ छ २७ सवाल.

श्री

सेवेसीं बाळाजी जनार्दन कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान तागाईत छ २२ सवालपर्यंत यथास्थित असे - विशेष. राजश्री

त्यांस खर्च होत आहे. येविशीची काय ते आज्ञा जाहाली पाहिजे.

याजकरितां लक्ष्मण नारायेण याणी नवे गवताची गंज जपोन राखोन ठेविली आहे. त्यास येविशीची काय ते आज्ञा जाहाली पाहिजे.

सविस्तर उत्तर पाठवावयास आज्ञा केली पाहिजे. शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Nana Fadnis submits to the Peshwa an inventory of the belongings of Babuji Naik and the contents of his Jamdarkhana confiscated by the Peshwa's order. He also mentions the arrangements that were made for supplying fodder, etc., to the horses and cattle attached.*

---

*No. 96*] [*5-4-1766*

पौ छ २४ सवाल
सन सीत चैत्र अधिक

श्री

सेवेसी विज्ञापना. स्वामीनी छ ६ सवालची पत्रे जासुदावा पा ती पावली. श्रीमंतची पत्रे श्रीमंतास वाचून दाखविली. जाव मागाहून पाठवितो. आज श्रीमंत परलीस गेले आहेत. देवळाचे जाग्याचे पत्र पाठविले, तेणेकरून संतोष जाहाला म्हणोन पत्री आज्ञापिले व सेवकास बहुमानपुरसर लिहिले तेणेकरून आनंद जाला त्यास पार नाही. येविसीची पुरवणी श्रीमंतास होती ती दाखविली. पाहून हास्य केले. स्वामी सर्वज्ञ आहेत तेथे विस्तार काये लिहिणे, आपले भक्तीनरूप श्रीमंतानी कृपा करून जागा दिल्ही. कलावे हे विज्ञापना.

¶*Haripant writes to Nana Fadnis, mentioning how very gratified the writer was at the Peshwa having kindly given the addressee the spot, viz. the Belbag, to build his temple. This request had been once refused by the Peshwa.*

---

*No. 97*] [*Recd. 5-4-1766*

पौ छ २४ सवाल सन सित चैत्र अधिक.

श्री

विज्ञापना. बाबूजी नाइकाची जफ्ती करावयाची याजकारितां राजश्री लक्ष्मणपंत देशमुख बारामतीस पा. राऊत व पाईचे लोक रवाना केले, माणसे सांपडली, उत्तम गोष्ट जाली. आपले पत्रापूर्वी येथें पत्र नारोपंताचे बारामतीहून आले होते.

१[1] पत्र गेले कीं, पुण्याहून कारकून आले आहेत, त्यांचे गुजारतीनें सर्व मानपद करून पुण्यास पाठवावे. माणसें पुण्यास रवाना करणें. लक्ष्मण-पतानीं वस्तभाव व माणसें घेऊन पुण्यास जावें, असें लिहिलें आहे. येविशी आपणांस सरकारचें पत्र गेलेंच आहे. बायकाचे व मुलांचे आंगावरील नग काढू नेत, याप्रमाणें लिहिलें आहे. पुण्यास माणसें पावल्यानंतर बंदोबस्त करावा. आपलीं पत्रें आलीं त्याचे जाब मागाहून पाठवितों. बाबूजी नाइकाकडील गांव गांव, महाल, लस्करांतून जपत जाले. बानवडीचे बागेची का मी करून घेतली त्यास मर्जीस आल्यास त्यास * * नाइकाकडेच होता म्हणोन ऐकिलें. त्यास मर्जीस आल्यास मजकूर कमाविसदारास सांगावी. बागास उपयोगीं पडेल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶The letter refers to the confiscation of the property of Babuji Naik.

---

[8-4-1766?

No. 98]

छ ८ जिल्हेज

श्री

राजश्री मोरोपंत दादा स्वामी

गोसावी यांसी

॥ऽ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्ये श्री माहेमाजी सिंदे रामराम विनंती. येथील कुशल ता। छ २७ शवालपर्यंत जाणून स्वकीये कुशललेखन करीत असिलें पाहिजे विशेष. मीर अली रजाखान वगैरे हुजूर कैदेंत होते, ते सुटोन येऊन पटणास पोहोचल्यानंतर आम्हांस हैदराने बहुमान करून जवाहर तुरा व सिरपेंच वस्त्रें देऊन निरोप दिल्हा, ते येऊन पौश वद्य शस्टी गुरुवारी सुमुहूर्तेकरून सिन्यास सुरक्षित पावलों. या उपरी श्रीमंताचे व आपले दर्शनास त्वरेनेच येत असों; कळावें. वरकड मजकूर श्रीमंताचे पत्रावरून कळेल, व सहश्रायु चिरंजीव वेंकाजी सिंदे याचे पत्रीं सविस्तर मजकूर लिहिला आहे. वर्तमान निवेदन करितील तेणेंप्रमाणें आपण बंदोबस्त करून घ्यावा. बहुत काये लिहिणें, कृपा निरंतर करीत जावी, हे विनंती.

¶Mahimaji Sindia writes that he was released and given an honourable send-off by Haidar Ali in exchange for the release of Mir Rejakhan from the Peshwa's confinement.

---

(१) २-२-१७६६.

No. 99] [पो 13-4-1766
[9-3-1766

पा छ ३ जिल्काद
सीत चैत्र थोडसे मुा.

श्री

पुरवर्णा तीर्थरूप राजश्री दादासाहेब
वडिलांचे सेवेसी

विनंती. राजश्री बापूजी नाईक यांणी हैदरनाईकासी स्नेह केला, कागदपत्र याचे त्यास, त्याचे यास, यांणी त्यांस घोड्या पाठविल्या व कांहीं राउतहि चाकरीस पाठविले, हे वर्तमान कळले तेव्हां मशारनिलेचा संशये जाला. सदरहूप्रमाणें त्याचें आंगीं लाविलें, तदोत्तर त्याजकडे दोन किले होते ते मागितले. किल्याच्या चिठ्या मशारनिलेनीं दिल्या असतां अंतस्त किले न देणें येसे किलेकरांस लिहिलें हेहि कळलें. मातबर मनुष्य, भलती गोष्ट करूं नये, यास्तव विचारेंच सांगत गेलो. राजश्री भगवंतराव व भवानराव याचा कजिया. भवानराव भगवंतरायास भारी पडले. भगवंतराव खानापुरांत, भवानराव बाहेर, त्याची कुमक करावी, फौज पाठवावी, यास्तव राजश्री रामचंद्र गणेश पांच हजार स्वारांनशी कुमकेस रवाना केले, ते साहा कोसावर जाऊन उतरले. पथकें नेमल्याप्रमाणें मशारनिलेकडे जात होती, त्यांस मशारनिलेनीं रदबदल केली कीं, आमच्या लोकांस रामचंद्र गणेश यांजबरावर चाकरीस पाठवावें, येसें गवगवा करितात म्हणोन. त्याजवरून नाईक मशारनिलेचें पथक रामचंद्र गणेश याजबरावर रवाना केलें. शिलेदार व पागा व दोन हत्ती नाइकांनीं पाठविले. हे सबब सांपडली याजमुळें लांबवालांबव करून आपण सडे पंचवीसा स्वारांनशीं राहिले. किलेकरी किले देत नाहीं येसीं पत्रें अस्तमानीं छ २६ रमजांनीं आलीं. उदईक नाइकास पुसावें, निग्रह करणें तर करावा, असा प्रकार होता. त्यास नाइकांनीं छ २६ रमजांनीं दीड प्रहर रात्रीस जीन ठेऊन पळोन गेले. बातमी येतांच पागा व पथकें पाठीस लाविलीं. त्यांनीं पिछा धारूरच्या घाटांवर करीत कळंब दत्ताजी ठाकूर देशमुख धारूरकर यांचे गांवांजवळ दृष्टादृष्टी होऊन दोन घोडीं च्यार तटें पाडाव केलीं. नाईक गावांत पंनास पाऊणशे राउतांनसी गेले. सरकारचे शेसवारों राऊत. हेहि थकले, तेहि थकले. जागांजागां चौकीस राऊत रामचंद्र गणेश यांनीं बैसविले असतां छ २७ रमजांनीं मध्यरात्रीस बापूजी नाईक सोळा स्वारांनशी कळंबांतून निघोन, आपले आपले म्हणोन, सोलापुरास गेले. सोलापुरास राजश्री जगनाथ बाजी अगोधर पाठविलेच आहेत, त्यानी ठाणेबंदी केली आहे व करितात. कळंबकर देशमुख धरून

6374

आणिला आहे. मशारनिले उपद्राप काये काये करितात तसतसा त्याचा प्रतिकार करणे प्राप्त जाहाले. हे सविस्तर वर्तमान वडिलांस कळावे याजकरितां लिहिलें असे. सारांश, बाबूजी नाइकास मातबर कारभार करणें तेव्हां सोलापुरांत बैसोन होतो येसा अर्थ नाहीं. तेव्हां बाहेर निघोन उपद्राप करतील तर बाहेर निघालियावर समजोन घेणे तसे घेतले जाईल. किंबहुना दक्षणेकडे जाऊन हैदरनाईकास मिळोन उपद्राप करतील तर तिकडे आमची मोहीमच आहे. दोवांचेंहि पारपत्य जे होईल ते केले जाईल. हे दोन्ही प्रकार न करिता किल्यातच राहून उपद्राप करितील तर पांच हजार फौज ठेऊन त्याचा उपद्राप निर्फळ होये ते करून. जरी पुंडावे न करितां स्वस्थ राहतील तर हजार पांचशें राऊत ठेऊन निश्चित राहात ते करून. सेवेसी श्रुत होये हें विज्ञापना.

*¶The Peshwa reports to his uncle (who is on his way to the north) how Babuji Naik became disaffected and how measures had to be taken to restrain him. Babuji Naik, says the letter, kept secret correspondence with Haidar Ali, and sent him presents. This naturally roused the Peshwa's suspicion and the Naik was asked to surrender the forts in his charge. While outwardly professing submission the Naik instructed his servants not to deliver the forts and himself with a few followers, managed to escape from the Peshwa's camp and shutting himself in the fort of Sholapur refused to deliver the place The letter is important in as much as it explains the causes of Babuji Naik's defection, a point which hitherto was not clear.*

---

*No. 100]* [पो *14-4-1766*

पो छ ४ जिलकाद

श्रीभवानीशंकर

श्रीमंत कृपासागर रा दादासाहेब
स्वामीचे सेवेसी •

सेवक गोविंद यादव सिधये बातमीनवीस आवरंगाबाद करद्ये जोडून सां नमस्कार विनंती विज्ञापना येसीजे. बहुत दिवस जाले, आभयेपत्र स्वामीकडील आले नाही. सेवकावर कृपालु होऊन पत्र पाठऊन तोषवीत जाणे. तेणेकरून चिताचे समाधान होईल. छ १९ माहे शवालपावेतो बातमी लिहून सेवेसी पाठविली ते वाचून पावलियाचे पत्रोत्तर पाठऊन सांभाळ केला पाहिजे. कासीद जोडिया पाच याची परवानगी देऊन सेवकाकडे रवाना कराव्या.

6375

मुकाम मनरथ तेथून बाबूजी नाईक पळोन कळम गावास रातोरात वीस कोस गेला. याचे मागे फौजा मागे पाठविल्या. कलमगावातून यादोराये जगताप याने आपली घोडी देऊन बाबूजी नाइकास इटकूरमांडव पोचाऊन तेथूनहि पुढे सोलापूरचे किल्यास पावते करून यादोजी जगताप आपल्या गावास आला. तो फौज मागे लागली होती. कलमचे देशमुखास धरले. त्याने यादोजी जगतापाचे नाव घेतले की, आमचे गावातून त्याने घेऊन गेला. ते फौज इटकुर मांडवेस जाऊन यादोजीस धरून त्याचे घराची वस्तभाव सर्व घेऊन व कलमचे देशमुखास धरून बमये कबिले व त्याची वस्तभाव हजूर घेऊन आले. यादोजीनं श्रीमंतासी जाबसाल केला, पोटचे द्यावे, पाठीचे न द्यावे; त्यास, आपल्या चरणापासी आलो, जे उतम दिसेल ते करणे. बाबूजी नाइकास पोहचविले खरे. आता स्वामीस करतव्य असेल ते करावे. त्यावरोन श्रीमंत रावसाहेबी आज्ञा केली की, याचे सिरछेद करा. आज्ञाप्रमाणे तो मुक्तीस पाठविला. बाबूनाईक सोलापूरचे किल्यात दाखल जाला. *किल्याची बंदोबस्ती करून सर्व सरंजाम किल्यात* केला. फौजेवर बाबूजी नाइकाने छपा घातला. से दोनसे माणसे स्वार मारून किल्यास दाखल जाला. पागाचा सरदार ब्राह्मण कन्हाडा तो मेल्यावर फौज माघारे फिरली. बाबूजी नाइकाची पागा धाकटे नाना याने उंट व पालखी वस्तभाव सर्व हजूर घेऊन आले. जागा जागा ताकीदपत्रे गेली आहेत की, ज्याचे गांवाचे बाबूजी नाईक निघोन जाईल, यादोरायाची गत होईल, घरदार खालसेस लागेल.

बाबूजी नाइकाचे पुत्र व स्त्री बारामतीस धरले. घरावर चौकिया बसविल्या. सोलापूरचे किल्यावर विसाजी बिनीवाला व नागोराये राहोरी वामोरीकर व आणीक सरदार पाच हजार स्वार पाठविले.

*मोरोपंत कारकून बाबूजी नाइकाचा तो धरुन आला, त्याने सर्व वर्तमान* सांगितले. सिवराम नाईक बाघोलीवाला याजवर चौकी बसविली आणि कोन्ही चुलतभाऊ बाबूजी नाइकाचा होता त्याजवरहि चौकी बसविली होती. पाच दिवस होती, मग सखाराम बापूने याच्या चौकिया उठविल्या. पैका अंतस्थ मध्यावर्तीही घेऊन उठविल्या हे वर्तमान सर्व कळले असेल. परंतु सेवकास कळले ते सेवेसी लिहिले.

जगनाथपंत व मीरमुसाखां व सेरजंग व धोंडो राम वकील व कृष्णराव बलाळ श्रीमंत रावसाहेब यांचे भेटीस आले. येक प्रहरपरियेत खिलबत जाली. जे जे मनाळब होते ते त्याचे करून कागदपत्र करून देऊन त्याजला रुखसत करून

दुसरे दिवसी रावसाहेबी कूच केले. पोहनेरजवळ गंगातीरास मुकाम केले. तेथे निंबाळकर माहाराव व जाधव चंद्रसेन भेटीस आले. परस्परे भेटी जाल्या, वस्त्रे पाघुरणे व हस्ती देऊन रुकसत करून दुसरे दिव(सीं) रावसाहेबाचे कूच होणार. पुण्यास जावे हे येक बोलवा व येक नासिक प्रांत जावे यैसे वर्तमान आहे. पुढे जे वर्तमान कळेल ते लिहून पा.

निजामआलीने धारू(र)चा किला पाहून हैद्राबादेस जाणार आहे. नबाबाची इतराजी दारकवाईवर आहे यैसे दिसोन येते. बीड माहाल जप्त करावा यैसा हेत नबाबाचा आहे.

सदासिव रामचंद्रास नबाबानी सागून पाठविले की, आवगाचा किला आम्हास द्या. त्यावरोन सदाशिव रामचंद्राने किल्या(स) सरंजाम करून खबरदार जाला. किला बळकाऊन बसला. . नबाबासी व सदासिव रामचंद्रासी चित शुध नाही. सर्व सरदार बेदिल जगनाथपंताने केले.

साहेबजादियास येलंग दलाकडे फौज देऊन रवाना करणार.

महमद आलीखा आरकाटचा सुबा व फिरंगी यैसे बाजवाडास आले हे खबर नेमिदास साहुकार याचे दुकानी आली ते सेवेसी लिहिली. पुढे जे होईल ते लिहू(न) पा

शाह नवारजंगाने इकड धामधूम मांडली आहे. पाच हजार स्वार, च्यार तोफा, त्यापासीं. फुलवारी वगैरे परगम्यांत खंडणी घेतो. . गोदरी लुटली.

राजाराम बाबूराव हे फौज ठेवितात, याचा कार्य इरादा आहे तो कललियावर लिहून पा.

जाणोजी भोसल्यासी व नबाबासी भेटी जाल्या नाहीत, या उभयेताचे मध्यावर्तीत इसमाइलखा होता. रंगोपंत वकील होता तो मेल्यावर तो मजकूर तसाच राहिला. जाणोजी भोसले इनामपुराकडे गेले. कळावे हा विा.

हैदर नाइकाने फोजचा जमाव केला. महमद अलीखा व फिरंगी व पठाण बसालतजंगास समागमे घेऊन हैदराबादेस यावे हा त्याचा मनसुबा आहे.

¶*This is an important news-letter from Govind Yadav to Raghunathraa describing the pursuit of Babuji Naik by the Peshwa's forces and the stern punishments inflicted by him on his partisans. It should be noted that Chandrasen Jadhao is mentioned as still living.*

No. 101] [15-4-1766

श्री

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य
राजश्री रामचंद्र गणेश गो

सेवक माधवराव बलाळ प्रधान नमस्कार उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत जाणे विशेष. तुम्ही गोपाळ नाईक तांबेकर यांजपासून वीस हजार रुा घेऊन पुण्यास राजश्री बाळाजी जनार्दन यांस लिहून पाा कीं, हे वीस हजार रुा नाइकास द्यावे व दुसरे पंनास हजार रुा खर्चास पाठऊन द्यावे; नाही तर तुम्हाजवळ येऊ, म्हणौन तुम्ही यास लिहिले. त्याणी लस्करांत लेहून पाठविले. ऐसियास पुण्यास ऐवज नाही. त्यांचीच खर्चाची वोढ. असे असता तुम्ही चिठी केली ही गोष्ट अपूर्व आहे. व दुसरे पंनास हजार पाठवणे म्हणौन त्यास लिहिले, याचा अर्थ काय ? तुही तिकडे फौजसुधा गेला आहा. राजश्री भवानरायांचे बंडात मिळाले असतील त्यांची ठाणी घ्यावी, मुलूक जप्त करावा, पैका मेळवावा, पोट परभारे भरावे. असे जाते समई सांगितले असतां पुण्यास चिठ्या करितां हे काय ? पुण्यास ऐवजाची चिठी न करणे. तिकडील बंडांत मिळाले आहेत त्यांचा मुलूक जप्त करून पैका मेळऊन फौजेस रोजमरा देणें. पुण्यास ऐवज आहे नाही हे तुम्ही जाणतच आहा. जाणिजे. छ ५ जिलकाद सुा सीत सितेन मयां व अलफ. बहुत काय लिहिणे.

¶*The Peshwa gives Ramchandra Ganesh a strong reprimand for writing to Poona for money and asks him to raise it by confiscating the property of persons who had joined Bhavanrao.*

---

No. 102] [17-4-1766

श्री

राजश्री बाळाजी जनार्दन
स्वामी गोसावी यांसी

विनंती उपरी. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. राजश्री बाबूजी नाईक यांजकडील वस्तभाव सरकारांत ऐवजसुधा आली. त्यास वस्तभाव होती ती दिल्ही नाही. त्याचा निकाल राजश्री गोविंद सिवराम याचे विचारे जाला, त्याप्राा करून निकाल करून दिल्हा म्हणौन लिहिले व त्याजकडील ऐवज जिनस आला त्यास ऐवज लाऊन दिल्हा, येविसीची याद तपसीलवार पाठविली ती पावोन लिहिले वर्तमान

सविस्तर कळले. तोडमोड करून निकाल काढिला, उत्तम गोष्ट केली. नाईक बारामतीस आहेत. वर्षप्रतिपदेस गंगातीरास टोक्यास जाणार. तेथे दोन महिने राहाणार म्हणौन लिा ते कळले. रा छ ७ जिल्काद बहुत काय लिहिणे ? हे विनंती.

*¶Peshwa Madhaorao expresses to Nana Fadnis his pleasure at the successful termination of Babuji Naik's dispute reported by the latter.*

---

*No. 103]* *[Recd. 22-4-1766*

पो छ १२ जिल्काद
सीत चैत्र

श्री

विज्ञापना. स्वामींनी पत्र पा ते पावले. सरकारचा खलिटा श्रीमंतांनी अक्षरशा वाचून पाहिला. जाब त्याहाद्वयास मजला सांगितला की, माझे चितात ये गोष्टीचा संशय कांहि नाहीं. नानांनी इतका इतिहास कशावरून लिहिला ? मी विनंती केली कीं, कदाचित स्वामींचे चितात संशय येईल याजकरितां तपसीलवार वर्तमान कळवि म्हणोन लिा. उत्तर सरकारचें आहे त्यावरून कळेल. सारांश गोष्ट, आपलेविसी श्रीमंत दुसरा विचार जाणतच नाहीं. हे विज्ञापना.

*¶Haripant reports to Nana the words of the Peshwa on the receipt of his letter. The Peshwa said " Why should Nana write such a long explanation when I have not any suspicion in my mind about him ? "*

---

*No. 104]* *[Recd. 22-5-1766*

२ पुरवणी
पैा छ १२ जिल्हेज.

श्री

सेवेसी पाडुरंग कृष्ण गोडबोले सा नमस्कार विज्ञापना. इकडील वर्तमान तर श्रीमंत राजश्री रावसाहेबांची स्वारी हाली मनूरथाकडे आहे. मोगल भागानगराकडे जाणार. राजश्री बाबूराव सदासिव याजकडे वंदनचा किला व सोलापूरचा किला सरकारात घेतला, त्यास सोलापूरचा किल्यास सरकारचे लोक गेले आहेत. त्यासी

१ पेशव्याच्या नांवचा सरकारी खलिटा.

नाईक मारनिलेनी गोली वाजविली, याप्रा वर्तमान आलियावरी नाईक मारनिले रात्रीस तयारी करून सडे स्वार मात्र दोनतिनशानिसी .पलोन गेले. मागाहून सरकारचे लोक गेले, त्यास फौजे कलंब पा बीड येथे आढलेले. परंतु मौजे मजकुरात गेले. तेथील पाटिलाने सोलापुरास काढून दिल्हे. यावरी पाटिलाचे डोके मारिले व घरदार जप्त केले. बारामतीस चौकी पा आहे. श्रीमंत राजश्री राव-साहेब श्रीगोंदेस येणार होते, परंतु हे मसलत लांबली म्हणोन तूर्त येणेहि अवकाशावरी आहे. रा गोपालराव गणेश याणी राजश्री आपाजी गणेश याचे फौजेवरी दगा करून छपखुन[+] करून काही लोक लुटिले व बाकीचे पलोन गेले. मारनिले तो फोजेतू(न) दमाजी गाईकवाड याजकडे गेले होते. मागे हे वृत जाले. येणे प्रो नासिकात वर्तमान आले. जवारचे राज्यास त्याचे भावाबंदानी दगा करून जिवे मारिले. आसमंताद् भागे जवार प्रांती धामधूम करितात. अणकाई ठणकाईकर याणे किल्याभोवती धामधूम केली आहे. पाटील धरून नेऊन नागवितो. वाटेने मार्ग मारितो. साहुकार वगैरे मार्गी येवजसीर दाहा पंधरा कोसी असल्यास दगा करून धरून किल्यास नेऊन मालमवेसी वेऊन खंडहि घेतो, याप्रा हे गडबड करितात. वरकड वर्तमान यथास्थित आहे. जाले कलले ते सेवेसी लिा आहे. स्वामीचे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. बाबू भागवत सौ मातुश्री बाईसाहिबासमागमे स्वामीकडे आज्ञेप्रा येतच होता, परंतु स्वारी राहिली यास्तव चांगली सोबत मिलेतोपर्यंत राहिला आहे. परंतु बाबूची साहेबापासी विनंती आहे की, जर चांगली सोबत लवकर न मिलाली तरी पुढे सौ मातुश्रीबाईसाहेबाची स्वारीसमागमे यावे तोपर्यंत आनंदवलीस देवासंनिध चाकरी करावी. तरी साहेबांचे मर्जीस आले तर कृपा करून याचे विनंती ध्यानात आणून आज्ञा करणे ते केली पाहिजे हे विज्ञापना.

¶*Pandurang Krishna Godbole reports, to Nana Fadnis the doings of Babuji Naik and the scuffle between Gopalrao Ganesh and Appaji Ganesh in Gujarat.*

---

*No. 105]* *[23-5-1766*

**श्रीव्यंकटेश प्रा**

पुा श्रीमंत राजश्री रावसाहेब

स्वामीचे सेवेसी

विनंती उपरी. छ १३ जिल्हेजी श्रीमंताकडून सांडणीस्वार आले व जोडीहि आली. त्यांत मजकूर, धोंडोपंत यास आज्ञा होती की, कसेंहि करून नवाबाचा

+ Secretly.

मुकाम करवणें अगर माघारे नबाब कूच करून कृष्णातीरास येत येसें केल्यानें तुम्ही येकनिष्ट सेवक, येसें बहुता प्रकारें लिहिलें होतें; व त्याच अन्वयें नबाबास व रुकनुदौला(स) पत्रें खालिते होते, . त्याचे जाब दिल्हे. त्यांत अन्वयें पूर्वंवत प्रमाणेंच लिहिला. मिकनखान व राजाराम गोविंद श्रीमंतापासून स्वार होऊन इकडे जाबसालाकरिता निघाले आहेत. आज उद्या येतील. येथें आल्यावर त्यासी उत्तरें कशीं करितात तें पाहावें. सर्व लक्ष रुकनुदौला आपल्याकडे ठेवितात. आपले विचारा शिवाये नाहीत. जें करणे ते कायम तेंच करावें. ज्यात पेच याजवर न ये व आपणावरही न ये ते मजबुतीनें करावें. दुसरे विचारात पडों नये. जे करणे ते बळकट करावें. इकडील गुंता किमपि राहिला नाहीं. हें विनंती छ १४ जिल्हेज. हे विनंती.

¶*The Peshwa is informed of Raghoba's attempts to arrange that the Nizam does not march onwards or, preferably, returns to encamp on the river Kistna.*

---

*No 106]* *[31-5-1766*

पो छ ३ मोहरम सबा जेष्ट.

श्री

सेवेसी हरि बलाल कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता। छ २१ जिल्हेज मु।। नजीक चित्रदुर्ग वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान, श्रीमंत येथें आले. दोन च्यार दिवसात तुंगभद्रेवर जाऊं. दरमजल पुण्यास येत असेत. कळावें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Hari Ballal informs Nana Fadnis of the movements of the Peshwa's army on his return journey from the South*

---

*No 107]* *[15-7-1766*

बडणी रु. नं.
५१२.

श्री

यादी राजश्री बाबूराव सदासिव याजकडील कलमे सु।। सबा सितैन मया व अलफ.

| | |
|---|---|
| आपली वस्तभाव घोडी व हती व उंटे व गुरे व कापड व पैका व दाणा व भांडीं वगैरे सुतळीचा तोडा आदीकरून जे आणिले असेल ते माघारे द्यावे. काही ठेऊ नये. कलम १ | आपल्यामुळें यादव जगथाप व दताजी ठाकूर वगैरे याची वस्तभाव घोडी व मुलेमाणसे, वतन, पैका जो घेतला असेल तो माघारा द्यावा. जप्ती मोकली करावी. कलम १. |

जफ्तीमुळे सरकारात वस्तभाव कुल जी आली असेल ते जरात्राजरा देविली जाईल. जफ्तीमुळे वस्तभावेची तसनस जाली असली तर चौकसीमुळे ठिकाणी लागल्यास ताकीद करून देविली जाईल. येणेप्रो करार.

कमावीसदार व सोहिरेधाडरे व चाकरलोक यांची वस्तभाव पैका घेतला असेल तो जराबाजरा माघारा द्यावा. त्यांस सोडावे. जामीनकतबे माघारे द्यावे. कलम १

सरकारात आले असेल ते माघारे द्यावे. त्यास सोडावे. कतबे जामिनापासून घेतले असतील ते माघारे द्यावे. येणेप्रो करार.

मागील हिसेबाचा लाझ्या आपल्यास पुसूं नये. हिसेब पावल्याचे अभयपत्र देऊन हरयेक जागा पोट भरावयास निरोप द्यावा कलम १

सदरहूप्रो तुम्ही विनती केली त्यावरून तुम्हास कवज दिल्हे असे. तुम्हाकडे लाल्या नाही. येणेप्रो करार.

जोवसालास रामचद्र गोविंद व दाहा पांच कारकून येतील त्यास अभये असावे कलम १

जावसालासाठीं यावे. उत्तम आहे. येणेप्रो करार.

सरकारांतून जफ्ती झाली असेल ती मोकली करावी. त्यांस सोडावे. वस्तभाव आली असेल ती माघारी द्यावी. येणेप्रमाणे करार.

सरकारचीं कलमे :

१ सोलापूरचा किला सरकारांत आल्यापासून आजपर्यंत जकिरा व जगी सामान असेल ते कुल सरकारचे, त्यासुधां किला सरकारांत द्यावा. माध्यस्ताचे हवाली करावा. तुमची वस्तभाव माध्यस्थाचे हवाली करावी. किला हवाली जाला म्हणजे कारारप्रो वस्तभाव फारखती द्यावी.

१ सरकारचे सिलेदाराची वगैरे घोडी वस्तभाव जी नेली असेल ती सोडून द्यावी. सोलापूर व अहीररवाडी येथील तालुकियाचे पाटील व लोक नेले असतील ते सोडून द्यावे.

१ नवद हजार शो तिगस्ता कर्नाटकचे स्वारीस सरकारात घेतले आहेत ते मागू नयेत. खते माघारे द्यावे.

---

३

येणेप्रो तीन कलमे करार

छ ७ सफर आषाढ मास

¶*Babuji Naik, on his defeat, enters into an agreement with the Peshwa; the terms of the agreement accepted by the Peshwa are also given in this paper.*

---

१ रहानमोठी. २ मखलाशी हरिपताच्या हातची असून 'करार' मोरल्या रावसाहेबांच्या हातचा. ३ लफट.

No. 108] [11-12-1766

पो छ १२ रजब सन
सबा सितैन.

श्री

सेवेसी विज्ञापना. ताा छ ८ रजबी मुाा नाशेरं वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान श्रीमंत या मुकामास आल्यास दोन दिवस जाले. श्रीमत सौभाग्यादिसंपन्न मातुश्री रमाबाई आज येथे येतील. या तलावर आणखी येक दोन मुकाम होतीलंसे दिसते. पुढे सुरापूरचा रोख आहे. राजश्री बापूजी नाईक याजकडील राजकारण लागले आहे. सिधीस जाईल तें सेवेसी लिहून पाठऊ. बरकड नवल विशेष लिहिजेसे नाही. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Haripant Phadke writing to Nana Fadnis communicates the movements of the Peshwa marching towards Surapur.*

---

No. 109] [13-12-1766

श्री

तीर्थरूप राा दादासाा वडिलांचे सेवेसी

आपत्ये माधवराव साा नाा विाा येथील कुशल ताा छ १० रजब मार्गसार सुध द्वादसीपर्येत वडिलाचे आसीर्वादेकरून येथास्थित असे विशेष. सांप्रत वडिलाकडून आसीर्वादपत्र येऊन वर्तमान कलत नाही, तरी सविस्तर ल्याहावयास आज्ञा केली पाहिजे. इकडील वर्तमान तर नबाव निजाम अलीखान भागानगरीच आहेत. फिरंगियाचा त्याचा तह जाहाला. हैदरखान कोयेमतुरास कोटग व अनंतसेनच्या राज्याचे शाहावर आहे. त्याजकडील मीर फैजुला व मीर रेजा फौज आठ सात हजार, बारा हजार गाडदी व तोफखाना घेऊन फिरतो. त्यानी गुमनाडपाले घेऊन तेथे ठाणेबंदी करून रायेदुर्ग प्रांते आले. बलारी, रायेदुर्ग हरपनहली, चित्रदुर्ग वगैरे संस्थानास पैका खंडणीचा मागतात. राज्य खराब करू म्हणोन लिहिले, त्याजवरून कुल सस्थानिकानी पत्रे पाठविली कीं, उपराला करावा; नाहींतर येवनाक्रांत संस्थानें होतात म्हणोन, त्यास तेथून फौज पाठऊन उपराला करावयास फौज कोठे आहे? जे आहे ते वडिलास विदित असे. उगाच दबा(ब) टाकीत आम्ही कृष्णातीरास जातों. या दहशतीने हैदरखानाचे सरदार निघोन गेले तर उत्तम आहे. केवल राा गोपालराव गोविंद व रास्ते याचेच

---

+Near Pandharpur.

दबावानी ते जातील असा प्रसंग नाहीं. पुढे होईल ते वर्तमान सेवेसी लेहून पाठऊन. महंमद अलीखान व इंग्रेज चेनापटणास आहेत. भोसले नागपुरास आहेत. वडिलाकडे फौजेची निकड याजकरिता भोसल्यास व रा दामाजी गाईकवाड यास वरच्यावरी पत्रें पाठवितो. हाली कारकून पाठविले आहेत, ते उभयेतास निकड लाऊन वडिलाकडे रवाना करितील. वडिलाकडूनहि उभयताकडे पत्रे व हरकारे येतच असतील. अत:पर ते उभयेता येऊन पोहोचतील. भोसल्याचे पत्र हिंदुस्तानाम जातों म्हणोन आले होते. नवाबानी रा कृष्णराव बलाळ यांस बोलाविले त्याजवरून मारानिलेस नवाबाकडे रवाना केले, तो मजकूर दोन तीन पत्री सेवेसी लिहिलाच आहे. मारानिलेस नवाबाजवळ पाऊन पत्र अद्याप आले नाही. मारानिले नवाबाकडील मजकूर लिहितील तो सेवेसी लिहून पाठऊन. वडिली तिकडील वर्तमान वरचेवरी लिहावयास आज्ञा करीत जावी. त्या प्रांतीचे वर्तमान आपल्याकडील कलत नाही. त्यास वडिली आज्ञा करून त्या प्रांतीचे वर्तमान लिहावे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*The Peshwa Madhavrao writes to his uncle Raghunathrao that he intends to march into Karnatak to resist Haidar for levying contributions from the Chiefs of Bellary, Chitradurg and other places which were under his protectorate; he also states that Damaji Gaikwad and Janoji Bhonsle are directed to proceed towards the north to join the addressee; the movements of the English and the Nizam are also alluded to.*

---

*No. 110]* *[16-12-1766*

पौ छ १८ रजब सबा
मार्गसीर्ष बा यमाजी
खिजमतगार

**श्री**

सेवेसी हरि बलाल कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता छ १३ रजब मु॥ होनूर पा॥ जत स्वामीचे कृपेकडून वर्तमान यथास्थित असे विशेष. पा॥ इंदापूर येथील फडशा जाला, त्या यादी आपणाकडे पाठविल्या आहेत, त्यावरून कलेल. पांच यादीपैकी येक ताकीदपत्राची याद होती ती येथे ठेविली; नकल करून पाठविली असे. राजश्री कमलाकरपंत याजपासून दाहा हजार रु॥ घ्यावे, याप्रो करार जाला. राजश्री बापूनीं रजबदल फार केली, त्यावरून इतका फडशा

---

१ पैवस्ती नाना फडणिसाची. २ पत्र हरीपंताचें

जाला. नाही तर मोठ्या घोलांत पडते. राजश्री माधवराव मामो निगेप घेऊन पंढरपुराकडून पुण्यास .गेले. कोकणचे हिसेब पाहावे म्हणौन आज्ञा जाली. सैरंजाम पांच हजाराचा धावा म्हणौन गतवर्षी करार केला होता. त्यास गाव दिल्हे नाही. पांच हजाराची वरात इतलाख बालोबावर दिल्ही. पुढील सालापासून पाच हजार इतलाख येकाधे माहाल्याकडे लाऊन द्यावे, याप्रों करार जाला आहे. कलावे. वरकड इकडील वर्तमान सोलापुराकडील रसायण लवकर होइलसे दिसत नाही. दरमजल सुरापुराकडे जात असेत. कलावे, सेवेसी श्रुत होय, हे विज्ञापना. बाबूजी नाइकाचा सला होत नाही. लाख रुा जाजतीस, साठ हजार पागा, हे कबूल जाले, परंतु ते ऐकत नाही असे जाले. पुढे होईल ते लिहू. हे विज्ञापना.

¶*Haripant reports to Nana the disposal of several matters effected by the Peshwa and the failure of the negotiations with Babuji Naik.*

---

*No. 111]* *[20-12-1766*

पो छ २१ रजब सन

सबा सितैन बा मुराद सांडणीस्वार

श्री

विज्ञापना. ताा छ १७ रजब मुा मौजे इभरामपूर पाा हिपरगे वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान आज कूच जाले. सुरापूरकराचे तालुक्यात मुकाम होईल. त्याजकडील वकील आले आहेत. बाबूजी नाइकाचे पहिले बोलणे आपणास लिहिले होते. त्यास नाईक म्हणतात कीं, आमचे घोड्यास खर्च लागला तो आमचे पैक्यात वजा करूं नये व पन्नास हजार सिबंदी सा महिन्यात पडली ती द्यावी. त्यावरून श्रीमंतांनी कबूल केले. रामचंद्र कृष्ण लिमये सोलापुरास पाा आहेत. बोलून आलियावर सेवेसी लिहून पाठऊ. उभयेतामध्यें ज्याची गाठ पडत्ये त्यास पुसतात की, नाना ये समई काय करीत असतील. कलेल ते ते समई जाबसाल करीत असतो. नित्य कृत्याचा प्रकार कोठवर काय ल्याहावा? विदित व्हावे हे विज्ञापना.

¶*Haripant reports to Nana Fadnis the agreement effected with Babuji Naik by the Peshwa, whose stern and inquisitive nature is incidentally alluded to.*

---

१ पेठ.

No. 112] [22-12-1766

पौ छ २९ रजबू

## श्रीशंकर

श्रीमंत राजश्री नाना फडणीस
साहेबांचे शेवेसी

विनंती शेवक नारो नरसिंह कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती प्रार्थना येसीजे. येथील वर्तमान ता। छ १९ रजेब मो। कुंभारी नजीक सोलापूर जाणौन सेवकाचे वृत येथास्थित आसे विशेष. विनंतीपत्रे सेवकानें पाच सात सेवेसी पाठविली, परंतु येकहि आज्ञापत्र सादर न जाहाले, तेणेकडून सेवकाचे चित्त परम खिन्न जाहाले आहे. आज्ञेप्रो आजपर्येंत रा। रामचेंद्रपंतासमागमे आहो. ज्याप्रमाणे आज्ञा त्याच बरहुकूम आजपर्येंत आहे. प्रस्तुत श्रीमंताची खासा स्वारी विजापूर प्रांतीं आहे. राजश्री नाइकाचा विवेक व्हावा यैसे दिसते. दिडा लक्षाची जाहगीर द्यावी, दरम्यान राजश्री गोविंद सिवराम व विसाजी कृष्ण याणी यावे, नाइकास घेऊन श्रीमंताकडे जावे, आनकूल पडल्यास सदरहूप्रा। जाहागीर घेऊन असावे, हे नच पुरे तरी किला सरकारात देऊन आपली चिजवस्त जरावेजरा घेऊन जावे, येणेप्रमाणे तह ठरला आहे. याच आन्वये ठरल्यास पुढे काये व्होईल ते पाहावे. शेवक तो येकनिष्टने आजपावेतो आहे. येथील मजकूर आवघा सिबंदीचा वगैरे बारीक मोठा[1] सेवेसी आल्यानंतर विज्ञेप्ति करीन. जातिनिसी रामचंद्रपंत भलेच आहेत. परंतु प्रांतीचे कानड लोक ब्राम्हण मोठे कारस्थाई आहेत. सर्व गोष्टीने भलच आहेत. अवघा लटका कारभार करितात. स्वामीची तो मजला आज्ञा जे, आज्ञेसिवाय न यावे. याजस्तव विनंती लि॥ आहे. श्रीमंत राजश्री दादासाहेब यांजकडील नेमणुकीचे कारकून व हवालदार आले आहेत. आम्ही कार्याकारणे कमीजाजती सिबंदीचा धोरेवा[2] धरून आहो. पुढे ज्याप्रा। स्वाम आज्ञा करतील त्याप्रा। वर्तने. सेवेसी श्रुत होये. मजला तो सर्व प्रकार आधार आश्रा चेरणाचा पूर्वीपासोन आहे. हे विज्ञापना.

¶*Naro Narsinh reports to Nana Fadnis that an agreement had been effected between the Peshwa and Babuji Naik.*

---

१. लहानमोठी. २. धोरण.

*No. 113]* *[25-12-1766*

पौ छ २८ रजब बा

आरफ मा सांडणीस्वार

श्री

सेवेसी[1] विज्ञापना. ता छ २२ रजब मुा नजीक सुरापूर वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान सांडणीस्वारा बा लिहून पाठविले, त्यावरून कळलेच असेल. राजश्री बाबूजी नाईक यांजकडे सोलापुरास साडणीस्वार पाठविला आहे, तेथून उतर येईल ते लिहून पाठऊ. सुरापूरचे खंडणीचा जावसाल लागला आहे. करारात येईल ते लिहून पाठऊ. साल गुा मोगलाकडील सवारजंग याणी सरकारचे माहालापासून पैका घेतला, त्याचे रुजुवातीस निळोपंत पानसी पा होते. त्याणी तेरीज धरून आणिले ते दफ्तरात आहे, त्याची नकल करून पाठवावयास आज्ञा करावी. वरकड कागदपत्र पेशजी लिहिल्याप्रो निकड करून पाठवावें. श्रीमंत राजश्री बाबांची[2] शरीर प्रकृत कसी आहे, श्रीमंत रा दादा[3] कधी निघोन येणार, ते लिहिले पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Haripant Phadke writes to Nana Fadnis, reporting the doings of the Peshwa in his tour and inquiring after the health of Baburao Phadnis and his son Moroba.*

---

*No. 114]* *[26-12-1766*

पौ छ २९ रजब सन

सवा सितैन

श्री

श्रीमंत राजश्री नाना फडनीस साहेबाचे

सेवेसी

चरणरज आज्ञांकित महादाजी चिंतामण सा नमस्कार विज्ञापना. तागाईत छ २३ माहे रजबूपावेतो मुा मंगळवेढ येथे साहेबाचे कृपेकरून सुखरूप असो विशेष. राजश्री बाबूजी नाईक याचे वर्तमान तरी, श्रीमंताकडून आपाजीपंत व रामचंद्रपंत पंढरपूरकर हे लस्करातून कुमठेनजीक विजापूर च्यार कोश तेथून रवाना होऊन सोलापुरास गेले. त्यास तहेरहचा प्रकार तरी, अडीचशे घोड्यानशी चाकरी करावी, सिगेवण द्यावे, खेरीज खासगी सरंजाम लाख रुपयाचा आहे तो द्यावा, बारामती द्यावी आणि लस्करातून गोविंद सिवराम तात्या याणी व राजश्री विसाजी कृष्ण यानी किल्यास येऊन भेटीस श्रीमंताचा

---

१ पत्र हरिपंत फडक्याचें. २ बाबूराव फडणीस. ३ मोरोबादादा.

घेऊन जाणे, दरम्यान विसाजीपंतास घ्यावे, याप्रो करार होऊन आपाजीपंत व रामचंद्रपंत किल्यातून श्रीमंताकडे गेले आहेत, याप्रो वर्तमान आहे. शेवकाचे वर्तमान तरी, राजश्री हरिपंत तात्या यानी लस्करातून रुपये ५०० पाचशे खर्च पाठऊन दिल्हा आहे. साहेबानी पुणियाहून गाडदी याचे रोजमरे रुपये १५०६॥।. पंधराशे पावणेसात पाठविले, त्यास गाडदी यानी लस्करात रोजमरे घेतले. त्यास लस्करातून हरिपंत तात्यानी चिठी पाठविली की, तुम्ही रुपये याजला न देणे. आम्हाकडे पैका पाऊठन देणे. त्याजवरून तो यैवज हरीपंत तात्या याकडे पाठविला. येथे मावले लोक आा ५० पनास चाकरीस आहेत. त्यास त्याची रोजमरार्चा नेमणूक रामचंद्र त्रिंबक याजवरी जाली आहे. त्यास लोकानी आजतागाईत येथे मंगलवेढात चाकरी केली, याकरिता रामचंद्र त्रिंबक रोजमरा देत नाही. येथे लोक उपासी मरतात, म्हणून पनास साठ रुपये खर्चावयास आम्हाजवल घेतले आहेत. त्यास रोजमरा तेथून पाठऊन यावयाची आज्ञा जाली पाहिजे. नाही तरी रामचंद्र त्रिंबक याजला ताकीदपत्र की, यांचा रोजमरा हजरी घेऊन यावा. चाकरी येथे जाली आहे. आणि आपलीहि आज्ञा आहे की चाकरी मुलामाणसापासी करावी, याजकरिता दया करून रोजमरे अथवा ताकीदपत्रें पाठविली पाहिजे. रोजमरे दोन भरले आहेत. सनदेप्रो रोजमरे यावे म्हणून ताकीदपत्राची आज्ञा जाली पाहिजे. येथे आम्हास रोजमराविशई तंत्री लावितात; याकरिता दोहीतून येकाची आज्ञा जाली पाहिजे. येथे जासूदजोड्या ५ पाच आहेत, त्याचे रोजमरे कोणाचा एक कोणाचे दोन भरले आहेत, त्यासी रोजमरेची आज्ञा जाली पाहिजे. येथे गवत मिलत नाही, किलेदार काही देत नाहीत याकरिता गवत कुरणात देणे. ठाणेदारास ताकीदपत्राची आज्ञा जाली पाहिजे. शेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

¶*Mahadaji Chintaman writes to Nana Fadnis communicating the terms offered to Babuji Naik, and asks supplies of money to pay his troops.*

---

No. 115] [Recd. 27-12-1766

पौ छ १ साबान
हा सेख न्यामत साडणीस्वार

**श्री**

राजश्री बालाजी जनार्दन
स्वामी गोसावी यासी

विनंती उपरी. राजश्री बाबूजी नाईक यांणीं सोलापुरचा किला सरकारांत देऊन हुजूर दर्शनास यावे याप्रमाणें करार जाला. त्याजकडे राजश्री विसाजी

कृष्ण याची रवानगी केली. त्यास नाइकाची चीजवस्त सरकारांत आली, त्यांत आंजमासे एक लक्ष तेरा हजार रुपये त्यांचे नक्त द्यावयाचे ते तूर्त दिल्हे पाहिजेत. ऐसियास, पेशजी पुणियांत स्वारी असतां एकंदर जमाखर्चाचा अजमास समजाविला ते समई बाबूजी नाइकाचे ऐवजास पाऊण लक्ष वजा करून ठेविले आहेत असे वाटतें. तो ऐवज असिला तर उतमच जाहालें. तो ऐवज वजा करून बाकी ऐवज राहील त्यास कर्ज घेऊन द्यावे. पाऊण लक्ष वजा केले नसिले तर सारेच कर्ज घेऊन द्यावे लागतील, याजकरितां हे पत्र लिहिले असे, तर ऐवजाची तरतूद करून ठेवणें. येथून तुम्हावर वराता होतील त्याप्रमाणें ऐवज देणे. सारांश गोष्ट बाबूजी नाईक दर्शनास न आले तर येवज द्यावा लागेलच, याजकरिता तरतूद करून ठेवणे. रवाना छ २४ रजब सुा सन सबा सितैन मया व अलफ. सत्वर ऐवजाची तर्तूद ठेवणे. हे पत्र सांडणी स्वाराबा रवाना केले आहे. याउपरी सत्वरच ऐवजाविसी वरात होईल. त्यास वरात पावताच ऐवज पावावा. लिा प्रा सत्वर करणें. रवाना छ २५ रजब. बहुत काय लिहिणें? हे विनंती.

¶*The Peshwa asks Nana Fadnis to make necessary arrangements for making a payment of about Rs. 1,13,000 to Babuji Naik.*

---

*No. 116*] [*27-12-1766*

पौ छ ४ साबान सबा पैप.

## श्रीशंकर

शेवेसी नारो नरसिंह क्रा सां ना विंा येथील कुशल ता छ २४ रजब जाणून मुा डोणगाव नजीक सोलापूर स्वामीच्या कृपेकरून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विा. इकडील वृतांत, श्रीमंतांचा मुा सुरापुरनजीक आठसात कोसी आहेत. सुरापुरवाले यांजकडील परगणियांची खंडणी होऊन पुढे कांडव्हर संगमास जाणार येसेहि आहे. राजश्री नाइकाकडील विवेकाचा मजकूर, लस्करा-तून रा रामचंद्र कृष्ण लिमये व आपाजी राम आले होतें. नाइकास दीड लक्षाची जाहागीर द्यावी. बारामती वगैरे मिळोन व जरावजरा चीजवस्त द्यावी आण किला खाली करून सरकारात घ्यावा. येणेप्रो नाइकासी करार ठराऊन मागती उभयेता लस्करास गेले आहेत. येणेप्रा श्रीमंताचे मर्जीस आले उपरी रा गोविंद सिवराम सात्या व रा विसाजी कृष्ण उभयेता येऊन नाइकाची समजावीस पाहून किला सरकारास घेऊन मागनिलेस समागमे लस्करास न्हेणार, येणेप्रो

निछिये ठरला आहे, परंतु निभावणी होऊन परिणामास लागेल तेव्हा प्रमाण मानावे शेवकास रा रामचंद्रपंतासमागमे येऊन च्यार मासपर्यंत होत आले. वारंवार शेवेसी विनंतीपत्रे लिहीत गेलो, परंतु येकहि प्रत्योतर न आले, याजवरून चिंत परम खिन्न जाले आहे. आज्ञा घेऊन येतेसमई जे, मारनिलेसमागमे आसावे आण त्याजकाडील काजकामाची वगैरे आवधी चौकसी पाहात जावी. आज्ञेप्रो आजपर्यंत सिबंदी, प्यादे व स्वार वगैरे काजकाम जें सरकार निसबतीचे तें सर्व ध्यानांत आणीत आलो. हली श्रीमंत रा दादासाहेब यांजकडील किल्याचा वेहेडा व हावालदार व सबनीस व फडणीस येणेप्रो आले आहेत. परंतु सबनीस व फडनीस किल्याचे निसबतीचे, माहाली फडणीस आलाहिदा असावा, त्याने माहाली मजकुराचें काजकाम करीत जावे, यैसे आसोन हाली हेच सर्व मनास आणितात. या कारकुनानी किला निसबतीचे मात्र काजकाम मनास आणावे, माहाली मजकुराचे काजकाम प्रथक आहे आणि पेशजीपासोनहि माहालची फडनिसी आलाहिदा आहे. आहिरवाडी परगणा यांची फडनिसी यासिवाये, येणे-प्रकारें नाइकाच्या कारकीर्दीत असता हाली येणेप्रो आहे, तेव्हा आम्हीं काये काजकाम मनास आणून आसावे? मजला तो आज्ञा श्रीमंताची व आपली होती जे, किला दाखल सरकारात होये तोपर्यंत मारनिलेकडील सिबंदीचे वगैरे सर्व *मनास आणावे आण पुढे आज्ञेप्रो यावे, यैसी आज्ञा स्वामीची जाहाली होती.* मजला तो स्वाम धणी म्हणोन विनती लिा आहे. केवल उगेच उठोन सेवेसी आलो तर आपली वेमर्जी होईल याजस्तव मुजरद विनंती लिा आहे. लस्करास जावे तर मार्ग चालत नाही, येणेप्रा आहे; कृपा करून आज्ञापत्र सादर करावे म्हा आज्ञेवरहुकूम वर्तेन. वेहेड्यात नेमणूक सबनिसाची व फडनिसाची किलेकडील, वरकड माहाली फडनीस आलाहिदा, यास काही माहालचे काजकाम दखलगिरी करवयासी कारण नाही. रा दादो उध्व याचे पत्र रा रामचंद्रपंतास *आणोन मात्र माहालाची काजकाम लिहिणे करितात. यात स्वामी ज्याप्रमाणे* मजला आज्ञा करतील तेणे प्रा वर्तेन. मी स्थापित पूर्वीपासोन याच चेरणाचा आहे. माझा सर्व वंगवशिला माहाराज आहेत. माहालची काजकामाची नेमणूक शेवकाची करून मारनिलेस स्वामीचे पत्र आले म्हणजे शेवकाचीहि स्थापना केलीसारिखी होईल. आहीरवाडी परगणियाची फडनिसी यासिवाये आलाहिदा आहे. यात ज्याप्रो मर्जीस येईल त्याप्रो जैमातच्यापरी (?) कृपा करून आज्ञा करणे ती करावी. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापि.

*¶Naro Narsinh writes to Nana Fadnis about the settlement of the dispute with Babuji Naik over the fort of Sholapur and requests orders about his own duties.*

6390

No. 117] [27-12-1766

घडणी रु. नं.
५१२

श्री

यादी राजश्री बाबूराव सदासिव मुा सबा सितैन मया व अलफ.

खासा जातीची तैनात कुल डौला- । सालिना रुो १०००० १

वर पागा राऊत चांगले करोल व आडहत्यारी व भालेकरी मिळोन स्वार २५० अडीचसे.

यासी सरंजाम लाऊन द्यावा देखील ामती येक लक्ष येक रुपया वसुली वी येणेप्रमाणें करार.

तैनात निवळ देखील कापड पडले पानसुधा दरमाहा तैनात सालिना रुा पच्यासी हजार ८५००० करार केले असत. सामान चांगले बाळगावे. कनिष्ट गाळ वजा होईल. येणेप्रो सरंजाम लाऊन दिल्यास वसुली लाऊन द्यावा; न दिल्हा सरंजाम तर इतलाख सदरहू प्राा नख्त देत जावे. येणेप्रमाणे करार

पहिली करारीची याद जाली आहे ाप्रो करार असे येणे प्रो करार.

तुम्ही हुजूर येऊन निखालसपणे कनिष्टेने येक वर्ष चालल्यास कृपा पादून घेतल्यास इंदापूर दिल्हे जाईल. णेप्रो करार

सोलापूरचा किला जकिरासुधां ाजश्री विसाजी कृष्ण हवाली करावा. णेप्रा करार

निखालसपणे चालावे. हुजूर यावे, कृपा संपादून घ्यावी. इकडील कोणे गोष्टीचा संशय धरू नये. तुम्ही करार-प्रो वर्तल्यास केल्या करारप्रो चाल-विले जाईल. खातरजमा असो देणे. येणेप्रमाणे करार

छ २४ रजब मार्ग सीर्प मुा नजीक जेटगी पाा सुरापूर

¶*Babuji Naik is given a personal allowance of one lakh on his rendering allegiance to the Peshwa. The paper mentions the conditions on which the allowance is granted.*

+ हस्ताक्षर माधवराव. १ गैरसरंजामी, पगारी.

No. 118] [28-12-1766

पौ छ ४ साबान सन्नां.

श्री

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

पोष्य रामचंद्र त्रिंवक कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील क्षेम तॏ छ २९ रजब मुा डोणगांव प्रां सोलापूर जाणौन वर्तमान यथास्तित असें विशेष. बहुत दिवस आपल्याकडून पत्र येऊन परामृप होत नाही, तेणे करून चित सापेक्षित असे. विशेष. इकडील वर्तमान तर श्रीमंत पतप्रधान सुरापूर प्रांते आहेत. सुरापूरचा घासदाणा घेऊन कडलूर संगमावर आठचार मुकाम होणार. लष्कराहून रा रामचद्र कृष्ण व आपाजी राम यैसे सोलापुरास आले होते. बोलून लस्करास जाऊन फिरोन सोलापुरास आले. करारात आणून सोमवारी लस्करास गेले. आज सात रोज जाले. तेथून रा विसाजी कृष्ण व रा गोविंद सिवराम सोलापुरास येऊन श्रीमंत रा नाईक यास श्रीमंताचे दर्शनास घेऊन जाणार. बारामती देखील दिढा लक्षाची जागीर दिली व वस्तभाव सर्व द्यावी देखील पागा येणेप्रां करार जाला. यानी किला द्याया, पुढे कृपा संपादून घेऊन इंदापूर मागावे, यैसे मानस आहे. आजपर्यंत आम्हासी त्यासी नित्य खटखट लडाई होत होती. सात रोज होत नाहीं. त्याची कही गनताची होते. मौजे बाळ्यास आम्ही ठाणें घातले त्यामुळे शहरची वेस बंद जाली. बाल्यावर किल्यावरील गोले येऊन पटतात. दोन तीन येलगार तोफा लाऊन त्यानी फारच केले, परंतु ठाणे कायेम राहिले. त्यावरून शहर घाबरे जाले व खासी स्वारी संनिध आली त्यावरून सलुकाचा मजकूर लौकर जाला. आजपर्यंत आम्हांकडील घोडे माणूस फार जाया जाले. पंधरापर्यंत घोडे व माणूस चांगले पंधरापर्यंत, सिवाये किरकोल; या प्रां सोलापूरचेहि जाले. चौथा रावतांची बोली करार जाली. लोकानी चाकरी तो येथे फारच केली. लस्कर लांबत चालले. लोकास नालबंदी अद्याप नाहीं याजकरिता विनंती लिा आहे. नालबदीचे यैवजी तूर्त खर्चास देवावें आणि लोकांस आपलेजवल चाकरीस बोलावावें किंवा आज्ञा करणें ते करावीं. तेथे चाकरी करतील. सेवा चाकरी ध्यानांस आणून लोकांचे व आमचे उर्जित करणे आपल्याकडे आहे. पैसजी येक दोन पत्रें पौ परतु उतर न आले. वरकड वर्तमान रा नारो नरसिंह यानी

गोपाळराव गणेश वकील यास सस्थान मजकूरचा वंदोबस्त सांगितला आहे. तरी राजवी पैसा ठरेल तो मारनिलेकडे देणे. याजकडे ऐवज न दिल्हा तरी उतम नाही हे समजोन फैसल करून देणे म्हणोन चिटणी(सी) पत्र १

¶*Draft of a letter from the Peshwa to Raja Nizamsha asking him to settle the payment of dues in arrears for the province which was being administered by him for seven years following the battle of Panipat.*

---

*No. 121*] [*1767?*

## श्री

शेवेसी विज्ञापना. प्रातःकाली राउतासमागमे गुंजेहालीचे वर्तमान सविस्तर लिहिले होते त्यावरून श्रुत जालेच असेल. येरगिरे येथे रात्री चौकीस फौज उतरून रखवाली केली. मग त्यासी बोली लाविली. त्यास आम्ही वीस हजार म्हणत होतो. त्यास पंधरा हजार पावेतो आले होते. ते आपणाकडील राऊत कारकून आले. त्यांस गावकरास मिळून आम्हासी कजिया करू लागले. मग आम्ही आपल्याआपल्यात कजिया करावा कार्याचे नाहीं, यास्तव आपणास कळावे म्हणोन लि॥ असे. इकडे आम्ही तुंगभद्रापावेतो राऊत पाठविले होते, त्यास नदी पावेतो थोडेबहुत हिरवे आहे. राऊत येतास गावकर आम्हासी बोलेणासे जाले. यास्तव गाव मातबर आहे, याचा विचार काय असेल तो बिल्हे लाविला पाहिजे. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*One Maratha General complains to another about the misconduct of his men.*

---

*No. 122*] [*January 1767?*

## श्री

विज्ञापना ता॥ छ ६ रमजान मु॥ गुड वर्तमान यथास्थित असे विशेष. श्रीमंत राजश्री नारायणराऊ छ ४ रमजानी श्रीमंताचा निरोप घेऊन गेले. परभारे गंगापुरास जातील. समागमे राजश्री बच्याजीपंत आहेत. वरकड माघारे फिरणारे राजश्री बाळोबा, नारो बावाजी, दादो उधव, बावाजीपंत, सिदोपंत आदिकरून फार करून मंडली सोवतीने गेले. कळले पाहिजे. इकडील वर्तमान गदवालची खंडणी लाख रु॥ जाली हे पूर्वी लिहिलेच आहे. अदवानीकडे सालेसालची बाकी येणे, त्याचा ठराव तीन लक्षाचा प्रथम जाला, परंतु पैक्याची

लिा आहे त्यावरून अवगत होईल. मारानिलेच अजित करणें स्वामीकडे आहे. बहुत काय लिा, कृपा लोभ असो दीजे, हे विनंती.

¶*Ramchandra Trimbak writes to Nana Fadnis that the dispute between the Peshwa and Babuji Naik has been finally settled. It was agreed that the Naik should deliver the fort to the Peshwa who in return should give a Jagir worth one and a half lakhs to the Naik.*

---

*No. 119]* *[31-12-1766*

पौ छ २८ रजब
सन सबा सितैन.

श्री

विज्ञापना. सुरापूरची खंडणी येक लक्ष पाच हजार व येक गांव तालुक्यांतील खंडणीपूर्वी खंडला त्याचे सतर हजार येणे प्रो जाले, परंतु वसूल येणे दुर्घटच दिसतें. राजश्री बाबूजी नाईक यांजकडे प्रहस्त गेले होते ते आले. पहिल्या लिा प्रो ते कबूल जाले. राजश्री विसाजी कृष्ण याची रवानगी लौकरच होईल. पुढे होईल ते लिहून पाठवीन. दीड माहीचा पट छावणीतील कूल पाठवावा. शागीर्दपेशा वगैरे डौल आलकिडे काय वाढली हे लवकर समजावणे म्हणोन निकड श्रीमंतानी लाविली आहे, तर लौकर लेहून पाठवावयास आज्ञा करावी, हे विज्ञापना.

¶*Haripant requests Nana Fadnis to send the muster-roll as the Peshwa wanted to examine it. "Contribution from Surapur", he says, "has been fixed at one lakh but it is very difficult to recover it".*

---

*No. 120]* *[After Dec. 1766*

श्री

राजा निजामशा यास पत्र की, पानपतची गर्दी जाहाली. त्या साली तुम्ही सरकारचे तालुकियात धुंडी करून ठाणी उठविली, त्यापासून सात साला अमल तुम्ही केला. उपरांतिक तीर्थस्वरूप राजश्री दादासाहेब यांची मसलत हिंदुस्थानात जाहाली, गोहदेस लागले होते, तेव्हा सरकारची ठाणी सरकारांत घेतली आणि सात सालाचा ऐवज तुम्हाकडे यावयाचा तो स्वारी मसलतसीर जाणोन तुम्ही बोलिल्याप्रो कागदपत्र करून दिल्हे. परंतु बदमामली करून सात सालाचा ऐवज घेतला तो हिशेब करून जमिदाराचे रुजुवातीने हाली.

लागली. ठाणां घेतलेपासून सिबंदी चढली. त्याचा मार्ग होईछ म्हणून श्रीमंत राजश्री गोपाळरावजीचे लस्करास गेलो होतों. दीड मास समागमें होतो; परंतु कांहीं निर्गम जाहाला नाहीं व कांहीं या प्रांती आम्हांकडे ठाणीं आहेत त्याची बेगमीहि केली नाही. धातुपोषण साळजाव होऊन ठिकाणास आलो तो होसकोटे ताल्लुकेच पाच साहा गांव पटणकरानी मारून नेले, येसा प्रकार तह जाहाला असतां होतो तेव्हां परिणाम कळतच आहे. यांत श्री कसा परिणाम लावील पाहावे. येविसींचा सकलार्थ श्रीमंतास विदित व्हावा याजकरितां सरकारांत पत्रें पाठविलीं आहेत व सविस्तर चिरंजीव रावजीस लिहिले आहे. आपणांस निवेदन करील त्याप्रमाणे साळजाव उगऊन देविले पाहिजे; येविसी विस्तार लिहिणे न लगे .सर्व प्रकार चालवणें स्वामीस अगत्य आहे. आम्हाविसी राजश्री गोपाळ रावजीस ल्याहावें म्हणोन दोन तीन वेळ आपणांस लिहिले; परंतु आमचे साहित्याविसीं रावजीस ल्याहावयास स्मरण जाहाले नाहीं. असो; आमचा लाभकाल. आपणांस शब्द काय लावावा? आपण म्हणतील कीं आम्हांस आणशब्द, म्हणजे तर तुम्ही वडील, आम्हांस छत्र. तुम्हांसिवाय आम्ही ल्याहावें कोणास? आमचे अगत्य आणखी कोणास? रुसणें तुम्हावर रुसावें. बरें करणें तुम्हीं करावें.येसा प्रकार आहे; परंतु रुणानुबंधास उपाय काय? वरकड मजकूर पुरवणी पत्री लिा आहे त्यावरून ध्यानांत येईल. आण श्रीमंतास प्रसंगोचित विनंती करून कर्जापासून मुक्त करविले पाहिजे. राजश्री रावजीनी कृपा आम्हांवर बहुत केली. बहुताजवळ आमची सिफारस केली. बहुमान केला. येक हती दिल्हा. आपणांस कळावें. बहुत काय लिहिणे लोभ असो दिल्हा पाहिजे. हे विज्ञापना.

*¶Mukund Shripat writes to Mahipatrao that according to the terms of the treaty with Haidar Ali, Bangalore and Devanhali had been ' ' He complains he had not received funds to pay off his men. Mahipatrao C'' is alive at this time.*

---

No. 126] [9-1-1767

नकल.

श्री

सेवेसीं लक्षुमण गंगाधर बापट मुकाम किले सोलापूर लष्कर गोविंद शिवराम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल तागाईत पौष शुद्ध १० दशमी शुक्रवार दोन घटका दिवसपावेतों स्वकीये कुशल लेखनाज्ञा केली पाहिजे, विशेष. काल गुरुवारीं दोन घटका रात्रीस किल्ला सर जाहाला, सरकारचे ठाणे

*No. 124]* *[1-1-1767*

पो छ २९ रजब

## श्रीगणराज

श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामीचे शेवेसी

विनंती सेवक गोपाळ गोविंद कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता. छ २१ रजबपावेतो स्वामीचे कृपावलोकने सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. स्वामींनी कृपापत्र पाठविले ते उत्तम समई प्रविष्ट होऊन परम समाधान जाले. इकडील वर्तमान बिदनूरचा गुता उरकून तुंगभद्रातीरी हरिहरानजीक दक्षण-तीरी मुकाम जाला. तेथे बसवापटणचा व चित्रदुर्गचा मामला विल्हे लाऊन उत्तर तीरी मुकाम जाला. त्या तळावर राजश्री बाबाचे शरीरी ज्वरातिसाराची व्यथा जाली. पाचसात दिवस फारच श्रमी केले. दानधर्महि केला. व्यथा भारीच होती, परंतु स्वामीचे पुण्येकरून उत्तम प्रकारे उतार पडला. उपरांतिक वैशाख वा ९ बुधवारी तुंगभद्रेतीराहून कूच करून मजल दरमजल चवथे मजलीस हानगलानजीक मुकामास आले. सावनूरवाला कहीचा वकील आला, यास्तव एकदोन मुकाम येथे करून सावनूरचा गुंता उरकून मजल दरमजल देशास येणार. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*[Gopal Govind informs the Peshwa that he would return (to Poona) after having settled the affairs of Bednore, Chitradurg and Savanur.*

---

*No. 125]* *[4-1-1767?*

## श्री

श्रीमंत राजश्री महिपतराव दादा
स्वामी गोसावी यासी

सेवक मुकुंदराव श्रीपत कृतानेक दंडवत प्रा विनंती उपरी. येथील कुशल तागायत छ २ शावान जाणून स्वकीय कुशल लेखन करावया आज्ञा केली पाहिजे विशेष. स्वामीकडून बहुत दिवस पत्र येऊन साभाल होत नव्हता. त्यास प्रस्तुत हरकारे आले याजबराबर पत्र पाठविली, पावली. बहुत समाधान जाहाले. येसेच निरंतर येणारा वार्तिकासमवेत पत्र पाठऊन परामर्श करीत असावे. यानंतर आम्हांकडील वर्तमान तरी प्रस्तुत पटणकराचा व सरकारचा तह होऊन बेंगरूळ व देवनहली वगैरे तालुके घेतले होते, ते सोडावयाबद्दल श्रीमंताची आज्ञापत्रे व कारकून आला. तेव्हां आज्ञेप्रमाणे आम्हांकडील ठाणी तमाम सोडावी

राजाराम बाबूराव यास सागावी. दोन उमेदवार केले असेत. • बहुतेक राजाराम पंतास दिवाणगिरी होईल. वरकड सविस्तर वर्तमान मागाहून सेवेसी लेखन करू. * सेवेसी श्रुत होयें हे विज्ञासि.

¶*Trimbak Narayan informs Raghunathrao Dada of the dismissal of Asalamkhan, the Subhedar of Berar, ordered by the Nizam on account of the former's friendly attitude towards Bhonsle of Nagpur; the progress of peace negotiations with Haidar is also referred to.*

---

*No. 128]* *[16-1-1767?*

पौ छ २९ साबान

श्री

सेवेसी लक्ष्मण नारायण व माहादाजी नारायण व बाबूराव केशव कृा सा ना विा. येथील कुशल ता छ १९ सावान मुा नजीक रायेचूर प्रा आदवानी स्वामीचे कृपावलोकने वर्तमान येथास्थित असें विा. स्वामीकडून पत्र येऊन साभाल होत नाही. तरी सदैव पत्रीं सांभाळ केला पाहिजे. येथील वर्तमान अदवानी रायेचूर मिलोन तीन लाख खडणी जाली आहे. वसुलाचा जावसाल होणे आहे. वसालतजंगाकडील जावसाल जालियावर तुंगभद्रातीरास जातील. राजश्री गोपाळराव पंधरा कोसावर आहेत. प्रस्तुत लस्करात महर्गता फारच जाली. जोरीबाजरी तीन सेर, चार सेर याप्रमाणे जाली आहे. रविसंक्रमणाचे तील शर्करायुक्त पाठविले आहेत; पावलियाचे उतर पाठवावयासी आज्ञा केली पाहिजे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*The letter informs that the Peshwa fixed rupees three lakhs as tribute from Adoni and Raichur.* •

---

*No. 129]* *[29-1-1767*

पौ छ ६ रमजान

श्री

तीर्थरूप राजश्री दादासाहेब वडिलाचे सेवेसी

अपत्ये माधवराव साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ता छ २८ शाबानपावेतो वडिलाचे आसीर्वादे येथास्थित असे विशेष. वटिली दोन तीन पत्रे पाठविली त्याची उतरें पाठविली ती पावोन सविस्तर निवेदन जालेच असेल, व बालाजी वामन दामले याजविसी लिहिले त्याचेंहि उत्तर सेवेसी पाठविलेच आहे

6399

आंत गेले. खंडेराव निंबाळकर निसबत विसाजीपंत व सरकार रावसाहेबाकडील मावळे रामचंद्र त्रिंबक याजपाशीं होते ते दोनशें व तात्या गोविंद शिवराम याजकडील शंभर मावळे नवे आणिले, ते व बारगीर मिळोन येकून च्यारशें .आंत गेले. राजश्री बाबूजी नाईक लोकसुधा वाटेवर आले आहेत. लष्करांत येतील किंवा बारामतीस जातील ते न कळे. सावंत रामचंद्र त्रिंबक याजकडून सेवेसी लिा असें. आम्ही श्रीमंत दादासाहेबाच्या सनदा व रावसाहेबांची सनद नरसिंगराव यांचे नांवाची गोविंद शिवराम यासी दाखविली. त्यांनीं साफ सांगितलें कीं दादासाहेबाकडील येक माणूस ठेवीत नाहीं. आपण दुसरी सनद गोविंद शिवराम यांसी घेऊन पाठविली किंवा आपण आला तर उत्तम. नाहीं तर बरा विचार नाहीं. किला बहुत आजप आहे तो पत्रीं कोठवर लेहावा? या गोष्टी तों रावसाहेब यांनीं केल्या. दादासाहेबाची मर्जी आपणांवर व आम्हावर गैरमर्जी या गोष्टीनें होईल. त्यासी रावसाहेबांस विनंती करून सनद पाठवावी. आपणाकडील मावळे सनदेप्रमाणें आले आहेत, त्यांसी आम्हांस काय आज्ञा बाबूजी नायकाची आली? रामचंद्रपंताविशी मात्र आहे, आम्हाविशी कांहीं नाहीं. आम्हांस काय आज्ञा तो करावी हे विनंती.

¶*Lakshman Gangadhar Bapat reports the capture and occupation of the fort of Sholapur by the Peshwa's troops and requests further orders.*

---

*No. 127*] [*10-1-1767?*

श्री

श्रीमंत राजश्री दादासाहेब
स्वामीचे शेवेसी

विनंती सेवक त्रिंबक नारायेण कृा सा ना विा येथील कुशल. ता पौष शुध्य ११ मुा शहर बराणपूर वर्तमान येथास्थित असे विशेष. श्रीमंत रा पंतप्रधान स्वामीची आज्ञापत्र देवदुरग सुरापूर प्रांत बेडर येथील मुकामची आली. त्यांत मजकूर की, रा हयेदर नाा यांजकडील वकील आहेत, अद्याप चुकोती झाली नाही. नवाब निज्यामअली भागानगरात आहे. तिकडे रा कृष्णराव बलाल काळे गेले आहेत. चौकडील अनुसंधाने आली आसे. पुढे वर्तमान येईल ते सेवेसी विनंति लिहिली जाईल. वराड प्राती मोगलाकडून असलमखान सुभा होता त्याणी भोसल्यासी सख्य केला. सा मोगलानी तगीर करून रुकनदवला याचे भा(वास) सुभा सांगोन दिवाणी नजफ अलीखान यास सांगावी अथवा

राजाराम बाबूराव यांस सागावी. दोन उमेदवार केले असेत. बहुतेक राजाराम पंतास दिवाणगिरी होईल. वरकड सविस्तर वर्तमान मागाहून सेवेसी लेखन करू. * सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

¶*Trimbak Narayan informs Raghunathrao Dada of the dismissal of Asalamkhan, the Subhedar of Berar, ordered by the Nizam on account of the former's friendly attitude towards Bhonsle of Nagpur; the progress of peace negotiations with Haidar is also referred to.*

---

*No. 128*] [*16-1-1767*]

पो छ २९ साबान

श्री

सेवेसी लक्ष्मण नारायण व माहादाजी नारायण व बाबूराव केशव कृा सा ना विा. येथील कुशल ता छ १९ सावान मुा नजीक रायेचूर प्रा आदवानी स्वामींचे कृपावलोकने वर्तमान येथास्थित असे विा. स्वामीकडून पत्र येऊन साभाल होत नाही. तरी सदैव पत्री सांभाळ केला पाहिजे. येथील वर्तमान अदवानी रायेचूर मिलोन तीन लाख खंडणी जाली आहे. वसुलाचा जावसाल होणे आहे. वसूलितजगाकडील जावसाल जालियावर तुंगभद्रातीरास जातील. राजश्री गोपालराव पधरा कोसावर आहेत. प्रस्तुत लस्करात महर्गता फारच जाली. जोरीबाजरी तीन सेर, चार सेर याप्रमाणे जाली आहे. रविसक्रमणाचे तील शर्करायुक्त पाठविले आहेत; पावलियाचे उतर पाठवावयासी आज्ञा केली पाहिजे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*The letter informs that the Peshwa fixed rupees three lakhs as tribute from Adoni and Raichur.*

---

*No. 129*] [*29-1-1767*]

पो छ ६ रमजान

श्री

तीर्थरूप राजश्री दादासाहेब वडिलांचे सेवेसी

अपत्ये माधवराव साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ता छ २८ शाबानपावेतो वडिलांचे आसीर्वादे येथास्थित असे विशेष. वडिली दोन तीन पत्रे पाठविली त्याची उतरे पाठविली ती पावोन सविस्तर निवेदन जालेच असेल, व बालाजी वामन दामले याजविसी लिहिले त्याचेंहि उतर सेवेसी पाठविलेच आहे

6399

व तेहि निघोन गेले ते सेवेसी येऊनँ पावलेच असतील. नवाव निजामअलीखान आले. छ २४ शावानी दरम्याने डेरे होऊन भेटी आमच्या त्याच्या जाल्या. त्यांजवर आम्ही छ २५ शावानी त्याच्या डेऱ्यास गेलो. दुसरे दिवसी ते आमच्या डेऱ्यास आले. परस्परे सिष्टाचाराचे बोलणे जाले. वरकड कारारमदाराचा ठराव अद्याप जाला नाही. जाल्यावर सविस्तर सेवेसी लेहून पाठऊ. याजकडील कारभार उरकल्यानतर जावयाचा निश्चय होईल. सेवेसी श्रुत होये. हे विज्ञापना.

¶*The Peshwa writes to his uncle about his meeting with the Nizam*

---

*No 130]* *[Recd 2-2-1767*

पो छ २ रमजान सबा मा(व)

श्री

विज्ञापना. मोगलाकडे राजश्री कृष्णराऊ गेले होते ते निघोन आले. चहू रोजी लस्करास येतील. नवाव बाहेर निघाले. दरमजल इकडे येत असेत. कळलें पाहिजे. गदवालची खडणी येक लक्ष बाकी सुधा जाली. अदवानी तीन लक्ष बोलिले. परतु निशा आली नाहीं. होईल तेव्हा लिहून पाठऊ. दोन रोजा तुगभद्रेवर जाऊ. कळले पाहिजे. विदित व्हावे हे विज्ञापना.

¶*The sums of tribute promised by the states, viz , Gadval and Adoni, are given in this letter.*

---

*No 131]* *[Recd 2-2-1767*

पो छ २ रमजान सबा
माघ ह्या जासुद जथे
मुकुदजी नाईक

श्री

विज्ञापना. राजश्री बाबूजी नाईक याजकडील ऐवजाचा मजकूर पाऊण लक्षाचा लिहिला तो कळला. येथे मी विनती केलीच होती. आपण लिहिल्यावरून मशय निवृत्त जाली. येक लक्ष तेरा हजार करारावरून लिहिले म्हणोन

आज्ञा केली. ऐसियास येथे राजश्री बापूनी अजमास सांगितला त्यावरून लि।। होते. जितके नख्त त्याजकडील आले असेल तितकेच घ्यावयाचे, नाइकाचे माणसास, थोडी उंटास खर्च जाला तो मागू नये व वस्त्याचा ऐवज त्याजकडील जाला होता त्याचे कसे ते लि।। म्हणोन लि।।, त्यास किरकोळ दिकत काढावयाची नाहीं; कळावे हे विज्ञापना. नाइकाकडील यादी सर्व पावल्या. हे विज्ञापना.

¶*Haripant writes to Nana Fadnis answering certain queries with reference to the settlement with Babuji Naik.*

---

*No. 132*] *[10-2-1767*

पौ छ २१ रमजान सबा
माघ हा। यमाजी

श्री

शेवेसी बगाजी रधुनाथ सा। नमस्कार विज्ञापना. ता। छ १० रमजान मु।। नजीक रायेदुर्ग येथे स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. स्वामींनी कृपा करून छ २१ सावानचे पत्र पाठविले ते पावोन परम समाधान जाले. यैसे सदैव पत्र पाठवावयासी आज्ञा केली पा. जे लेखण्या फार आहेत त्यास लेखण्या न पाठवणे म्हणून आज्ञा. त्यास आज्ञेप्रो आनखी पेर मव्हालियास लेखण्या करून पाठवितों. इकडील वर्तमान तर तमाम सा।च्या खंडण्या जाहाल्या. हैदर नाईक याची खंडणी होयाची आहे. त्यास त्याकडील वकील वीस लक्षे-पावेतो बोलतो. परंतु श्रीमंताची मर्जी तीस पावतो दिसली. त्यास जलद खंडणी व्हावी याजकरिता मजल दर मजल सिऱ्यास जातात. सिऱ्यास मोर्चे लाविलीयावर जलदीन खंडणी होईल. याजकरितां दाहा दाहा कोशाची कुचे करून जातात. निजाम आलीखान याची फौज कुमकेस सात हजार पावेतो आली आहे. विसा कोशाचे आंतर आहे. खासा आला नाहीं. पुत्र फौज घेऊन येणार याप्रो वर्तमान आहे. कितेक बारीक वर्तमान राजश्री तात्यांणी लिहिले आहेत त्याजवरून विदित होतील. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Bagaji Raghunath writing from Raydurg says that contributions have been levied on several districts in the Karnatak and that Haidar has been asked to pay thirty lakhs. To bring pressure to bear on him the army is marching upon Shira. The Nizam has also sent a force to cooperate with the Maratha army, the letter adds.*

No. 133] [10-2-1767

पो छ २१ रमजान सन्ना
माघ शा यमाजी

श्री

सेवेसी सदासिव अनंत कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता छ १० रमजानपावेतो मुा नजीक सां राइदुर्ग येथे स्वामीचे कृपावलोकनेकरून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. स्वामींनी सेवकावर कृपा करून पत्र पाठविले ते पावोन परम समाधान जाहाले. याप्रकारे सदैव आलिया माणसासमागमे पत्र पाठऊन सेवकाचा सांभाळ केला पाहिजे. यानंतर प्रांत कर्नाटक येथील संवस्थानची खंडणी वगैरेचा यैवज आज ता रुपये

१४३००० सां मुरापूर
५५००० सां देवदुर्ग
१०००० सां गुडगुटे
४१०००० सां चित्रदुर्ग
४०००० सां बलारी
२५००० सां आनेगोंदी
३५००० सां केंचनगुड
४०००० सां राइदुर्ग
५०००० खंडण्या गुा गोपालराव
१००००० सां गदवाल
३०००० कोा तलालकोट
२५००० किरकोली गावगना

९६३०००

[ या पुढे २ ओळी फाटल्या आहेत. ]

राहिला आहे तोहि लवकरच होईल. हरपनहलीकर वकील आला आहे तो दीड लक्ष रुपये खंडणी बोलतो. हे म्हणतात निदान तीन साडेतीन लक्ष पावेतो वेऊ. या प्रकारचे वर्तमान आहे. दरमजल सिन्यास जाणार. निजाम आलीकडील पंधरा हजार फौज व पंचवीस तीस तोफा पाच हजार गाडदी याप्रमाणे येथू(न) सात आठ गावे लांब आले आहेत. बरकड आधिकोत्तर वर्तमान राजश्री हरिपंत तात्या याणी लिहिले आहे त्यावरून निवेदन होईल. स्वामीस कलावे म्हणोन सेवकाने लिहिले आहे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना. हैदर नाईक

6402

येथून विसा गांवावर सिन्यापलीकडे आहे. सिन्याच्या ठाण्यात तोफा पाऊणसे व पाच हजार गारदी याप्रो मजबुदी करून ठेविलीन आहे व त्याजकडील वकील लस्करात आला आहे. वीस लक्षपावेतो खंडणी बोलतो, हे पनास लक्ष रुपये घेऊ म्हणतात. कळावे हे विज्ञापना.

*¶Sadashiv Anant gives a list of the amounts of tribute to be received by the Peshwa from the various places in the Karnatak; the movements of the forces of the Nizam and Haidar are also reported.*

---

*No. 134*] [*10-2-1767*

पो छ २१ रमजान सबा
माघ ह्या यमाजी

श्री

शेवेसी बाबूराव केशव व बाबाजी माहादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता छ १० रमजान पावेतो मुा नजीक रायदुर्ग स्वामीचे कृपेकरून येथास्थित असे विशेष. अदवानीची खंडणी तीन लाख पंधरा हजार करार होऊन पैका वसूल न ये याजकरिता कसबे भनूस मोर्चे लावावयाकरिता स्वारी गेली. प्रहरपर्यंत दाहा तोफाचा मार जाहाला. आतील किलेदार ठार पडिला. तेव्हा लोकास धीर न धरवे. वकील पाठऊन पंधरा हजार खंडणी द्यावयासी कबूल जाले. परंतु ठाणे घालावे म्हणोन श्रीमंताची मर्जी. याजकरिता ठाणेदाराचे कबिले व सिपाई हत्यारानिसी काढून देऊन ठाणे घातले. ठाण्याची पहिली खंडणी गोपालराव गोविंद यांणी बारा हजार घेतली होती, परंतु अदवानीच तह बिघडला याजमुळे ठाणे घेणे लागले व कौताळचे ठाणे च्यार हजार फौज पाठविली व काही तोफा पाठविल्या तितक्यानेच ठाणे बसले. भनूहून बारा कोस कूच करून सिदनुरास आले. तेथे लडाई न होताच ठाणे पडिले. भनूचे ठाणे जलद पडताच तमाम मुलकात दबाव पडिला. संस्थानिक चित्रदुर्ग, आनेगोंदी, बळारी, रायदुर्ग आदिकरून खंडण्या जाहाल्या. हरपनहळीची खंडणी होणे आहे ते दोन च्यार रोजात होईल. खंडण्याचा गुंता उरकल्यावरी दरकूच सिन्यास जाणार. निजामअलीखान भागानगराहून तोफखाना घेऊन पंधरा हजार फौजेनिसी रायचुरानजीक आले आहेत. दरकूच येऊन मिळणार. दोही सेनेतील सारा तोफखाना सिन्यास लाऊन किला लौकरी फत्ते करावा असा मनसुबा आहे. मीर फैजुला याने दोन हजार माणसे किल्यात ठेऊन बंदोबस्त करून बिदरूर प्रांतास गेला. हैदर नाईक घाटाखाली पंधरा

No. 137] [17-2-1767

श्री

सेवेसी विज्ञापना येथील वर्तमान ता। छ १७ रमजान मुकाम सिरं येथें स्वामीचे कृपे कटाक्षेंकरून येथास्थित असे विशेष. स्वामींनी कृपा करून पत्र व रविशक्रमणाचे तील शर्करायुक्त पाठविले ते मस्तकीं वंदून भक्षिले. याच-प्रकारे सदैव पत्रीं साभाळ व्हावयासी आज्ञा जाहाली पाहिजे. इकडील वर्तमान तरी श्रीमती तुगभद्रेवरून छ ७ रमजानीं कूच केले ते दरमजल लाव लाव मजली करून सिन्यास छ १४ मिनट्स दाखल जाहाले. आले त्याच रोजी टेन्यास न येता सिन्यापासून दिडा कोसावर उभे राहिले होते. सिन्याचे बंदोबस्तीस मीर म्हणोन हैदर नाईकाचा मेहुणा हजार बारासें स्वारानीसी व काहीं प्यादे घेऊन आला होता, तो सात तोफा बाहेर काढून फौजसुधा डेरे राहुट्या देऊन राहिला होता. तो तोफाची मारागिरी करीत होता. फौजेचा पुढें रिगाव न होय तत्राप जनार्दन राम वगैरे पथके यार्णा तोंड लाविलें. ही बातमी खाशास कळताच हुजुरात सुधा स्वारी पुढें गेली. हातघाईची लढाई जाहाली. मिरास मोडून आत घातला. दोनसेंपर्यंत घोडे पाडाव केले. डेरे राहुट्या काहीं राहिल्या, तोफा खदकात लोटून दिल्या. आपले फौजेनें फार केली. मोर्चे खदकाजवळ काईम लागलेच केले. दोन तीनसें माणूस त्याचें जखमी जाहले व चाळीस पनास ठार जाहले. आपणाकडील पाच साहासें घोडे माणूस जखमी जाहालें व चाळीस पनास ठार जाहालें. थोकात सिदोजी घोरपडे व मालोजी पिसाळ व अमृतराव मामा खास चौकीचे ठार जाले व निरापा खताळ व आपाजी मुढे जखमी जाहाले. खासा रावसाहेब त्या रोजापासून मोर्च्यातच आहेत. तात्या तेथेंच आहेत. वरकड मडळी बुनग्यात आहीं. मोर्च्यास व बुनग्यास आद कोसाची तफावत आहे. हैदरनाईक श्रीरंगपटणास आल्याची खबर आहे. पचवीस हजार गाडदी व सात हजार फौज याप्रमाणें आहे. मीर फेजुला बसना-पटणाजवळ पाच साहा हजारानसी आहे. सिन्यात च्यार हजार प्यादा व हजार स्वार व पंधरा हत्ती व दारूगोळा मुबलग याप्रमाणें सामान चागले आहे. रोज गोळागोळी मातबरच होत आहे. तोफा खदकात त्याणी लोटिल्या आहेत त्या काढाव्या यास्तव येक दोन रोज रात्रौ आपल्या लोकानी मोठा लघट गेला होता, परंतु तोफा न निघाल्या. त्यास काल रात्रौ दोन तीन तोफा मोठा येलगार करून काढिल्या. त्यात येक भारी आहे. त्याणी तोफावरच मारागिरी आरंभिली आहे. परतु राहिल्या त्याहि काढणार. रास्ते मागें राहिले होते ते काल आले. गोपाळराव मागे आहेत. येका दाहा रोजात येतील. निजाम-

अलीहि आठा पंधरा रोजांत येऊन सामील होईल. सिरे आठा चौ रोजांत यावेसे आहे. हैदर नाइकाचा वकील बातमीदाखल होता त्यास लाऊन दिल्हा. श्रीमंताचा प्रताप थोर, दवाव भारी पडला आहे. हैदर नाइकाचें पारिपत्य लौकरच होईल. सेवेसी कलावे म्हणोन लिहिले आहे. बहुत काय लिहिणे कृपा कीजे हे विज्ञापना.

सेवेसी माहादाजी विष्णु व बाबूराव केशव व माहादाजी नारायण सां नमस्कार विज्ञापना. देशमुखानी वर्तमान लिहिल्यावरून विदित होईल. आज सायंकाळीं बाबा या(चे) हातास जखम गोलीचीं चाटून गेली. सरकारचा निशाणाचा हती पहिल्याच हल्याचे वेळेस जखमी जाहला. पहिल्या दिवशी आपणाकडील लोकांनी शर्त केली. हे विज्ञापना.

¶*Baji Govind gives a detailed description of the fighting at Shira led by the Peshwa himself. The garrison was driven in to seek the shelter of the walls which were then closely invested.*

---

*No. 138]* *[20-2-1767*

गां छ ९ सवाल सबा
फाल्गुन ह्या चिमाजी
जासूद जेथे ववाजी गणजी

श्री

सेवेसी महादाजी वलाल व हरि वलाल कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ताा छ २० रमजान सुाा सिरे वर्तमान यथास्थित असे विशेष. आपण छ २४ सावानचे पत्र पाा ते पावोन लिहिले वर्तमान कलले. इकडील वर्तमान तर श्रीमंत छ १४ रमजानी सिऱ्यास दाखल जाले. येथे आलियावर सिऱ्यांचे बाहेर हजार पाचसे माणूस, दोन हजार पायदल, सा तोफा होत्या त्याजवर चालोन घेतले. लोक मोडून गावांत घातले. सा तोफा पाडाव आल्या. सेपनास घोडी आली. दोनसे माणूस त्याजकडील ठार जाले. आपलेकडील वीसपंचवीस ठार, चारसे माणूस जखमी जाले. मोर्चे खंदकापर्यंत गेले. लोकांची मेहनत फार होते. हें वर्तमान पूर्वी सेवेसी लिाा आहेच. राजश्री मुराररात्र आज येतील. राजश्री गोपालरावहि येतील. दोन्ही फौजा एकत्र जाल्या म्हणजे चहूकडून येलगार होईल. आत माणूस जुजते फार आहे. गोल्याचा मार अतिशय होतो. माणूस जाया * * हात होते. श्रीकृपेकडून सिरे

राऊत व च्यार हजार पांवप्यादासुधा होता, त्याणे राजकारण लाविलें कीं, 'आपण हैदराचे इतराजींत आहे, मजला पदरीं घ्यावें.' त्यावरून श्रीमंतानी कबूल केले. येक हजार राऊत दर राउती दरमहा तीस रुा व येक हजार गारदी पंधराचेसेन्या प्रमाणे ठेवावयाचे कबूल केले. इमान प्रमाण दिल्हे. त्याणे आपले इमान श्रीमंतास देऊन काल भेटीस आले. भेट जाली. गोपालरायाचे गोटात जाऊन राहिले. आज किल्यांतील प्यादे निघतील. उदैक सरकारचे निशाण चढेल. किल्यांत कोण ठेवावा हा निश्चय जाला नाहीं. श्रीमंत दैववान. असा किला व आंत सरंजाम पोख्त असतां लवकर यावा असें नवतें, परंतु श्रीमंताचे पुण्यप्रतापेकडून मोठी फत्ते जाली. मीर रजा हैदर नाइकचे पदरी माणूस मातबर. आणखी याचे स्वाधीन गुरुमकोंडा व हुसकोटे वगैरे जागे आहेत, तेहि सरकारात देईल. मीर रजा माणूस, चांगला माणूस. चारसे पठाण जवल फार चांगला आहे. यंदा श्रीमंताचा प्रताप या प्रांतीं फार आहे. हैदर नाईक श्रीरंगपटणास आहे. सिरे घेतल्याने त्याचे अवसान जाईल. सिन्याचा बंदोबस्त करावयास आठ दिवस लागतील. तदोतर जो प्रकार मनसुब्याचा ठरेल तो सेवेसी लिहून पाठऊ. सारांश गोष्ट, सिरे लवकर येईल असा भरवसा नवता, परंतु मोठी फत्ते जाली. या उपरी जो मनसुबा ठरेल तो लिहू. राजश्री मुरारराव आले. सारी फौज येकत्र जाली. सिरें घेतल्यानें तमाम पालेगारांवर दबाव बसला. यंदा इकडे छावणी होती तर फारच नफा होता. परंतु श्रीमंत राजश्री दादासाहेब देशास येणार आहेत, यामुळे हेहि येतीलसें दिसते. श्रीमंत राजश्री दादा फडनीस विज्यापुरास आले, तेथून पत्र आले होते. राजश्री बाबा वैद्य ते समागमेच येतील. आलियावर लेहून पाठऊ. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Mahadaji Ballal and Hari Ballal report that Shira capitulated after putting up a stout defence.*

---

*No. 142]* *[26-2-1767*

पौ छ ४ सवाल सन सबा.

श्री

सेवेसी विज्ञापना, येथील वर्तमान छ २६ रमजान मुकाम कसबें शिरे येथे स्वामीचे कृपेंकटाक्षेंकरून येथास्थित असे विशेष. शिरें फत्ते जाहालियाचे वर्तमान छ २४ रमजानी सेवेसी लिहून पाठविलें आहे, त्याजवरून सविस्तर विदित

१ सेन्याप्रमाणें.

6410

होईल. शिरें मुकुंद् श्रीपत याचे हवाला करणार. काल निशाण मोर्च्यांतून गोटास आलें. शिवरात्र येथें होईल. उपरात श्रीरंगपटणास जातील. मीर रजा याची वस्तमात्र झाडून दिल्ही. गोपाळराव याचे गोटाजवल जागा दिल्ही. कलावें हें विज्ञापना.

¶" *Shira is captured and handed over to Mukund Shripat for administration. The Peshwa will proceed to Seringapatam after Shivratra,*" *says the report.*

---

*No. 143]* *[26-2-1767*

पौ छ २९ जमादिलौवल.

## श्रीगजानन

सेवेसी विनंती. सेवक मल्हार चिंतामण वाघ साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना. येथील क्षेम ता। माघ वद्य त्रयोदसीपावेतों आज्ञाधारकाचें वर्तमान येथास्थित आसे. यानंतर येथील वर्तमान सविस्तर राजश्री गोपाळराव सेवेसीं दिनप्रति(दि)नें लिहीत आहेत, त्याजवरून आवगत होतच आसेल. सांप्रत खास दस्तुरचें आज्ञापत्र राजश्री गोपाळराव यास सादर जालें. तेथें आज्ञा जे, सरकारचे कारकून आहेत त्यास गणती येथास्थित पाचंच सावे दिसीं देत जाणें, सरकार-किफायेती होये तें करणें, म्हणोन लिहिलें. येैशास, गणतीचें वर्तमान पूर्वी येक दो पत्रीं सेवेसीं लिहिलें, परंतु फिरून आज्ञापत्र सादर जालें नाहीं, याजकरितां अलीकडे वर्तमान ल्याहावयास आंतर पडिलें. छावणीस असतां हुजरी घेतली ते सेवेसी पाठविली. त्या आलीकडे सिरयेचे पारपत्यास गुंतले. स्वार आले ते गेर्ज-त्रोज गणती घेऊन रोजमुरा चाली लागला, याजमुळे खडे गणती जाली नाहीं. तेथून कूच जालियाउपर हरपनहालीचे नजीक खडे गणती घेतली. तदोतर कोपल घेऊन मुद्दल सरकारांत आलियाउपर लस्कर स्वारी सिकारीस लागलें तें आजपावेतों आदवनी प्रांत वलारी रायदुर्ग चित्रदुर्ग सिरे वगैरे आठ आठ मजली लोक लुगारीस गेले आहेत. लस्करांत ढोरांचे कलप मात्र नाहींत. आम्ही गणतीविसीं वारंवार म्हणतों, परंतु हे प्रत्योत्तर करितात कीं, आठवडियाचा आठवडा रोजमुरा देत जा म्हणिजे गणती जेव्हां म्हणाल तेव्हां घेणे. ये गोष्टींचे उत्तर प्रत्योत्तर द्यावयाम फार सुचते, परंतु खावंदाचे मर्जीचा आर्थ कलावा हेंच मानस होतें. सांप्रत आज्ञापत्र आलें याजवरून बहुत समाधान जालें. याउपर खडेगणती उत्तम प्रकारें घेतो. सारे लस्करची येकदां खडगणती व्हावी म्हणिजे उत्तम. राजश्री गुणवा व राजश्री त्रिंबक तुकदेव व राजश्री हरि राम व सारे सरदार यांस

आम्ही विनंती केली कीं, सारे लस्करची खटेगणती येकदा व्हावी. तुम्हांकडे सरकारचे कारकून आहेत ते गोपाळरायाची गणती घेतील, आम्ही तुमची गणती घेऊं. म्हणिजे उत्तम. वाळमेळीचा प्रकार होणार नाहीं. ये गोष्टीस राजश्री गोपाळरावहि राजी आहेत. परतु स्वामसा आगलयवाद धरून याजकडून सागितल्याने ते येकतील येसें नाहीं. यास आदरसत्कार करिताच पुरे होते. जे गणती सांगितली त्याप्रमाणें खर्चास द्यावें. मनांत मात्र येते कीं, गणती होऊन खर्चास द्यावें, परंतु समर्थ नाहीं, येसें बोलतात. येविसीची विनंती आम्हीं सेवेसी ल्याहावी येसी योग्यता काये? परंतु सेवाधर्म कचे वर्तमान सेवेसीं कळावें, पुढें सांगे, लस्करची खटे गणती येकंदर व्हावी म्हणिजे येथास्थित. याजकरितां येथील सरदारास आज्ञापत्रें सादर व्हावी की, सरकारचे कारकून तुम्हांजवळ आहेत त्याजकडून सारे येके दिवशीं खटे गणतीची च्यार च्यार दिवस अगोधर ताकीद करून उत्तम प्रकारें कोणाचा परा न फुटता गणती सरकारची होती त्या रीतीनें देणे, येसें आज्ञापत्र पाठवावें, अगर सरकारचे कारकून स्वामींनी येथें पाठविले आहेत त्यांतून येकाचेच नावें सर्वांस आज्ञापत्रें पाठवावीं की, यास गणती देणे व कारकून सरकारचे आहेत त्यांस येक आज्ञापत्र सादर व्हावें कीं, फलाणियास गणती येकंदर घ्यावयास सांगितलें आहे, तर ते तुम्ही येक विचारें होऊन स्वामीकार्य करणे, येसें आज्ञापत्र मर्जीस येईल तर पाठवावें, म्हणिजे गणती यथास्थित होईल. राजश्री गोपाळराव यानी पागेचे गणतीस मात्र आम्हासी छद्म केलें आहे. गोट गणतीहि दिल्ही नाहीं, खटे गणतीहि देत नाहीत. वरकड लोकाची गणती जसजसे जमा होत गेले त्याची गणती आम्ही घेतली, सिवाय रोजमुराहि दिल्हा नाहीं, याजमुळे कचे गणतीचा पाया आम्हाजवळ नावनिसीवार घोडियाचा रंग देखील लिहिला आहे. आम्हाबरोबर राजश्री सिवाजी व्यंकटेश व राजश्री कासी लक्ष्मण दिल्हे आहेत, हे आमचे विचारें वर्तोन स्वामीसेवा उत्तम प्रकारें करितात. वरकड येथील राजकी वर्तमान तर कूच मुकाम जालें तर सर्वांस चिठ्या पाठवाव्या, कारभार करणे तो राजश्री विसाजी नारायण याजवांचून कांही येक होत नाहीं, विनीस त्यानी आपले पतकानसी चालावें, राजश्री मल्हारराव याचे डेरियास दोहों दिवसा जावें, कार्यभाग जाला तो व पुढें करणे तो सांगावा, गणेशपंतासहि कार्याकारण बोलाऊन आणावें, राजश्री यशवंतराव यानीहि येक्यता संपादिली आहे, कार्यभागास उजूर करीत नाही. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Malhar Chintaman informs the Peshwa that his orders regarding the weekly muster of the entire army have not been properly executed as the majority of the soldiers are out plundering and most of the commanders are putting the writer off with all sorts of excuses.*

6412

No. 144] [March 1767 ?

श्री

[पहिला वंद महाल.]

विज्ञापना—गेले. गोपाळरायाचे हिसेबाचा फडशा जाला. सतावीस लाख रुा कर्ज समजाविले. त्यांपैकीं आठ लाख रुा तोडून एकूणीस ठरले. त्यांत पाच लाख पथकाची सिलक वजा घालून, बाकी चवदा राहिले ते दरसाल दोन लाख प्रमाणे द्यावे, ऐणप्रमाणे करार करून मागील जावसाल पुसो नये या-प्रमाणे करार होऊन फडशा करून नारो आपाजी पुण्यास गेले. हैदर नाइ-काची खंडणी लौकरी जाली तरी अर्काटाकडे जाऊन श्री गोविंदजीचे दर्शन घ्यावें असा श्रीमंताचा मनोगत आहे. खंडणीचा प्रकार, मदगिरी माघारी दिल्यास चाळीसपर्यंत व्हावी असा अन्वय दिसतो. परंतु येथील वंद भारी आहे. दुसरे, यंदा प्रतापहि भारी वाटला आहे, त्याजवर सलाबत मोठी पडिली आहे, त्याची खरावी बहुत, माणूस कोणी राजी नाही, असा विचार आहे. आजपर्यंत बगरूळ अथवा त्याजसीच गाठ पडिली असती, परंतु चेनरायदुर्गास पंधरा दिवस लागले यामुळें मनसबा लावणीस पडिला. याउपर श्रीइच्छेकडून काय होईल पाहावे. प्रस्तुत नेट आहे याप्रमाणेच धरिल्यास मोठेंच काम व्हावेंसे आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*This letter reports the probable terms of an agreement which the Peshwa would be willing to offer to Haidar.*

---

No. 145] [March 1767 ?

श्री

सेवेसी हरि बलाल सा। नमस्कार विज्ञापना येसीजे. हैदर नाईक याजकडील वकील येथे आला आहे, त्याजकडील बाकीचा निकाल जाला पाहिजे. यास्तव सेवकराम व त्याचा बाप सिवलाल यास लस्करात पाठवावे, म्हणजे सरकारचे बाकीचा निकाल करून देतील. सेवकराम येथे न आल्यास, कांहीच ठिकाण लागणार नाही, याजकरिता जासूद जोसी(डी) पाठविली आहे. आपणहि त्याज-बरोबर माणसें देऊन उभयेतां लस्करास ये तें करावे * येविसी सरकारचें पत्र स्वामीस गेलेच आहे. सेवकरामास जरूर पाठवावे म्हणजे फडशा होईल व हिशेबहि तपसीलवार पाठवावयास आज्ञा करावी. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Haripant requests Nana Fadnis to send Sevakram and his father Shivlal to settle with the agent of Haidar the amount of tribute due from him to the Peshwa.*

No. 146] [3-3-1767

पो छ २० सवाल सवा
फाल्गुन ह्या वहिणाजी
जासूद जथे कर्णोजी नाईक

श्री

सेवेसी माहादाजी बलाल व हरि बलाल सा नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ताा छ २ माहे सवाल मुा किले मदगिरी येथे स्वामीचे कृपेकटाक्षेकरून यथास्थित असे विशेष. हिकडील वर्तमान तरीं सिरें फते जाहालियाचे वर्तमान पूर्वी सेवेसी लिहून पाठविलेच आहे, त्याजवरून विदित जाहालेंच असेल. सिंऱ्याची मामलत मुकुंद श्रीपत यास सागितली. फडणिसी राजश्री नारोपंत नानाकडे मागे होती त्याप्रा त्याची त्याजकडे सागावी म्हणौन श्रीमंतास दोनतीन वेळ विनंती केली, परंतु न आइकिली. वाा राजश्री विनायकभट थथे यास सागितली. सिउवाने येऊन राहावे. मजमू थथे याजकडे होती ती कृष्णाजी गंगाधर सेणवी, पहिले हशमाचे दफ्तराकडे होता त्यास सागितली. मवनिसी कृष्णराव बलवंत याजकडे होती ती नारो मोरेश्वर सिवणकरे यास सागितली. याप्रमाणे दरकी धंदे सांगितले. सिऱ्याहून छ २९ रमजानी कूच करून त्याच रोजीं मुकाम मजकुरास आले. हा किला यावयासी येक दोन रोज लागतील. येथेहि हैदर नाइकाची मजबुदीन आहे. हे कार्य जाहाल्यावर पुढे चिकबालापुराकडे जातील. तेथील खंडणी जाहाल्यावर हुसकोटे गुरुमकोंडा या रोखे शह देऊन तेथील अमल बसऊन पुढे श्रीरंगपटणास जातील. हैदर नाईक पटणास आहे म्हणून दाट खबर आहे. सामानहि चांगलेंच आहे म्हणौन चोरवातमीचा बोलवा आहे. निजामअली अनेगोंदीजवळ आला. पुढे दरमजल येत आहे. श्रीमंत राजश्री दादा फडणीस व बाबा वैद्य अद्याप येऊन दाखल जाहले नाहींत. गजेंद्रगडाजवळ आल्याची खबर आहे. सिऱ्यास मुकुंद श्रीपाद याजवळ माा रनिलेकडील पागा व धोंडो दत्तात्रय मिलोन पाचशे स्वार व पाचशे गाडदी हुजूरचे ठेविले. आठसे प्यादे नवे त्याणी ठेवावे या प्राा तेथील नेमणूक जाहली. मीर रजा सिऱ्यातील यास जमावसुधा समागमे घेतला आहे. गोपाळराव याचे गोटाजवळ राहावयाची नेमणूक करून दिल्ही आहे. हैदर नाईक पटणास आहे, त्यास बरे वाटत नाहीं, असी दाट खबर आहे. फाल्गुन मास लिहिली आहेत काम यास लागले. पुढे चैत्रात काही त्याजकडील अनुसंधान लागेल तर पाहावे, नाहीं तर पटणाकडे जातील. इकडे छावणी होती तर मोठीं मोठीं कामे सहजात होती. परंतु ती

१ अधिकाराचे हुद्दे.

डाल दिसत नाहीं. पुढें जे होइल ते सेवेसी लिहून पाठऊः हैदर नाइकानें आजपावेतो दुराचरण केले त्याचे प्रायश्चित्त बरेवजेनें व्हावे असा समय होता, परंतु देसचा पायबंद जबरदस्त आहे, यामुळें छावणी होणे दुरापास्त आहे. हैदऱ्यो निर्मूळ करावयाचा समय हाच आहे. श्रीकृपेने जे घडेल ते खरे. विदित व्हावे हे विज्ञापना.

¶*Mahadaji Ballal and Hari Ballal to Nana Fadnis, informing him of the measures taken by the Peshwa for garrisoning Shira newly conquered. The Peshwa then proceeded to Madgiri and would soon come up against Haidar, they add.*

---

*No. 147]* *[6-3-1767*

पौ छ १७ सवाल
मन सबा ग्रा रहि-
मतखान व घासी.

श्री

सेवेसी माहादाजी बलाल व हरि बलाल कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता छ ५ सवाल मुा किले मदगिरी प्रा श्रीरंगपटण स्वामीचे कृपेकडून वर्तमान यथास्थित असे विशेष. सिरे फते जाले. मुकुंद श्रीपत यास तेथे ठेविले हे पूर्वी लिाच आहे. सिंरयाहून कूच करून येथे आले. त्यास मदगिरीचा किला या प्रांती पाहाडी चांगला फार अवघड, माणूस सेवटील चौबुरजीत जावयास अवघड, अशे रीतीचे स्थल. खाली शहरपन्हा चिरेबंदी. हैदर नाइकाचे विश्वासु स्थल. त्यास मोर्चे लाविले. येका दिवसांत हला करून शहरपन्हा घेतला. लूट फार जाली. दाहा पंधरा वर्षांत आपले फौजेस असी लूट मिळाली नवती. शहरपन्हा घेतला. वरील लोक कौलास आले, त्यास खाली उतरून सरकारचे निशाण चढले. बिदरूरचा राजा व राणी येथे कैदेत ठेविली होती ती सापडली. श्रीमंतानी आणून बहुत बहुमान केला. राहुट्या वगैरे सरंजाम देऊन ठेविली आहेत. मोठे येश आले व किला फार चागला हस्तगत जाहाला. याउपरी हुसकोटे कोल्हाराकडे जातील. हैदर नाइकाचा वकील पटणाहून निघाला. येकदोन रोजात लस्करात येईल. तदोतर बोलण्याचा प्रकार होईल

---

१ हैदराचा असा हलका उल्लेख केलेला अनेक वेळा येतो. हैदर हलक्या कुळातला म्हणून नफर मजकूर असाहि बरेच वेळा उल्लेख केला गेलेला आहे. २ शहरपन्हा=तटबन्दी.

तो लिहून पाठऊ. ' श्रीमंत राजश्री दादा फडर्णास छ ३ सवाली लस्करात दाखल जाहाले. कळले पाहिजे. हैदराचा वकील लस्करांत आला. याउपरी होईल ते लिहून पाठऊ. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Mahadaji Ballal and Hari Ballal Phadke report the capture of Madgiri and the acquisition of a large amount of plunder.*

---

*No. 148]* *[8-3-1767*

पो छ १७ सवाल सन सबा

श्री

सेवेसी विज्ञापना. ता छ ७ सवालपावेतो कसबे मेदगिरी येथे सुखरूप असो विशेष. किले मजकूर हस्तगत जाहाल्याचे वर्तमान पेशजी लिहिले आहे, त्याजवरून विदित होईल. मदगिरीचा सुभा लक्ष्मण बलाल मेहेंदले आपाकडील यास सांगितला. सिविका दिल्ही. फडनिसी लक्ष्मण गोविंद नारो बाबाजीकडील यास सांगितली. मजमु मोरो खंडेराव कारकून सिलेदार यास सांगितली. तूर्त येथील रखवालीस स्वरूपजी खुले यास पथकसुधा ठेविले. येथील बंदोबस्त करून पुढे बालापुरास जावयाचा मनसबा सिध जाला, तो हैदर नाइकाकडील करीमखान व आपाजी राम वकील कालच येथे आले, त्याच्या भटी जाहाल्या, याजमुळे येकदोन मुकाम करावेसे ठरले. राजश्री गोपालराव व रास्ते यास पुढे चिकबालापुराकडे रवाना केले. मुरारराव याची फौज मटिकसर घ्यावयामी पाठविली आहे. वकिलासी बोलोन खडणीचा मजकूर सिधतेस आला नाही. परंतु बोलावयाचा भाव तूर्त तीस पस्तीसपावेतो बोलावे, मदगिरीचे ठाणे माघारे घ्यावे असा वकिलाचा भाव आहे. परंतु येजमानाचा भावगर्भ पंनासास उणे करू नये, सरकारचा तालुका व मुराररावाचा मुलूक झाडून सोडावा, कडप तालुक्यात त्यांणी ठाणी घेतली आहेत ती सोडावी, असे आहे. अद्याप त्याच्या व यांच्या बोलण्याचा अर्थ बहुतकरून कोणास समजला नाही, परंतु स्थूलमानेकरून बोलवा आइकला तो लिहिला आहे. यंदा हैदरनाईक फार करून आयास आला आहे. घाटाखालून फजीत पावोन आला, इकडे श्रीमंतानी येवून ठाणी घेतली. नवाबहि आदवानी तालुक्यांत आले, मागाहून येत आहेत, याजमुळे त्याच्या लोकानी धास्त खाऊन बहुत बेदिल आहेत. याजमुळे श्रीमंत जसे म्हणतील तसे आइकेल, यांत गुंता नाही. येथील सुभा रावो बाबाजीस सागत होते त्यास ते कबूल न करीत. मग लक्ष्मण बलाळ मेहेंदले यास सुभा सांगितला. मदगिरी किला या प्रांती दौलताबादप्रमाणे आहे. जागा बाकी चागली आहे.

हैदरनाइकास थोडेंसे बरेंहि वाटत नाहीं, यामुळें फार करून सला करावा हा यांचा मानस आहे. मातबर खंडणी देऊन मुलूक पहिल्याप्रमाणें सोडिल्यास आइकावें ही येथील मर्जी आहे. फौजेचा दबाव चांगला पडिला आहे. हा किला लोकर आला यामुळें बहुत हैदरनाइकांनें दहशत खादली आहे. कलावें बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे, हे विज्ञापना.

¶*The measures taken by the Peshwa in settling the newly conquered district of Madgiri and the various officers appointed to administer it are given in this letter. Negotiations started by Haidar through Karimkhan and Apaji Ram are also referred to.*

---

No. 149] [18-3-1767

पां छ ९ जिल्काद सवा.

श्री

सेवेसी विज्ञापना. ताा छ १७ सवाल वर्तमान यथास्थित असे विशेष. श्रीमंतांनी मदगिरीहून कूच करून दोन कोस चेनरायदुर्गास याच मुकामीं आले. किला पाहाडी बेलाग, बरतें तीन परिघ. मोर्चे लावणें प्राप्त जाहाले. आठ दिवस मोर्चे बसले. तोफांची मात्र मारागिरी होते. भिताड मजबूद. उपाय नाहीं. आणखी दोनच्यार दिवस वाट पाहून हला करावी असें होत आहे. घडेल ते खरें. राजश्री गोपालराव फौजसुधा जाऊन थोरलें बालापूर घेतलें. बरकड राजश्री मुराररायाची ठाणी फार करून बसली. येकदोन राहिली तीहि बसतील. हैदर नाइकाचा वकील गोपालरायाचे लस्करात आला आहे. त्याची बोली कीं सिरें बालापूर घेतलें ते घेतलें. आतां दुसरी जागा घेऊं नये. मदगिरि पटणची ती माघारी यावी. तीस लक्ष रुा खंडणी देतो. श्रीमंतांचें मानस कीं, पहिला सरकारचा तालुका झाडून सोडावा व मदगिरि नवा किला घेतला हा सोडूं नये. आणि खंडणी घ्यावी येविसींची भानगड पडली आहे. मदगिरी सोडिली नाहीं तर खंडणी होत नाही. फेर्दास काम पडेल असें दिसतें. श्रीसतेकडून घडेल ते लेहून पाठऊं. आपाजी जाधव यांचे पाठीवर पुली जाली होती. पंधरा वीस दिवस श्रमी केले. काल फाल्गुन वाा २ मंगलवारीं रात्रौ देवाज्ञा जाली. मोठा सरदार गेला. ईश्वरी इच्छा प्रमाण. मोगल हरपनहलीचे रानात आला. मागाहून येतो. मोगलाचें येणें व्यर्थ जालें. सरकाच्या खंडण्या जाल्या. त्याजपासून तोहि घेतो. रुकनुतदौले पाच हजार फौजेनसी पुढें येणार आहेत. नवलविशेष होईल ते लिहून पाठऊं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Haripant writes home that the Peshwa's guns are pounding the walls of Chenraidurg, which would later on be assaulted. Balapur has been invested and Haidar is seeking terms. Appaji (Satvoji) Jadhav is reported to have died.*

*No. 150]* *[18-3-1767*

पो छ ९ जिल्काद सबा सितैन.

श्री

सेवेसी माहादाजी नारायेण व लक्ष्मण नारायेण सां नमस्कार विज्ञापना. येथील ता छ १७ सवाल मुकाम किले चेनरायदुर्ग प्रा श्रीरंगपटण येथे स्वामीचे कृपेकटाक्षेकरून येथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान तरी मुकाम मजकुरास श्रीमंत छ १० सवाली आले. येताच मोर्चे लाविले. किला अवघड. आंत लोक फार आहेत यामुळे अद्याप बोलो लागले नाहीत. गोलागोली रोज होत आहे. गोपालराव व आनंदराव रास्ते यास पुढे चिकबालापुरास पाठविले आहेत. त्याणी थोरले बालापूर हलके होते ते घेतले. धाकटे बालापूर मजबूत आहे ते त्याचे वस्तू यावयाचे नाही व हाहि किला लौकर आला पाहिजे यास्तव त्यास येथे बोलाविले आहे. येका दोहो रोजी हला करून किला घेणार. उपरांत धाकटे बालापुरास जाणार. हैदर नाइकाचा वकील गोपाळराव याजवळ आहे. अद्याप काही बोर्ते बसत नाही. यांचा मानस पहिल्याप्रमाणे मुल्क व हाली मदगिरि किला घेतला हा सोडून मातबर खंडणी निदान चालीस लाखपावेतो जाहाल्यास सलुख करावा असे आहे. पुढे होईल ते लेहून पाठऊ. सटवोजी जाधवराव यास बरे वाटत नव्हते, त्यास फाल्गुन वद्य द्वितीयेस भोमवारी देवाज्ञा जाली. मातबर सरदार गेला. सेवेसी कळावे. बहुत काये लिहिणे, कृपा केली पाहिजे, हे विज्ञापना. निजामअली रायेदुर्गाजवल आला. खंडण्या घेत येतो. हे विज्ञापना.

¶*Mahadaji Narayan reports that Gopalrao Patwardhan and Anandrao Raste captured Balapur and that the Peshwa has besieged the fort of Chenraidurg ; the letter also announces the death of Satvoji Jadhav, son of Pilaji Jadhav, which happened on the 17th of March 1767.*

---

*No. 151]* *[20-3-1767*

पा छ ३ जिल्काद सबा
चैत्र हा राणोजी रामजी
जथे वजाजी नाईक

श्री

शेवेसी बाबूराव केशव व बाबाजी माहादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. छ १९ सवालपावेतो मुा किले चेनरायदुर्ग स्वामीचे कृपेकरून कुशल असो

१ पत्री मजकूर नाहीं. तडजोड ठरत नाहीं.

विशेष. या किल्यास मोर्चे लागोन आज दाहा दिवस जाहाले, रोज तोफाचा मार होतो, पाहाडी दगडी किला, कोटाचे काम मजबूद, याजकरितां काहीसी सफेली ढासलंत. रिकीमे माणूस वर जावयासी संकट पडते. तीन आंगे बेलाग आहेत. येक आंग काहीसे आहे, तेथे तोफा नेऊन दोनतीन दिवस मार होत आहे. हला करावयासी यकायेकी हिया होत नाही. येकदोन रोजा हला करावी असा मनसुबा आहे. हैदर नाइकाचे खंडणीचा मजकूर अद्याप काही नाही, निजामअली चित्रदुर्गानजीक आले आहेत. वरकड नवल विशेष लिहावेसारिखे नाही. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶The writers Baburao Keshav and Babaji Mahadeo report that the fort of Chenraidurg is still holding out Its strategic strength makes it invulnerable.*

---

[20-3-1767

*No. 152*]

पा छ १९ जिलकाद चैत्र.

श्री

श्रीमंत राजश्री दादासाहेब
स्वामीचे सेवेसी

विनंती शेवक बाळाजी जनार्दन कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता छ १९ सवालपर्यंत यथास्थित असे विशेष. श्रीमंत राजश्री रावसाहेब यांचे लस्करातून काल पत्रे आली. लस्करचा मुकाम किले मदगिरीनजीक आहे. सिरे फते जाहाल्याचे वर्तमान पेशजी स्वामीस लिहिलेच आहे. सिऱ्याहून कूच होऊन किले मजकुरास गेले. त्यास मदगिरीचा किला त्या प्रांते फार अवघड, माणूस सेवटील चौबुरजीत जावयास अवघड, अशा रीतीचे स्थल. खाली शहरपन्हा चिरेबंदी. हैदर नाइकाचे विश्वासु ठिकाण. त्यास मोर्चे लाविले. येका दिवसात हला करून शहरपन्हा घेतला. लूट लस्करात फारच आली. शहरपन्हा घेतलियावर किल्यावरील लोक कौलास आले, त्यास खाली उतरून सरकारचे निशाण चढले. हा किला पाहाडी आहे, फार चांगला आहे. दौलताबादेचे प्रतिमेचा आहे. अल्पसायासे हस्तगत जाहला. या किल्यात बिदनूरचा राजा व राणी अटकेस होती ती सापडली. त्यास बहुमान वस्त्रे दिल्ही.

---

१ (?) २ कठीण. लाग न चाले असे. ३ काहींसे सुकर.

रामचंद्र गणेश यांजवळ पांच हजार हुजरात देऊन चिकबाळापुरास रवाना केले. त्याणी मोर्चे लाविले. येथून आठ कोस आहे. श्रीमंतानी आज कूच केले, चिकबाळापुराआलीकडे दोन कोस राहातील. बाळापूर लवकरच येईल. नबाब रामदुर्गपर्यंत आले, तेहि येत आहेत. हैदर नाइकाकडील करीमखान आला होता तो फिरोन पटणास गेला. आठां दिवसी यावयाचा करार केला. सा दिवस जाले. दोन चार रोजा येईल. मनोदयानरूप जाबसाल जाल्यास नबाब आल्या-पूर्वीच फडशा होईल. नाहीं तर चार दिवस अधिक लागतील. होईल ते लिहून पाठऊ. आपण सांडणीस्वाराबा व जासुदाबा पत्रें व सरकारचा जिनस अफ्ता-गीर पडदे वगैरे पा ते पावले. पोशाक पावले, मर्जी प्रसंन जाली. जाब तयार जाले आहेत मागाहून पाठऊ. प्रतापगडचा व दुसरे दोन कागद श्रीमंतानी तूर्त रवाना करविले ते खिजमतगाराबा पा आहेत. बरकट मागाहून पाठवितो. गरकड नवल विशेष लिहिजेसे नाही. श्रीमंत रा दादा लस्करात आलियावर गाडी-खान्याचे जागयाविसी श्रीमंतास विनती केली. वरी झटपट जाली. श्रीमंतास विनती केली कीं मन:पूर्वक देणे तर द्यावी, नाही तर तसेच मागावे. फिरोन पुसणार नाही. तेव्हा कृपा करून सागितले की निखालसपणे ती जागा दिल्ही. येविसी श्रीमंतानी आपणास व रा तात्यास पत्रे लिहिली आहेत व दादानी पत्रे लि आहेत ती पाहून त्याची पैरवी करून जागा हवाली करून द्यावी. श्रीमंताचे चित्तांत पुरते आले की ही जागा दिल्याखेरिज श्रीमंत बाबांचे समाधान राहात नाही. त्यावरून संशय न ठेविता जागा दिल्ही. आपण उद्योग करून कार्य करून घ्यावे. लांबणीवर पडले म्हणजे लांबच पडते. येविसी मी ल्याहविसे नाही. ये गोष्टीची जितकी त्वरा तितकी उपयोगी आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*[Hanpant Phadke informs Nana Fadnis of the capture of Chenraidurg and further states that the places invested by Gopalrao and others will soon fall.*

---

*[14-4-1767*

*No. 155]*

पो छ २९ जिलकद सन सबा

श्री

सेवेसी माहादाजी बल्लाळ व हरि बलाळ सा नमस्कार विज्ञापना. ता छ १४ जिलकाद मुा कसबे हु(स)कोट येथे स्वामींचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान

१ बाबूराव राम फडणीस.

येथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान तर दोन बाळापुरे देवनहली व नदीगड व हुसकोटे येणेप्रा ठाणीं घेऊन तमाम आमल बसला. पुढे मोगल येणार आहे तो आलियावर मग बेंगरुळास लागतील किंवा काये मनसबा होईल हे न कळे. मोगल मदगिरीवर आहे. सोळा कोशाचे अंतर आहे. आजपर्यंत श्रीकृपेने मनसुबा चांगला होत आला. खंडणी होऊन फडशा होणे त्यास मदगिरि आदिकरून त्याची स्थळे घेतली ती देत नाहीं, तेव्हा खंडणी कसी होते? त्यात मोगल मागाहून येतो त्याचा गुढंगा आतून आहे. मोगल लवकरच येऊन मिळेल. मग काय ठराव होणे तो होईल. छावणीचाच मनसुबा, परंतु देसी जरूर जाणे यामुळे विसकळीत दिसते. दिवस मसलतीचे राहिले नाहीं. जे होईल ते लिहून पाठऊ. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. लस्करात रोग फार आला आहे. मजला आठ चार दिवस ताप येतो. उपाय करितो. आपले आसीर्वादेकरून उत्तमच होईल. केवळ शरीर अशक्त. पुण्यात तीन महिने वाखा जाला. वस्तेवर उपद्रव होतो. असो. जगन्निवास ठेवील तसे राहावे. हे विज्ञापना.

राजश्री नारोपंत नाना स्वामीस सा॥ नमस्कार लोभ कीजे हे विनंती.

¶*Mahadaji Ballal and Hari Ballal write about the successive victories in the campaign and reiterate their opinion that the Peshwa's return to Poona would undo all that has been achieved so far*

---

*No 156]* *[27-4-1767*

पो छ २४ जिलकाद

## श्रीविठल

सेवेसी राघो बावाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ता॥ छ २१ जिलकादपर्यंत येथास्थित असे विशेष. ताराचंद याजबराबर इभ्रामखान लोहाणी हैदरखान याजकडील पाडाव किलेयात ठेवावयास पाठविले ते येऊन पावले. आज्ञेप्रमाणे बेडी घालून ठेविले. ताराचंद जमादार याचे विद्यमाने होसकोटेयास बंदीवान आणून पोहचाविला. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Ragho Bawaji acknowledges receipt of a captive of war from the army of Haidar.*

---

१ चिक्कबाळापूर व दोडबाळापूर २ एकाद्या किल्ल्यास किंवा ठाण्यास लागणें = वेढा देऊन बसणें.

३ फितूर, हैदराकडे सख्य असा अर्थ किंवा मोगलासहि काहीं अंतस्थ मुद्दे साधावयाचे आहेत असा अर्थी.

No. 157] [24-4-1767

पौा छ १३ जिल्हेज.

सवा ह्या बोथाटी बारदार

श्री

शेवेसी माहादाजी बलाल व हरि बलाल सां नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता। छ २४ जिलकाद मुा नर्जाक बेगरूल येथास्थित असे विशेष. इकडील वृत जाहाले ते वरचेवरी पूर्वी शेवेसी लिहून पाठविलेच आहे. प्रस्तुतचे वर्तमान तरी आपाजीराम हैदरनाइकाकडून बोलीचालीच्या संदर्भास आले होते, ते सा दिवसाचा वाइदा करून गेले. त्यास आज आठ दिवस जाहाले. येका दो रोजी येतील. त्यात मुलकाचा लढा मातबर आहे. दुतर्फा ये गोष्टीची ओढ मातबर आहे आणि देसी जावयाची निकड इकडील बहुत आहे, यामुळे थोडी-बहुत त्याची गोष्ट आइकून खंडणीचा प्रकार होईलसा दिसतो. त्यामध्ये घडेल ते खरे. मोगलहि विसा कोसावर आले आहेत. रुकनुतदौले इकडे यावयास मोगलापासून निघाले आहेत. येका दो रोजी येऊन पोहचतील. तदोतर परिछिन्न पडशा होईल. सारांश खंडणीचा प्रकार वडो न घडो, परंतु देसी येणे जरूर होते यात संदेह नाही. पैका नाही यामुळे खंडणीचा येवज बहात वाटोले करून घेतीलसे दिसते. विदित व्हावे. वरकड नवल विशेष लिहिजेसे नाही. येक महिना जाला, स्वामीकडील पत्र येऊन वर्तमान कलत नाही, तर लिहून पाठवावयास आज्ञा केली पाहिजे. इकडे पाऊस पडू लागला आणि मसलतीचा सेवट येकहि नाही. नद्यास नावा नाहीत. जे होईल ते लिहून पाठऊ. छावणी करिते तर फार काम होते व पैका मुलूक फार मिलता, परंतु देसी जाणे यामुळे खंडणीहि जाली तथापि हलकीच होईल. कर्ज दाहा बारा लक्ष लस्करात घेतले आहे. कसी तरी खंडणी जाली आणि बाहेरचे बाहेर फिटले म्हणजे फार आहे. मजला समाधान वाटत नवते, आता बरे आहे. विशेष होत नाही. सेवेसी श्रुत होय ही विज्ञापना.

¶*Mahadaji Ballal and Hari Ballal write that negotiations with Haidar through his agent Apajiram are progressing as the Peshwa is anxious to return.*

---

No. 158] [3-5-1767

ले.

पौा छ २२ जिल्हेज सन सवा

श्री

सेवेसी माहादाजी बलाळ व हरि बलाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ताा छ ४ जिल्हेज मुा बेगरुलानर्जाक वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामीनी

सांटणीस्वाराबा। पत्रे पा। ती पावली. सविस्तर मागाहून लिहून पाठवितों. इकडील वर्तमान एकतीस लक्ष रुा खडणी जाली. यासिवाय मोगलाची पेशकसी दरसाल सा लक्ष, तीसाला अठरा लक्ष याप्रमाणें ठराव जाला. माहादशेट निशेसाठी हैदर नाइकाकडे पाठविले. सा दिवस जाले. चहू दिवशीं जावस्वाल आला म्हणजे कूच करून दरमजल पुण्यास येणार. मग काहीं गुता नाही. मोगल सा कोसांवर राहिला आहे. रुकनुतदौले येऊन भेटले. लस्करांतच आहेत. दोन रोजा निरोप घेऊन नवाबाकडे जातील. इकडे निल्य पाऊस पडतो. वाटेने हैराणगत होईल. सविस्तर मागाहून लिहून पाठवितों. श्रीमंत लवकर पुण्यास येणार. यांचे मर्जीची कामें असतील, लवकर आटोपावयाजोगी, ती आटोपून घ्यावी. वरकड नवल विशेष लिहिजेसे नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Mahadaji Ballal and Hari Ballal give the terms of the treaty concluded with Haidar.*

---

*No. 159]* *[5-5-1767*

पो। छ २० जिल्हेज सबा

**श्री**

सेवेसी मांहादाजी बलाल व हरि बलाल कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता। छ ६ जिल्हेज मु॥ नजीक बेगम्हल वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामींनी छ १३ जिलकादचें पत्र प्यायावा। पा। ते पावोन बहुत संतोष जाहाला. लिहिले वर्तमान कलले. लाखोटे पाठविले आहेत हे श्रीमंतास प्रविष्ट करून उत्तर घेऊन पाठविणे म्हणून आज्ञा. आज्ञेप्रा। पत्रें प्रविष्ट करून उत्तरें घेऊन पा। असेत, त्यावरून कलेल. इकडील वर्तमान तर हैदर नाइकाची खंडणी येकतीस लक्ष जाली व मोगलास पेशकसी सा लक्ष द्यावयाचा करार आहे. त्याचे तिसाला अठरा लक्ष येणेप्रा। ठराव जाहाला. ऐवज निमे तूर्त, निमे आश्विनपर्यंत, दोन हातियांनी, याप्रा। ठरले. निशा करून द्यावयासाठी माहादसेट पटणास पा।, त्यास आठ दिवस जाले. येक दो रोजी जावस्वाल आला म्हणजे येथून कूच करून दर-मजल देशास येणार, मग मार्गी काही गुंता नाही. सिंर, चेनरायदुर्ग व मदगिरि व थोरले बालापूर हुसकोट, इतका मुलूक सरकारात राहिला. वरकड ठाणी चिकबालापूर, नंदिगड, कोल्हार वगैरे सरकारात घेतले होते ते सोडून द्यावे, बसवापटण त्याजकडे आहे तसे असो द्यावें, याप्रा। करार जाला. मोगलाकडील

१. नजराणा.

रुकनुतदौले श्रीमंतास भेटावयास आले. नवाब सा कोसांचे अंतरे आहेत. रुकनुतदौले याची भेट जाली. मेजमानी परस्परे जाली. येक दो रोजात निरोप होईल. याप्रो इकडील वर्तमान आहे. स्वामीस कळावे म्हणोन लिा असे. पुण्यातील कामे श्रीमताचे मर्जीची लवकर आटोपावयाजोगी असतील ती निकड करून आटोपून घ्यावी. नवल विशेष आढलेल ते लिहून पाठऊं. मिराकडे गुरमकोंडा वगैरे कडप्याचा मुलूक त्याचीच ठाणी होती तो सरंजामात त्याजकडे करार करून दिल्हा. कळावे. श्रीमंताकारणे पाटणी तांदूल मण, दोन मण, तुंगभद्रेचे अनमाने युक्तीस पडल्यास जरूर पाठऊन द्यावे. सूचनार्थ लिहिले आहे. श्रृत होय हे विज्ञापना.

¶*The letter mentions the articles of the treaty concluded by the Peshwa with Haidar.*

---

*No. 160]* *[8-5-1767*

पो छ २२ जिल्हेज
सन सबा

श्री

सेवेसी माहादाजी बल्लाल व हरि बल्लाल कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ताा छ ९ जिल्हेज मुाा नजीक बेगरूल वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान तर हैदर नाइकाचा तह जाहाला. येकतीस लक्ष रु. खडणी जाली. येविसींचा तपसील येक दोन पत्रीं सेवेसी लिहिला. तो पत्रे पावोन वर्तमान विदित जाहालेच असेल. महादसेट पटणास जाऊन ऐवजाची निशा करून घेतली. कांही ऐवज लस्करांत आला, राहिला तो मागाहून घेऊन येतील. दोन च्यार रोजांत माहादसेट आले म्हणजे दरकूच पुण्यास येत असत. आज तोफखाना पुढे रवाना जाहाला. छावणीस फौज राजश्री गोपालराव व रास्ते राहतील असे आहे. मोगलाकडील (रुक)नुतदौले आले होते. परस्पर आदर हो(ऊन वि)दा जाहाले. वरकड इकडील नवलविशेष वर्तमान लिहिजेसे नाहीं. श्रीमंताचे मर्जीची कामे अहेत, त्यात लवकर व्हावयाची ती नि(कड) करून करावी. सूचनार्थ विनंती लिहिली असे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The writers Mahadji Ballal and Hari Ballal report that Haidar agreed to a levy of thirty-one lakhs and that Mahadshet had been deputed to Seringapatam to receive the assurance for the money.*

No. 161] [About 9-5-1767

पेाा छ २७ जिल्हेज सन
सबा बाा कासीद अजूरदार

श्री

सेवेसी माहादाजी बलाल व हरि बलाल कृतानेक साष्टाग नमस्कार विज्ञापना. ताा छ १ जिल्हेज दोन प्रहर दिवस मुाा नजिक सिरे सा कोस वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान हैदर नाइकाकडील खंडणीचे साडेपंधरा तूर्त यावे पैकी नव आले, साडेसा येणे, त्यास माहादसेट मागे आहेत, घेऊन येतील. या तलावर दोन तीन मुकाम मुराररायांचे रवानगीकरितां होतील. मग दरमजल तुंगभद्रा कृष्णा उतरून दरमजल पुण्यास येणार. तुगभद्रेवर गेले म्हणजे फौजांचे *नाल्बंदीचे काम चालीस लागेल. मोगल बेगरुलाजवळ आहे.* त्याचे मते माझी खंडणी थोडी जाली, काही अधिक हैदर नाइकास शह द्यावा. श्रीमंतानी करार केला त्यास अंतर पडते म्हणोन कृष्णराव बलाल मोगलाकडे पाा आहेत कीं, कूच करून भागनगरास जाणे. उत्तर येईल ते लिहून पाठऊ. वरकड नवल विशेष लिहिजेसे नाहीं. सेवसी श्रुत होय. हे विज्ञापना.

राजश्री नारोपंत नाना स्वामीस साष्टांग नमस्कार. लोभ कीजे हे विनंती.

¶*Mahadaji Ballal and Hari Ballal to Nana write about the tribute that was agreed to by Haidar.*

---

No. 162] [17-5-1767?

पो छ १ मोहरम सन सबा

श्री

तीर्थस्वरूप राजश्री नाना
वडिलांचे शेवेसी

आपत्ये मोरोबाचे कृतानेक साष्टाग नमस्कार विनंती. येथील क्षेम ताा छ १८ जिल्हेजपावेतो मुाा नजिक चित्रदुर्ग जाणोन स्वकीय संतोषवृत्त लिहीत असिले पाहिजे विशेष. आपण छ ३ जिल्हेजचें पत्र पाठविलें तें छ १६ मिनहूस पावलें. जाग्याविसीचा मजकूर लिहिला तो कलला. जागा स्वाधीन जाहाल्याप्रों आहे. दो चहू रोजानी निशेप करून घेतो म्हणून लिाा, उत्तम आहे. हे काम दिकतीचे आहे. यासाठी जितकी त्वरा होऊन सत्वर स्थल हस्तगत करावे आणि त्यास जागा देविली आहे ती त्यास देऊन ते तेथे जाऊन राहिले म्हणजे गुंता नाही.

इकडील वर्तमान तर सर्व सरकारचे पत्रांवरून कळतच आहे. हालीहि हरिपंतानीं लिहिले आहे त्यावरून ध्यानास येईल. खासा स्वारीहि सत्वरीच देशास येणार. श्रुत होय. बहुत काय लिहिणे कृपा लोभ कीजे हे विनती.

¶*Moroba Dada informs Nana Fadnis of the Peshwa's intention to return to Poona.*

---

*No. 163*] [*27-5-1767*

पौ छ ६ मोहरम सन्ना

श्री

सेवेसी माहादाजी बल्लाळ व हरि बल्लाळ साा नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ताा छ २८ जिल्हेज मुाा नर्जीक कोपळ येथे कृपेकडून सुखरूप असो विशेष. इकडील होत गेले वृत ते वरचेवर लिहीत गेलोच आहो. राजश्री गोपाळराव काल फौजसुधा मिरजेस गेले. सावनूरवाले गेले. मुराररावा गेले. आता हुजरात मात्र राहिली आहे. त्यापैकी वरचेवर फौज जातच आहे. या उपरी गुंता राहिला नाहीं. मजल दरमजल देशास येतच आहेत. टोक्यास जाण्याची संभूत[१] आहे. त्यांमध्यें घडेल ते खरे. स्वामीस कळावे याजकरिता लिहिले असे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Mahadaji Ballal and Hari Ballal inform Nana that the Southern campaign has been brought to a close and that the army is returning home.*

---

*No. 164*] [*4-10-1767?*

पाा छ १० जमादिलोवल.

श्रीशंकर

सेवेसी विज्ञापना विनंती. कोपळच्या किल्यास राजश्री गोपाळराव याहीं वेढा घातला होता. तीन दिवसात किला माहाराजाचे पुण्यप्रतापेकरून बहुत मेहनत करून फते केला. सेवसी श्रुत होये हे विज्ञापना

¶*News is reported that Gopalrao Patwardhan captured the fort of Koppal.*

---

१ सभूत वार्ता. वास्तविक सभूत याचा अर्थ किंचित्, यत्किंचित् असा आहे परंतु ऐतिहासिक वाङ्मयात त्याचा वार्ता या अर्थी पुष्कळ वेळा उपयोग करतात.

No. 165] [7-12-1767

पौ छ ८ साबान समान पौष मास,

श्री

श्रीमंत राजश्री रावसाचे सेवेसी

आज्ञाधारक राजो दादाजी दिा हजरत मोहदिन सो सां नमस्कार विनंती उपरी. ठाणेच सनद हजुरास नवाब बंदगान अलीजवळी माहाराजांनीं पाठविले असतां बजिनस सनद हुजरे सांघाते देऊन नवाबसानी येथें पाठविले होते. माहाराजाचे सनदप्रमाणें ठाणें पावलें. तफशील.

१ भनू
१ कविताळ
१ मोसकी
१ सिंदनूर
१ रवडकुंब

५

येणेंप्रमाणें पांच ठाणे माहादजी दगडे व बयाजी कामळे हुजेरेचे मार्फतीनें आम्हांस पावले. सेवेसी श्रुत असले पाहिजे, हें विनंती.

छ १५ माहे रजब सन ११८१ हिजरी

¶*A receipt given to the Peshwa by Rajo Dadaji for having taken possession of five places according to a Sanad.*

---

No. 166] [9-1-1768

पौ छ २१ रमजान
माघ वद्य अष्टमी

नकल

श्री

राजश्री महिमाजी सिंदे गोसावी यांसी

ꣳ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री माधवराव बलाल प्रधान आसीरवाद. सुरू समान सितैन मया व अलफ. तुम्हीं पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहाले. तालुके ममतानगड सरकारातून मीर रजा अलीखान याजकडे आहे. तेथील पुरातन संस्थानिक दासापा नाईक हैदरअलीखान याच्या कैदेत होता. तेथून सुटोन तालुके मजकुरी येऊन पाचसातसे प्यादे मेळऊन भुइकिला ममतानगड यानी घेतला. याजकरितां मीर रजाकडील संजीवन रडी याणी आम्हास लेहून

6428

पाठविले. त्याजवरून त्याचे कुमकेस जाऊन मुद्दकिला घेऊन रडीचे हवाली केला व दासोपाची व संजीवन रडीची भेट करून देऊन खासा स्वारी या प्रांते येई तोपावेतो कजिया न करावा याप्रा करार केला म्हणून लिहिले ते कळले. उत्तम केले. याउपरीहि तिकडील वर्तमान लिहीत जाणे. जाणिजे. छ १८ साबान. आज्ञा प्रमाण.

¶*Madhavrao Ballal acknowledges receipt of a letter from Mahimaji Sindia, reporting that the fort of Mamatangad was recaptured by Sanjeewan Raddi.*

---

*No. 167*] [*17-11-1768*

पौ छ २३ रजब
सन तिसा हा सेख
इसमाल सांडणी स्वार

**श्री**

राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गोसावी यासी

विनंती उपरी. चिरंजीव राजश्री नारायणराव यांचे स्वारीसमागमे खर्चास पंचवीस हजार रुपयांचे होन सांडणीवर घालून जलदीने पाठऊन देणे. रा छ ३ रजबू सुरु तिसां सितैन मया व अलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*The Peshwa asks Nana Fadnis to send 25,000 Hons to his brother Narayanrao.*

---

*No. 168*] [*16-2-1769*

पौ छ ८ सवाल

**श्री**

सेवेसी *गणेश मल्हार विज्ञापना येसिजे. इकडील वर्तमान तर श्रीमंत रावसाहेब* तर माणुरावर आहेत व नवाब निजामअलीहि दो कोसावर आहेत. याचा मजकूर आहे कीं, करणाटकचे वर्तमान तर नवाम हेदर नाईक कृष्णावर आला आहे. त्यास्तव मोगलास बलाविले आहे की, तुम्ही व आमची फौज घेऊन त्यास तंबी पोहचाऊन त्याजपासून खंडणी घेऊन ज्याप्रमाणे करार आम्हासी गतवर्षे केला आहे तो देवणे. याप्रमाणे बोली आहे. दुसरें, राजश्री राणोजी भोसले बळापुराकडे गेले आहेत. इकडील तो हे वर्तमान आहे. फार काय लिहिणे ? हे विज्ञापना.

¶*Ganesh Malhar writes that the Peshwa and the Nizam intend to undertake a joint expedition to check Haidar's aggressive policy.*

*No. 169]* *[15-4-1769*

पौ छ ७ जिल्हेज तिसा चैत्र
बा। रुस्तमखान सांडणीस्वार

श्री.

विज्ञापना. स्वामीनी छ १७ जिल्कादचें पत्र पाठविलें तें पावले. श्रीमंत लांब गेले याजकरितां नाना प्रकारचीं वर्तमानें उठो लागलीं. त्यास श्रीमंताची कार्यसिधी होऊन सुखरूप पुण्यास यावें म्हणजे निरोप घेऊन टोक्यास जावें. स्वतः कांहीं अभिषेक करावा असा कांहीं निश्चय केला आहे म्हणून लिहिलें. व यास दोन तीन महिने लागतील हे वर्तमान भिकाजी नाइकांस सांगोन ठेवणें, पुढें उपयोगी पडेल, नाहीतर येथे आल्यावर हटकिल्यास तर्क निघों लागतील म्हणोन लि॥ तें कललें. भिकाजी नाइकास सांगून ठेविले. वरकड श्रीमंताची स्वारी भोसले यांची भेट जालियावर लौकरच येईल. स्वामीची भेट होईल तदोतर जसी आज्ञा तसें करावयास येईल. त्याचा आगा येव्हापासून कशास बांधिला पाहिजे? इकडील वर्तमान तर मर्जी बरी आहे. पुण्यास आल्यावर सर्व समजेल. नवाल्यांचा हिंगण्याचा मजकूर लिहिला तो कलला. वाकडा अर्थ किमपि नसतां इतके कशावरून लिहिलें म्हणोन पत्री आज्ञा केली. त्यास कोणाचे लिहिल्यावरून लिहिले होते असें नाहीं. त्यास फार दिवस लागले, पुण्यांतच होते व सर्व प्रकारे स्वामी त्यांचे वाली, हे जाणोन विनंती लिहिली होती. दुसरा कांही अर्थ नाहीं. हे विज्ञापना.

¶*Haripant Phadke informs Nana of the health of the Peshwa who, he says, was soon returning to Poona after finishing the affair of the Bhonsles.*

---

*No. 170]* *[5-5-1769*

पौ छ १९ मोहरम सवैन वैशाख हा। लालखान
सांडणीस्वार.

श्री

सेवेसी विज्ञापना. ता। छ २७ जिल्हेजपावेतों मुकाम नजीक देवरायदुर्ग कुशल असो विशेष. स्वामीनी छ ४ जिल्हेजचें पत्र पाठविले, वांछित कार्लीं पावोन आनंद जाहाला. इकडील वर्तमान मुलबागलचा किला घेऊन पाडून टाकिला. तेथून दरमजल निघाले ते मुकाम मजकुरास आले. या किल्यासमीप पांच सात किले होते ते घेतले. त्यापैकीं देवरायदुर्ग मात्र ठेऊन सेव्याजी आंईतोले नारो शंकर यांजवळ होते त्यास आणून स्थापना केली. गोपाळराव याच

मुक्कामास आले. छावणीस राहण्याचा मनसबा गोपालरायाचीं सांगितला कीं ध्यंदाची मसलत नासली आहे. हैदरासी गांठ. विना भारी फौज राहिल्या-वितरिक्त त्याजवर दबाव पडोन जागाच काईम राहे इतकें मात्र व्हावे. त्यास खासा स्वारीच राहवी; नाही त्यापेक्षां येखादा मातबर मुत्सदी हुजरातची फौज ठेवावी, आम्ही त्यास राजी आहो. त्याजवरून त्रिंबकरावमामाच्या शेंडीस फुलें बांधत होते. त्याणी शरीरप्रकृतीची हलाखी सांगितली. त्याजवरून किंचित विस्मये-करून आपण राहण्याचा मनसबा केला. श्रीमंत राजश्री नारायेणराव व बाई यास अक्षत्रितीयेस पुण्यास रवाना करावी. समागमे पथकेंहि नेमली याप्रमाणें येक मनसबा ठरला. दुसरे दिवसीं पुन्हां मामाकडेच राहण्याचें अनुसंधान गोविंद सिवराम याजकडूनच लाविलें. येक तुम्ही रहावें, नाहीं त्यापेक्षीं आम्हीं रहावें म्हणोन सांगितलें. त्याजवरून त्याणी विनंती केली कीं, ज्यापक्षीं स्वामीच राहतात त्यापक्षीं आपण देशास जावें, मी राहतों. परंतु मी सांगेन तीं पथकें व बालकोबा अगर मलबा यांतून एक द्यावा. पोरक्ती वेगमी करून द्यावी म्हणजे राहावयास आगाध काये आहे? त्याजवरून आज्ञा जाली कीं आम्ही ज्याप्रमाणें सांगो त्याप्रमाणे कबूल करावे नाहीं तर साफच सांगावें. त्यास यानी विनंती केली कीं हैदराच्या पारपत्यास मजला ठेवितां, तेव्हां सामान चांगलेच असल्यास स्वरूप राहील. केवल काढले रेघेनेच करीन म्हटल्यास ठीक पडणार नाहीं. राहाणाराने कशास राहावें; त्याजरून थोडेसे सर्द होऊन मामाचे राहाणें मह्कूफ केलें. आतां आपा बलवंतराव कारभारी बालकोबा याची कमाण चढली आहे. त्यास आपाचा तों गुंताच नाहीं. कारभारी जरत्कारू. छावणीस राहाणें म्हणोन सांगितलें. नाहीं, तों अगोधरच कांगावे करूं लागले आहेत, मग सांगितल्यावर काय म्हणतील ते पाहावें. परंतु त्याचें शरीर फार तुटलें आहे. सामर्थ्य नाहीं हे गोष्ट खरीच आहे. पुढे कसें करितील ते पाहावें. बज्यावाहि दुखणेकरीच आहेत. त्यास राहा म्हणतीलसे सेवटीं दिसतें. कोणी राहावयास धजत नाहीं. आज येक मास जाहाला, लोकांस रोजमरा नाहीं. महर्गता मोठी जाली आहे. स्वामीनी लाख रुपयांची हुंडी पाठविली त्यापैकीं कांहीं यैवज मुदती आगोधरच घेतला. बाकी यैवज राहिला तो मुदतीस भरणा करितील. लाख रुपये कर्ज सावकाराकडे करार केले त्याचा भरणा होता मुसकल. यैवजच लस्करात नाहीं. छावणीस फौज आठ हजार नेमली आहे. त्याचा पांचमाही आकार दाहा लक्ष रुपये जाहाला. या खेरीज नालबंदीस यैवज पाहिजे. तरतुदेविसीं पेशजीं स्वामीस लिहिलें आहे त्याजवरच भिस्त आहे. छावणीस सरदार कोण राहतो ये गोष्टीचा सिधात नाहीं. गोपालराव वडीलपण कबूल करीत नाही

धाकटेपणच कबूल करितात. आम्हांकडील बाजीपंत नेमणुकेत येतीलसें दिसतें. सरदार कोण होईल तो पाहावा. कामावर न राहण्याची तोहमत गुदरली, तपी वसावयाच्या लागांत आहेत. पर्ज्यन्य तो सुरू जाला. नद्यास पाणी यावयाचे दिवस समीप आले, यास्तव यक्षत्रितिये आलिकडेच सिधांत होणें तो होईल. या छावणीमुळे बहुत लोक न राहात, यास्तव पेंचाखालीं येतीलसें दिसतें. रावोबाबाजीस हुसकोट्याचा सुभा सांगितला. रामचंद्र त्रिंबक तगीर जाहाले. रामचंद्र त्रिंबक याजकडे तफावत लागली यामुळें दूर जाले. गणेश गंगाधर पागा याजकडील दिवाणगिरी विसाजी आपाजी बाबूजी नाईक याजकडील यास होती व फडणिसी रामराव अबाजी यास होती. त्यास उभयेतां भांडों लागले यास्तव दोघेहि दूर केले. दिवाणगिरी जैरामपंत बापट गोविंद सिवराम याजकडील यास व फडणिसी रावोपंत खरे मेहुणपुन्यांतील यास सांगितली. मजमू बाळाजी हरि साठे याची होती ती जैरामपंतीं करून घेतली तेव्हां दिवाणगिरी कबूल केली. धारवाडाकडे हैदर नाइकाकडील कांहीं आवडाव होतो यास्तव तिकडे नरसिंगराव धायगुडे व शहाजी भोसले व राजमंडळचे लोक नेहमी छावणीस पो निघोन गेले. या बरोबर खंडोपंत मामाहि पुण्यास जावयासी गेले. बहुत कार्य लिहिणे कृपा केली पाहिजे हे विज्ञापना.

¶*The letter reports the unwillingness of several commanders to accept the command of the Karnatak force after the Peshwa's departure. They feared they would not be supported by an adequate force to cope with Haidar.*

---

*No. 171]* *[7-5-1769*

पो छ १ मोहरम तिसा
स्वार दिा * * चौकी संध्याकाल.

### श्री

सेवेसी हरि बल्लाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता छ २९ जिल्हेज मुा निंबेदेव्हारे वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामीनी छ २७ जिल्हेजचे पत्र रा रावोपंत आइतोळे यांचे राउताबा पा ते पावले. पुण्यापर्यंत डांक बसविली आहे, दिनचर्येचे वर्तमान लिहून पाठवीत जाणे म्हणून आज्ञा. आज्ञेप्रो दररोज वर्तमान लिहीत जाऊं. उदैक पारनेरचा मुकाम, मंगळवारी गणेगाव, बुधवारी थेऊर, गुरुवारी पुणे, याप्रो येत आहेत. कळावे. बरकड आपण सांडणीस्वाराबा छ २६ जिल्हेजचे पत्र पा तेंहि पावले. आता इकडील वर्तमान

अधिकोत्तर लिहिजेसे नाहीं. राजश्री गोविंदराव तात्या यास आपण पत्र मागे पा होते ते प्रविष्ट केले. त्याचे उत्तर त्याणी पाठवितो म्हणौन सांगितले, इतका जावस्वाल लिहिणे राहिला होता. भोसल्यापासून करार करून घेतला व त्यास सरकारातून करार करून यादी दिल्या त्या पुण्यास आल्यावर दाखवनि. गंगा-पुराहून श्रीमंत मातुश्री बाईसाहेब येतात, उंटे कामाठी पाठवावे, म्हणून लिा होते. त्यास येथे उंट नाहीत, कामाठी मात्र पाठऊ, म्हणौन लिा. त्यास, येथेहि उंटाविसी लिा होते, त्याजवरून चाळीस उंट त्याजकडे रवाना केले. कळले पाहिजे. तीर्थस्वरूप राजश्री आबाजीपंतास बरे वाटत नाही, पष्टीस श्रीमंत येत नसिले, तर तुम्ही पुढे येणे म्हणौन आज्ञा. त्यास पष्टीस श्रीमंत येतात, मीहि येतो. विदित जाले पाहिजे. प्रवरासंगमकरानी धोंडभट खरे यांचा पुत्र सिमग्यात मारिला तो कलह लागला आहे. त्यास श्रीमंत तेथे आले. वो रा गोविंद दीक्षित याणी श्रीमंतास सर्व वर्तमान सांगितले, त्याजवरून गावास बहिस्कार केला. गोविंद दीक्षित व धोंडो माहादेव दौलतावादकर यास वर्तमान मनास आणावयास सागितले आहे. गावांत कोणी जेवावयास जाऊ नये, डोकी न्हाव्याने करू नये, इतका निकर्ष केला आहे. हे ल्याहावयाचे कारण हेच की, *राजश्री कृष्णाजी नाईक यथे याणी काल मजला आपला निरोप सांगितला, त्याम* आज्ञेपूर्वीच तेथील बंदोबस्त जाहाला. टोक्यास श्रीमंत आले ते दिवशी आपले वाड्यांत स्वयंपाक करून भोजन केले, च्यार घटका बसले होते, मग डेन्यास गेले, हे काल लिहिलेच आहे. नाईक येथे काल खरवंडीस आले. श्रीमंत राजश्री दादाची भेट जाली. आगतस्वागत भाषण होऊन आज निरोप घेऊन टोक्यास गेले. मुंजीकरिता निघोन आलो म्हणोन सांगितले. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. खजिना गोविंद अनंताबा पाठविला तो पावला. सरकारचा जाव मागाहून येईल हे विज्ञापना.

¶*Haripant Phadke informs Nana Fadnis of the probable date of the arrival of the Peshwa at Poona.*

---

*No. 172]* *[19-7-1769*

श्री

राजश्री नाना फडणीस गोसावी यासी

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित महिमाजी सिंदे कृतानेक दंडवत विज्ञापना. तागाईत छ माहे रबिलौवलपावेतों वर्तमान यथास्थित असे

विशेष. आम्हाकडील वर्तमान तरी, पेशजी चिरंजीव उदाजी शिंदे व मुबराव-कृष्ण कारकून यांजवरावर विनंतीपत्र पाठविले त्यावरून विदित जाले असेल. मीर रजा व हैदरअली येक होऊन आम्हांवरी कमरबंदी केली; याकरितां विना धण्याच्या पायापाशीं न जाता शत्रुचे पारिपत्य होऊन सरकारसनदा पूर्वी सादर जाल्या होत्या. तेणेप्रमाणें गुरुमकोंडा तालुका किलासुधा सरकारदाखल होणें नाहीं म्हणून, देशे लोकसुद्धा पुणियास येत होतो, तो मौजें अनगुंड ता। चित्रदुर्ग येथील मुकामी सरकारचें पत्र छ ८ सफरचे आले तेथें आज्ञा जे, तुम्ही कोठे आहां? काय तरतूद करितां? तुमची व मीररजा अलीखान याची लढाई जाली म्हणून परस्पर लिहिली येतात. तुम्ही कोण जागां होता? काय मजकूर करीत होता? मिराजवळ फौज किती होती? कोण जागाहून धाऊन छपा घातला? लडाई कैशी जाली.? लोक जाया किती जाले? हल्ली ते कोठें आहेत.? काय उपद्राप करिता, करणार? साधनसंपत्य तरतूद कशी आहे, तें सविस्तर वर्तमान हुजूर लेहून पाठवणें म्हणून आज्ञा, तरी येविशीच विनंतीपत्र पाठविलंच आहे. मीररजावरावर हैदर अलीखान याणी आपणाकडून श्रीनिवासराव वारकी व मनेखान व खास पागा मिलोन सा हजार फौज व च्यार हजार बार देऊन कळसपाकाहून कूच करून मटलेवारपाल्याच्या मुलुकांतून वाट वातमी बंद करून वातमीचीं माणसें कैद करून छ २० जिल्हेजीं मौज वडपलीनजीक राचोटी दोन कोसावर तेथें प्रथंकाळीच्या साह घटिका दिवसास येऊन आमच्या गोटास वेढा देऊन उभे राहिले. आम्हांकडील गोलागोली दोन प्रहरपर्यंत जाली. आम्हां-पाशीं सामानपैकी तळाव्यास व जतीस तालुकियात व चालवेडाकडे मिलोन तीनशे स्वार व बार अगोधरच गेले होते. छ मजकुरीं कूच जाले होतें; सवब काहीं स्वार राचोटीस बिनीवरावर गेले. बाकी धरेचें तोडी शंभरदीडशें स्वार व बार सातशे राहिलो. तिसरे प्रहरीं येक प्रहर पावेतो तीन हिरन्यिा जाहाल्या. त्याजकडील नामी नामी सरदार दाहाबीस ठार जाले, शे दीडशें जखमी जाले. आम्हाकडील लोकानीं कामकाज फारच चागलें केले, फार शर्य केली, तेणेंप्रमाण यादी लेहून पाठविल्या आहेत. आमचे सामान थोडें, ते भारी फौज; मग निघोन कडप्यास गेलो. तेथें साहित्यच नबाबाच्या हातून न होय, याकरितां गुतीस आलों. तेथेंहि सोय न पडे, मग तेथून चिरंजिवाची रवानगी हुजूर केली. तेथून कूच करून हडे अनतपूरकर सवस्थानिक यांणीं आम्हांस पत्र लिहिलें जे, जागा सरकारची, तुम्ही येथें येणे. कुमकी फौज देऊन खर्चाची वेगमी करितों म्हणून. त्यावरून सवस्थान मजकुरास जाऊन आठ दिवस राहिलों. आम्ही कडप्यास आलेवरी तेच फौजेनशीं मीररजा अलीखान ठाणें तळपुलास वेढा

दिल्हा. ठाण्यास रो रखमाजी राजे भोंसले कोल्हापूरकर ठाण्यावरी लढाईच्या जखमी होते सबब ठेविले होते. त्याजपाशीं आणिखी वीस आसामी नामीनामी होती, त्यांनीं महिनापावेतों ठाणें लढविलें. चौथे पांचवे दिवशीं नित्यबाहेर निघोन मोर्चेवर पडोन मोर्चे हमेशा उधळून जाऊं लागले, तेव्हां मिराने हैदर-अलीस लेहून, त्याचे मुकाम पुगनुरावरी होता तेथून कूच करून तळपुलापासून साहा कोसावरी मुकाम केला. त्यास पेशजी तोफा होत्या त्यांजवरी तळपुलावरी आणखी साहा तोफा भारी, पकें वेलालीस शेर गोळा वजन ऐशा, पाठऊन येके बाजूची सफेली व दोन बुरूज बरोबर केले तरी राजश्री कौल न घेत. निदान पतकरल. तेव्हां श्रीनिवासराव बारकी हैदरअलीकडील यांणीं राजश्री रखमाजी राजे यांस इमान वेलतुळशी दिल्या जें, तुमचीं घोडीं व मालमालिस्त हत्यारसुधा मंडळी लोकसुधा सरहाद पार करून देतों म्हणून बाहीर काढून हैदर अलीच्या भेटीस नेले. त्याणी यास जाबसाल केला जे, पेशव्यांकडे तुम्ही राहून आम्हावरी गोळी चालवितां. आमच्या जागियास तुम्ही कोण? म्हणून खाशीं चांगलीं घोडीं नऊ वगैरे चीचवस्त वेऊन पावलोक जमातदार दाहावीस रुबरूं नेऊन गर्दी दिल्हा, कितेकांचे शिरछेद केले. बाकी राजश्री रखमाजी राजे व नरसिंगराव सूरवंशी, आष्टकर व गणोजी जाधव व मानाजी थोरात, कारवेकर ऐसे नजरबंदींत ठेविले, त्यांस सोडीत नाहीं. तळपुलांत ठाणें घालून मीर व आपण हैदरअल्ली ऐसें कडप्याचे रोखें येऊन मुकाम करून राहिले हे वर्तमान हडे अनंतपुर संवस्थानिक यांणीं ऐकिलेवरी बोलिले जे, तुम्हांस कुमक दिल्यान हैदरअलीशीं दावा पडतो, नजीक मुकाम आहे. मग तेथून कूच करून येक निश्चयें धन्याकडे जावें म्हणून बाळापुरास येऊन तेथील बंदोबस्ती करून निघालों तें हरिहरास आलों, तों छ १४ सफरचें सरकारचें पत्र आलें. तेथें आज्ञा जें हैदरअलीखान घांट चढून वरते आलियावरी दुर्बुधीस प्रवर्तक होणार ऐशी वर्तमानें येतात. तरी तुम्ही जागां बंदोवस्त करून दारूगोळा सरंजाम पोख्त करून खबरदार राहाणें. हैदरखानाची बातमी विश्वासु माणसांपासून तहकीक आणून हुजूर लिहीत जाणें. किल्ल्यांत लोक पहिले हैदराकडील असतील त्यांचा इतबार न धरणें. त्यांस जाहीर काम सांगोन आपले जागां खबरदारी करून बंदोवस्तीनें राहणें म्हणून आज्ञा, त्यावरून माघारें गेलों. हैदरअलीखान याजकडील अंतरंगीची बातमी आम्हांकडे हमेशा येतात. तेथें वर्तमान जें, परिछिलवादे हुसकोट, बाळापूर, मदगिरी, चेनरायेदुर्ग, व शिरे हे तालुके सलुखेन दिल्यानें उत्तम, नाहीं तरी तें आपलीं ठाणीं आपण घ्यावीं व सेनापतिकडीलहि मुलूक तमाम घ्यावा व तुगभद्रा पार व्हावें म्हणून आपले ठायीं भापणें करितात, हे एथ वर्तमान येतात. राजश्री

गोपाळरावजी यांणीं हैदरअल्लीस पत्रे लिहिलीं होतीं जे, वाळापूर तालुका सरंजामास आपणांकडे आहे वगैरे सरकारी तालुके आहेत, यास तुम्हाकडून उपद्रव होऊं न द्यावा. श्रीमंतांच्या चित्तांत खिलाफ न ये ते करावें म्हणून उत्तम रीतीचीं लिहिलीं, तीं पत्रे वाळापूरकर माणसावरावर त्याजकडे पाठविलीं. त्यांचें उत्तर रावजीस हैदरअल्लीनें लिहिलें जे, च्यार महिनेनी शिर, हुसकोट बालापूर तालुके आमचे आम्हास द्यावे, ऐसा करार असता दोन वर्षे जालीं, तुम्हासारखें उमदे माणूस दरम्यान असता, कार्यभाग होऊन येत नाहीं, याजवरून काय म्हणावें ? हल्ली श्रीमतांस विनंती करून आमचे जागे आम्हास प्राप्त होय ते करावें म्हणून. व वाळापूर सरंजाम तुम्हाकडे आहे, तेथील किल्लेदार महिमाजी शिंदे याणी आपणाकडील पळाले लोकास वगैरें लोक चाकरीस ठेऊन आपल्या तालुक्यात दंगा करितात, ठाणीं मुलूक घेतात, सबब त्यांशीं विरुद्ध करणे अवश्यक जालें, कळावें, म्हणून रावजीस कागद लिहिला तो बजिनस आम्ही वाचून पाहून छ १० रविलौवलीं मिरजेस रवाना केलें आणि रावजीसहि पत्र लिहिलें आहे. सारवंश हैदरअल्लीची बदफैलीची नजर पुरती यात संशय किमपि नाहीं. आमच्या लस्करची, सरकारची व लोकाची वगैरे येकंदर आजमास पाहतो. दोन तीन लक्षाचें वित्त व बाजारबुणगे व कोमटी सावकार आले होते, त्याचे लक्षारुपयाचें वित्त व येकंदर स्वाराचीं वगैरें घोडीं पाहतां लढाईत पडलीं ते व पाडाव गेलीं तें व तलाव्यास व विनीस राचोटीकडे गेले होते ते परतोन लढाईची आवई ऐकोन आम्हाकडे येत होते त्यासी लढाई सचंतर होऊन घोडीं पाडाव गेलीं ते वगैरें मिलोन दोन आडीचशें घोड चागली व लहानथोर मिलोन गेलीं. ज्या जागियास गेलीं तें जागियास पाहिलीं पाहिजे, याकरिता याचा अभिमान साहेबास आहे. आम्ही सरकारी शिलिकी बारगीर. निपाण धण्याचें आणि आज्ञा धण्याची. आम्हांकडे काय आहे ? जैशी आज्ञा होईल तेणेप्रमाणें वर्तणूक करूं. महमद अल्लीखान अरकाटकर याजकडे नेहमी वकील पेशजीपासून ठेविला होता, येविशीं पेशजी विनंती लिहिली होती. त्याजकडील पत्रे हमेशा येत होतीं जे, हैदरअल्लीचा सेहे उरकलियावरी खामखा कुमक व तोफा व दारूगोळा देतों, सर्वप्रकारें श्रीमंताचे पदरींचे आहों, म्हणून येत असता हल्ली हा प्रकार घडलियावरी नेहमी कारकून ठेविला होता तो हडे अनतपूरच्या मुकामीं आला. त्याजवरावर पत्रहि आलीं व रुबरू कारकुनापाशींहि भाषेण केलें जें, गोरदरानीं व फिरंगियांनीं च्यार महिनेचा सलुख केला, माझा काहीं सलुख परिछिन्न नाहीं, मी सरकारच्या पदरींचा आहे. खासा स्वारी कर्नाटकात आलियावरी सरकारचें पत्र घेऊन तुम्ही आपला कारकून मजकडे

पाठवावा म्हणजे सरंजाम, तोफा, दारूगोळा व फिरंगी घेऊन घाटमाथां येऊन तमाम ठाणीं हैदराकडील घेऊन सरकारदाखल करून देतों. सरकारी आज्ञा घेऊन कांहीं कुमकी फौज घेऊन तुम्ही पुढें यावें म्हणजे तें कार्य मजकडे लागलें. येसें निशाणपुरस्कर आमच्या कारकुनापासी बोलोन आम्हांस पत्रहि लेहून पाठविलें. हैदरअल्लीच्या लस्करांत देशची फौज च्यार हजार व सावनूरपासून कडपे कर्नोळ तमाम संस्थानिक यांची कुमक व रोजगारी लोक आहेत, त्यास ज्या जाग्याचे त्या जाग्यास तार्कीद जाल्यानें रिकाम पडत. त्याचें पारिपत्य व्हावयास धण्याचें नांव पदरीं फौज समागमें असतां आम्हांस आसकेता नाहीं. मग खासा स्वारी आलियावरी इभ्रतीनें सेवक लोक करताले. धण्याचे पदरीं लोक आहेत म्हणून त्यास गळ प्राप्त जाला. त्याचे लोक तों पदरीं राहून शिफारस करीत आहेत. कितेक अर्थनिवेदन करावयाकरितां राजश्री हरि माणकेश्वर व माले रघुनाथ कारकून पाठविले आहेत. हे सेवेसी विनंती करितील ते ध्यानांत आणोन सेवकाची उभारणी होऊन शत्रूचें पारिपत्य होये तो अर्थ करणार आपण आहेत. आम्ही तों शिलकी बारगीर. सर्व लौकिक व अभिमान आपला आहे. रवाना छ १९ रबिलौवल. बहुत काय लिहिणें, लोभ कीजे, हे विनंती.

¶*Mahimaji reports that he was heavily out-numbered by Haidar's forces and withdrew. He asks for reinforcements to recapture the lost places.*

---

*No. 173]* *[9-10-1769*

## श्रीशंकर

राजश्री हरिपंत फडके

स्वामीचे शेवेसी

विनंती उपरी. लस्करसहवर्तमान आम्ही मौजे वलतीचे मुा आल्याचें वृत कलोन आपण चिठी पाठविली ते पावली. श्रीमंताचे शरीरीं सावकाश नाहीं येसें समजोनच संनिध उदैक येऊन कोसाचे तफावर्तानें राहणार. परवाचे दिवसीं बुधवारी सूर्योदयीं श्रीमंताचे पायावर डोई ठेऊन दर्शन घ्यावें हाच हेत. बरोबर दहापांच येतील. उपचार परकीं असतील त्यास उपरोधास्तव करणें उचित. आम्ही पदरचे सेवक; आम्हाविषयीं त्या गोष्टीचा विचार चितात आणावयासा नाहीं. दिवस मिळून बुधवारचा. येथें दर्शन घेऊन *लागलेच* आज्ञा जाल्यास पुणियास जाऊन दोन प्रहरी समय चांगला आहे तेव्हां त्या श्रीमंताचे पायावर डोई ठेवून घरासहि जावयाचा विध आहे तोहि उरकून मागती सेवेसी येऊ.

6437

सर्व कळलें असावें, त्याप्रमाणें आज्ञा होऊन घडावें, याकरितां लिहिलें असे. राजश्री त्रिंबकपंत वर्तक घरास गेले आहेत. तुम्हीच समीप असतां वरकडांनीं येऊन विनंती विशेष करणे ते कोणती? या चिठीचे उत्तर समजेसे पाठवावें. उदैक लोणीसंनिध मुकाम करून राहूं. कळावें. रवाना छ ८ जमादिलाखर दोन प्रहर रात्र. हे विनंती.

¶*The writer informs Haripant that he would soon be going to Poona to wait upon the Peshwa who is ill.*

---

*No. 174*] [*16-10-1769?*

श्री

राजश्रिया विराजित रामाजन्य राजश्री
बाबूरावजी स्वामींजींचे सेवेसीं

पो बाळाजीराव कृतानेक सा समस्कार विनंती. येथील कुशल ता छ १९ जोवलपावेतो मुा पुणे यथास्थित जाणोन स्वकीये कुशल लिहीत असिले पाहिजे. आपण पत्री संभाल केला तेणेप्रा संतोष जाहाला. याच प्रकारे सांभाळीत असिलें पाहिजे. इकडील वर्तमान तर श्रीमंत खासा स्वारी डेरेदाखल जाह्ले. कर्नाटकात फौजा छावणीस आहेत. लवकरच हैदर नाईक याजकडील गुंता फैसल्यात यावासा आहे. रा सेनासाहेब सुभा लवकरच येत आहेत. वरकड घरचे पत्रावरून कळों येईल. बहुत काय लिहिणे, लोभ असो दीजे, हे विनंती. रा गणेशपंत दाजी व विनायेकपंत दाजी सा नमस्कार, लोभ करणे हे विनंती.

¶*Balaji Ram informs Baburaoji that the Peshwa intends starting on a fresh expedition into Karnatak and has pitched his camp outside Poona; the writer also states that the Bhonsle of Nagpur is to accompany the Peshwa on this expedition.*

---

*No. 175*] [*29-10-1769*

पो छ १ रजब सन सबा
सिंतैन ह्या घासीखान
सांडणीस्वार

श्री

सेवेसी विज्ञापना. ताा छ २८ जमादिलाखर मुा श्रीशंभो माहादेव वर्तमान यथास्थित असे विशेष. त्रयोदसीस श्रीमंत येथे आले. याउपरी कोणता रोख

धरितील पाहावे. फलटणास मालोजी नाइकानी कजिया केला यास्तव लस्करांत आणिले. पाऊण लक्ष रुपये नजर करार केली. येक महिनियात पुण्यात भरणा करावा याप्रो कबूल करून गेले. पुण्यास मुदतीस भरणा करावयास त्याज-कडील कारभारी नरसिंगराव कोनेर व नारो भगवंत येतील. लस्करात विठल येशवंत कारकून त्याजवा दिल्हा आहे, त्याणे उभयतास घेऊन आपणाकडे पुण्यास यावे, आणि पावणा लक्षाची निशा करून घ्यावी, याजकरिता पा आहे. स्वामीकडे येतील. वरकड नवलविशेष लिहिजेसे नाही. राजश्री बापू आदि-करून मंडळी अद्यापि कोणी आले नाहींत. कळावे. लक्ष्मणपंत खरे यांणी शंभर गाडे लाकडाचे दस्तक पा म्हणौन सांगितले होते, त्यावरून घेऊन पा असे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Haripant Phadke writes to Nana Fadnis reporting the arrival of the Peshwa at Mahadeo and the punishment inflicted on Maloji Naik Nimbalkar of Phaltan.*

---

*No. 176*] [*5-11-1769*

श्री

विज्ञापना. ता छ ५ रजब मुा लोणंद वर्तमान यथास्थित असे विशेष. श्रीमंतांनी वानवडीहून कूच केल्यापासून येथे कीर्द घातली आहे. फिरोन श्रीमंत पुण्यास गेले. श्रीमंत रा नारायणराव यांची स्वारी निराली जाली. त्यास वानवडीहून कूच जाल्यापासून श्रीमंतांची गाठ पडे तोपर्यंत इकडील बोटखत करावे लागेल असेच दिसते. आपण सिधांत करून लिहितील त्याप्रमाणे करू. लेहून पाठवावे. येथून महादेव वीस कोस आहे. हलुहलू चहु मजलींनी जाऊ. कळले पाहिजे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना. श्रीमंत राजश्री रावसाहेबानी वाईस जातेसमई आज्ञा केली की, फौजेस दुसरियाने कागद लिहावे, त्याजवरून नावनिसी लेहून काढिली. येथे चिटणीस कोणी नाहीत, याजकरितां याद पा. असे. आपण पाहून चिटनिसाजवळ देऊन पत्रे लेहून वस्त्या लाऊन रवानगी करावयास आज्ञा करावी हे विज्ञापना.

¶*Haripant Phadke writes to Nana Fadnis reporting the movements of the Peshwa and his brother Narayanrao and asks that orders be issued calling men to join.*

6439

No. 177] [19-11-1769

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
बाजीपंत आणा स्वामींचे सेवेसी

पो लक्ष्मण नारायण देशमुख सां नमस्कार विनंती. येथील कुशल ता छ १९ रजब मु मौजे गारवाड पा आकळूज येथास्थित असे विशेष. आपण गेल्यापासून पत्र न आले तरी असे नसावे. सदैव पत्री संतोपवीत जावे. इकडील वर्तमान तरी श्रीमंत उभयेता नीरा उतरोन रा नरसिंगराव धायेगुडे याचे घरी मेजवानी घेऊन फौज श्रीमंत राजश्री नारायेणरावसाहेब याजवा ठेऊन आपण खासा वाईस जाऊन पुण्यास कार्तिक शु शर्थीस दाखल जाले. नारायेणरावसाहेब यास फाजे घेऊन माहादेवानजीक राहावे म्हणोन आज्ञा. त्याजवरून येथपावेतो आले. येथे तूर्त थोरले श्रीमंतांची आज्ञा येईतोपावेतो मुकाम होणार. थोरले श्रीमंत कार्तिक वा पंचमीस डेरेदाखल जाले. दरमजल येणार. येथे बाळकोबा व आम्ही आहो. राजश्री तात्यास बरे वाटत नाही म्हणोन वर्तमान आहे. त्यास, सविस्तर कळावे म्हणौन श्रीमंती सांडणीस्वार पाठविला आहे. सविस्तर ल्याहावे. बहुत काये लिहिणे, कृपा कीजे, हे विनंती. समस्त मंडळीस सा नमस्कार सांगावे हे विनंती.

¶*Lakshman Narayan Deshmukh writes to Bajipant Anna reporting the movements of the Peshwa and his brother. The writer inquires about the health of Haripant (Phadke?).*

---

No. 178] [20-11-1769?

श्रीगणराज

श्रीमंत राजश्री दादासाहेब
स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक गोपाल गोविंद कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता छ २० रजब मों पटण स्वामीचें कृपेकरून श्रीमंतासनिध सुखरूप असो. विशेष. आलीकडे बहुत दिवस कृपापुरस्कार पत्र येऊन सेवकांचा सांभाळ होत नाहीं, तेणेकरून सेवकाचें चित बहुत उद्विग्न आहे. सदैव पत्रद्वारें सेवकाचा सांभाळ करावा. यानंतर इकडील वृत पटणचे खंडणीचे वगैर सायं(त) वर्तमान श्रीमंतांनी लिहिले आहे त्यावरून विदित होईल. सदोदित सेवकावर कृपा वर्धमान असावी.

6440

तेणेकरून सेवकांचे चित समाधान होऊन स्वामिकार्य करावयाची उमेद वाढते. स्वामी सर्वजाण आहेत. सेवेसी विदित होये हे विज्ञापना.

*¶Gopalrao Patwardhan writes to Dadasaheb informing him about the progress of the Karnatak expedition. Negotiations are going on over the tribute to be realised from Pattan says the writer.*

---

*No. 179*] [*11-12-1769*

पौ छ १७ साबान
सबैन.

**श्री**

सेवेसी हरि बल्लाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता छ १२ साबान मुकाम पंढरपूर वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामींनी छ साबानचें पत्र पाठविलें ते पावलें. कृष्णास्नान करून पुण्यास आलो म्हणोन लिहिलें ते कळलें. इकडील वर्तमान तर पंढरपुरास पांच मुकाम जाहले. आज कूच जाहलें. करजगीचे सुमारें जात आहेत. श्रीमंत राजश्री नारायणरावसाहेब येथून सोळा कोसांवर आहेत. येक दोन रोजांत त्यांची भेट होईल. श्रीमंत राजश्री बाबाची प्रकृत आतां बरी आहे. अशक्तता फार आहे. श्रीमंत दादा वद्य प्रतिपदेस निघोन येणार म्हणोन लिहिलें तें कळलें. इकडील वर्तमान नवल विशेष लिहिजेसें नाहीं. मुरारपुराकडे जाणार होते तो मजकूर राहिला. आतां कृष्णातीरचा रोख धरून जात आहेत. हैदरनाईक आपली बंदोबस्ती करीत आहे. कृष्णा तुंगभद्रा तिरास गेल्यावर कांहीं रसायण जालें तर होईल जे होईल ते लिहूं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶Hari Ballal, from Pandharpur, informs Nana Fadnis of the route that would be followed by the Peshwa's army marching towards the Karnatak where Haidar was preparing for a stiff fight.*

---

*No. 180*] [*18-12-1769*

पौ छ २ रमजान सन सबैन
पौष मास.

**श्री**

राजमान्य राजश्री आबाजी गदाधर
गोसावी यासी

स्नो माधवराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद. सुहुर सन सबैन मया व अलफ. बदरुदीन दारूवाला याजपासून कसबे वैजापूर व ममदापूर येथे दारू पाऊणसे खंडी

खरिदी करावयाचा करार साल गुा करून तुम्हास दारूचे कारखान्यांवर पाठविले आहे. त्यास बावन खंडी दारू तयार होऊन तुमचे पदरी माप पडेल म्हणोन तुम्ही लिा ते कळले. बाकी तेवीस खंडी दारू राहिली ते हली दर ८८३॥। पावणेच्यार शेर प्रा घ्यावयाचा करार करून तूर्त ऐवज पाठविला येणेप्रो—सो.

५९३ रोख बदरुदीन दारूवाला याजवळ दिल्हे.

१९०० हुंडी, गंगाधर गोविंद याची, येथे घेऊन गोविंद भिकाजी यांजवर वैजापुरची हुंडी आलाहिदा पा असे, हे त्यास देऊन ऐवज घेणे.

---

२४९३

यो चौविसे त्रेपन रुो तूर्त पा असे, तरी घेऊन जरूर पावल्याचे उत्तर पाठविणे आणि तेवीस खंडी दारू दुवारी सोन्याची चांगली करावयाचा करार केला असे. तरी दारू चांगली दुवारी करऊन माप घेऊन लिहून पाठवणे. दारू वाईट होत्ये म्हणोन हुजूर विदित जाले, याकरितां चौकशी करून वेत जाणे. जाणिजे छ १९ साबान. आज्ञा प्रमाण. वार.

¶*The Peshwa gives instructions to Abaji Gadadhar about purchasing good gunpowder.*

---

*No. 181*] [*25-12-1769*

पो छ २६ साबान सबैन.

श्री

विज्ञापना. श्रीमंत राजश्री बाबाची प्रकृत बरी आहे. अशक्तपणा फार. श्रीमंत राजश्री दादा प्रतिपदेस निघोन येणार म्हणोन लिा ते कळले. प्रतिपदेस निघालेच असतील. श्रीमंत दरमजल तुंगभद्रेवर जग्त आहेत. दादांची गाठ तुंगभद्रेखेरीज पडत नाही. लस्करात आले म्हणजे लिहून पाठऊ. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The letter reports that Moroba Dada will meet the Peshwa on the bank of the Tungabhadra.*

---

*No. 182*] [*1-1-1770*

पो छ १५ सवाल सबैन.

श्री

सेवेसी माहादाजी बलाल साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ ९ रमजान मुकाम नजीक चित्रदुर्ग येथास्थित असे विशेष. आपली आज्ञा घेऊन निघालो

तें छ ३ रमजानीं सत्रावे रोजीं तुंगभद्रातीरी लस्करांत पोहोंचलों. तेथून मजल दरमजल श्रीरंगपटणास जावयाचे उद्देशें येथपर्यंत आले, पुढें पटणास जात आहेत. हैदर नाईक मसूरचे बारीमध्यें बाल्येन्या बांधून होता, त्यास टाळा देऊन पटणाकडे आले. झाडींत उपाय नाहीं यास्तव त्याजकडे न जातां इकडे आले. त्याचे शहावरी गोपाळराव रास्ते मिळून दाहा हजार फौज ठेविली आहे. याउपरी हैदर नाईक तिकडेच राहील किंवा इकडे येईल पाहावें. सांडणीची डांक ठेविलीच आहे. स्वामीचा निरोप घेतल्यापासून येक मुक्काम जाहला नाहीं. श्रीमंतांची मर्जी पूर्ववत्प्रमाणें बरी आहे. सदाशिवपंत प्रतिनिधीकडील अद्यापि आले नाहीं. आलियावर स्वामींचे आज्ञेप्रमाणें कामें करून घेतों. खाजगीकडील अनंदराव जिवाजी याजकडील नेमणूक होत आहे. त्यांचीहि रवानगी लौकरच होईल. याहून विशेष लिहावयाजोगे नाहीं. होईल तें मागाहून लिहून पाठवीन. विदित व्हावें, कृपा केली पाहिजे, हें विज्ञापना.

¶*Mahadaji Ballal writes: "Haidar having taken up an invulnerable position in the woods near Masur-pass, a small force of ten thousand has been detached under Gopalrao and Raste to watch his movements, while the Peshwa with the main army is heading towards Seringapatam."*

---

*No. 183*] [*2-1-1770*

पो छ १९ रमजान सबैन
हा कासीद जथे रायेमल

श्री

सेवेसी हरि बलाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता छ ४ रमजान मुा नजीक गडगनाथ वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामिकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाही तर सदैव पत्रीं तिकडील वृत्त ल्याहावयास आज्ञा केली पाहिजे. इकडील वर्तमान तर श्रीमंत राजश्री दादा काल छ ३ रोजीं सायंकाळी लस्करांत दाखल जाहाले. हैदर नाईक मासुरास आहे. राजश्री गोपालराऊ, रास्ते दोनी फौजा त्याचे सांडावर ठेऊन वरकड फौज श्रीमंत श्रीरंगपटणचे मुलकांत जाणार. याउपरी घडेल ते लिहून पाठऊ. वरकड नवल विशेष लिहिजेसे नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Hari Ballal reports to Nana Fadnis about Haidar being at Masur and Moroba Dada having joined the Peshwa's army.*

6443

No. 184] [4-1-1770

पौ छ १९ रमजान सबैन

श्री

सेवेसी बाळाजी शंकर कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता। छ ६ रमजान मु॥ नजीक अरणी प्रा सावनूर यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान तरी हैदर नाईक मासुरावर आहे. बा। चौदा हजार फौज व प्यादे दाहा हजार व गाडदी दाहा हजार व तोफा पंचवीसपर्यंत आहेत. राजश्री गोपाळराव व रास्ते सावनूरचे रानात तोंडावर ठेऊन खासा स्वारीचा रोख श्रीरंगपटणचा धरिला आहे, परंतु हैदर नाईक झाडीत आहे. बाहेर निघत नाही. यास्तव त्याचे फौजेस विसा कोशाचे अंतरे श्रीरंगपटणचा डौल देऊन खासा स्वारी राहणार. हैदर नाईक झाडीतोन बाहेर निघाल्यास सावनूरच्या रोखे गोपाळराव वगैरे फौजा आहेत. या रोखे खासा स्वारी असाहि मजकूर आहे. असेहि करितां झाडीतून बाहेर निघाल्यास तिकडून गोपाळराव व इकडून खासा स्वारी मिळोन पारपत्य करावे, झाडीतून बाहेर निघेना तरी श्रीरंगपटणचे मुलकांत जाऊन ठाणीं सोडवावी हाहि प्रकार आहे. वरकड श्रीमंत राजश्री मोरोबा दादा छ ४ रमजानी लस्करात दाखल जाहाले. सेवेसी कळावे. मौजे केम येथील फाजिलाचा ऐवज देवावयाची आज्ञा जाहाली पाहिजे. स्मरणार्थ विनंती लिहिली आहे. लोकाचे देण्याचा तगादा लागला आहे यास्तव तूर्त रोख ऐवज पावे ऐसी आज्ञा केली पाहिजे. हे विज्ञापना.

¶*Balaji Shankar reports the movements of the two forces, the Peshwa's and the Haidar's, in the province of Savanur.*

---

No. 185] [5-1-1770

पौ छ १९ रमजान सबैन

हा। सांडणीस्वार.

श्री

सेवेसी हरि बल्लाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता। छ ७ रमजान मु॥ हरिहर वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान तर हैदरनाईक मासुरावर आहे. राजश्री गोपाळराऊ व रास्ते फौजसुधा सावनुरानजीक ठेऊन श्रीमंत फौजसुधा दरमजल श्रीरंगपटणाकडे जात आहेत. पुढे होईल ते लिहून पाठऊ. आपण श्रीमंतास पत्र लिहून तोंच्याची पत्रके पा। ती पावली.

समजाऊन मागाहून जाव पाठऊ. श्रीमंत राजश्री दादा लस्करांत दाखल जाले हे वर्तमान पेशजी लिहिलेच आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Hari Ballal informs that the Peshwa is heading towards Seringapatam leaving Gopalrao and Rastia at Savanur in the rear. Haidar is encamped upon Masur.*

---

*No. 186*] [*5-1-1770*

पौ छ १९ रमजान सबैन

ह्मा सांडणीस्वार

तीर्थस्वरूप राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

अपत्यें मोरोबाने साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ता छ ७ रमजान मुा हरिहर वर्तमान यथास्थित असे विशेष. आपली आज्ञा घेऊन स्वार जालो ते गडगनाथचे मुकामी लस्करांत सुखरूप दाखल जाहालो. वरकड इकडील वर्तमान तर राजश्री गोपाळराऊ व रास्ते सावनुरानजीक दाहा हाजार फौज ठेऊन श्रीमंत सारी फौजसहवर्तमान श्रीरंगपटणचे तालुक्यांत जावें याअन्वयें चालिले आहेत. येक दोन ठाणी घेतल्यावर मग कांहीं जावस्वाल लागला तर लागेल. होईल ते लिहून पाठऊ. तिकडील वर्तमान तीर्थरूपाचे शरीरप्रकृतीचें वरचेवर लिहून पाठवीत जावें. पुढे मनसब्याचा प्रकार ठरेल तो लिहून पाठऊ. बहुत काये लिहिणे, कृपा कीजे, हे विज्ञापना.

¶*Moroba Dada informs Nana Fadnis of his arrival in the Peshwa's camp at Gadagnath.*

---

*No. 187*] [*5-1-1770*

पौ छ ९ सवाल सबैन.

श्री

सेवेसी लक्ष्मण बल्लाल कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. ता छ ७ रमजान-पर्यंत मुा नजीक हरिहर येथे स्वामीचे कृपेकरून क्षेम असे विशेष. इकडील वर्तमान तरी श्रीमंत रा दादा लस्करांत येऊन पोहचले. हैदरअली याजकडील वकील आले आहेत, परंतु पोकळ बोलणे पुण्यात बोलत होते तेच बोलतात. प्रस्तुत मासुरावर मुकाम त्याचा आहे. राजश्री गोपाळराव व रास्ते यास सावनूरच्या तालुक्यात त्याच्या तोंडावर ठेऊन श्रीमंत कडूरबाणावर या मार्गे श्रीरंगपटणाच्या

---

१ येथून अक्षर मोरोबाचे.

सुमारे जातात. राजश्री मुराराव यासहि पत्रे गेली आहेत. सत्वरच येतील. चित्रदुर्गवाल्यासहि समागमे घेणार. वरकड सर्व वर्त(मान) येथास्थित आहे. शेवेसी शृत होये हे विज्ञापना.

¶*Lakshman Ballal reports that the Peshwa is proceeding towards Seringapatam; the arrival of Moroba Dada and the peace negotiations reopened by Haidar are also mentioned.*

---

*No. 188]* *[6-1-1770*

पो छ १९ रमजान सबैन
ह्मा सांडणीस्वार सेख अली
व फते मा.

**श्री**

सेवेसी हरि बल्लाल कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता छ ८ रमजान मुा नजीक वसवापटण वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान तर राजश्री गोपाळराऊ व रास्ते दाहा हजार फौजेनसी सावनुरानजीक ठेविले. हैदर नाईक मामुरावर आहे. श्रीमंत दरमजल श्रीरंगपटणचे ताल्लुक्यांत जात आहेत. ठाणी घ्यावी, निकड करावी, असा मनसुबा आहे. आम्हीं पटणांकडे चालिलो. याउपरी हैदर नाईक कोणता मनसुबा करील ते पाहावें. होईल ते लिहून पाठऊ. आपण पुणियाहून कागदपत्र पाठवितील त्यास ताकीद असावी कीं, लक्ष्मेश्वरावरून हरपनहली चित्रदुर्गावरून लस्करास यावे, याप्रो सांगावे म्हणजे ठीक येऊन पोहचतील. हरपनहली चित्रदुर्गकरास श्रीमंतानी ताकीद केली आहे. काही गुंता पडणार नाहीं. वरकड नवल विशेष लिहिजेसे नाहीं. राजश्री गोपाल नाईक यांचा सेवगावचा जावस्वाल श्रीमंत राजश्री . दादा आले, आतां करून घेऊन, लिहून पाठवितों. सेवेसी शुत होय हे विज्ञापना.

¶*Hari Ballal informs Nana Fadnis that the Peshwa is proceeding to Seringapatam, capturing on the way the places belonging to Haidar. The writer directs the route by which communications can safely be sent.*

---

*No. 189]* *[6-1-1770*

पो छ १९ रमजान सबैन
ह्मा साडणीस्वार

**श्री**

सेवेसी सदासिव अनंत कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ताा छ ८ रमजान पावेतो मुा नजीक वसवापटण येथे स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान येथास्थित

असे विशेष. स्वामीकडे येक दोन पत्रे पाठविली, परंतु पत्र येऊन वर्तमान कळले नाहीं, तरी स्वामी कृपावंत होऊन पत्र पाठविले पाहिजे. वरकड इकडील वर्तमान तरी हैदर नाईक मासूरच्या ठाण्यात राहिला आहे. आपाजी राम लस्करात आला आहे, परंतु त्याचे बोलणे कोणी आईकत नाही. त्याजवळ दोन जासूद-जोड्या नेहमी राहुटीस ठेविल्या आहेत. कोणाचे राहुटीस जाऊ देत नाहीं व दरबारीहि जावयाची आज्ञा नाही. श्रीमंताचा फार करून मानस पाटणास जावे, त्या प्रो श्रीमंत रा दादा फडणीस याचाहि मानस तसाच आहे. हैदर नाईक झाडी सोडून बाहेर पडत नाही. फौज आपली गोपाळराव, रास्ते वो करून पंधरा हजार पावेतो जमा जाली आहे. बागलकोटास तो दोन अडिचे (अडीचसे) बैलाची (तोफ) होती ते बरावर घेतली आहे. धारण पेशजीचे पत्रीं लिहून पाठविली आहे त्याप्रोच हाली आहे. वरकड सविस्तर वर्तमान राजश्री लक्ष्मणपंत देशमुख याणी पत्र लिहून पाठविले आहे त्याप्रों स्वामीस विदित होईल. मागाहून आढळेल ते वर्तमान सेवेसी लिहीत जाईन. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Sadashiv Anant to Nana Fadnis writes news from the South about Haidar being at Masur and about the Peshwa intending to proceed to Seringapatam.*

---

*No. 190]* *[15-1-1770*

पो छ ६ सवाल सबैन

## श्री

सेवेसी हरि बलाल कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता छ १७ रमजान मुा चिकनाइकहली प्रां श्रीरंगपटण वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान श्रीमंताची स्वारी या प्रांती आली. प्रथम बुदेहालचे ठाणे घेतले. तेथे खंडो भरारी यास ठेविले. पुढे ठाणी कंदिकिरे व हंदिकिरे घेतले. चिकनाइकहली मातबरच ठाणे. येक दिवस चार घटका तोफा लागल्या होत्या. कौलास येऊन दिल्हे. पुढें पटण तालुक्याची ठाणी घेतच आहेत. आपाजी राम लस्करांत आहेत. खंडणीचा मजकूर बोलत आहेत, परंतु मर्जीप्रो नाहीं याजकरिता होत नाहीं. मर्जीप्राा घडोन आल्यास होईल, नाही तर तूर्त ठाणी घेणे हाच मनसुबा आहे. पुढें होईल ते लिहून पाठऊ. माहालचे तोख्यांची पत्रके आली त्याचा जावस्वाल जाला नाहीं. जाला म्हणजे लिहून पाठऊ. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Hari Ballal writes to Nana Fadnis mentioning the places captured by the Peshwa's army. Haidar has once more opened negotiations through Appaji Ram, adds the letter.*

[या पत्राचा दुसरा वंदच सापडला.]

केले. चिकनाइकनहल्ली येथील मजकूर मागे लिहिला आहे. त्यास ऐसी नवद पावेतो ब्राम्हणमंडली व मावले लोक व खिजमतगार व खासवारदार व जासूद व सिलेदार मिळोन धरून नेले. त्यापौ मोरो खंडेराव व नरसिंगराव नारायण लेले याचे पुत्र दोघे बच्याजीपंत वर्वे याचे मेहुणे व येक वटिक मावल्याची व येक पोर इतक्यास ठेऊन बाकीचे आसामीची नाके कापून लाऊन दिल्हे. त्यात निळो रखमाजी व पांडुरंग पंत दोघे कारकून पहिले दादासाहेबाकडील उग्ररखान्याकडे होते ते व हरिपंत म्हणोन उमेदवार व तुकोपंत उमेदवार व मोरो खंडेराव याचा आज्यारी व केसो राम फाटक रामभट फाटकाचे पुत्र हंदिकिऱ्याचे ठाण्यात ठेविले होते ते, इतके ब्राम्हण मंडलीची नाके गेली. फार गोष्ट वाईट जाहाली. केसो राम फाटक व तुकोपंत ऐसे बुधेहालास गेले त्यास गोपालराव गोविंद याणी तवीब देऊन ज्याचे त्याचे आंगाची कातडी काढून नाके लावविली. बाकी आसाम्या सिऱ्यास आल्या त्याजकडे येथून तबीब रवाना केला आहे. मराठे काही येथे आले त्यांची नाके लावावयाची तबीबास आज्ञा जाली आहे. ब्राम्हणमंडलीचा मोठा घात जाहाला. श्रीमंतास फार वाईट वाटले. मुरारराव घोरपडे येऊन भेटले. जमाव चांगलाच आहे. निखालसहि आहेत. हिकडील तालुका सोडऊन मग बेगरुलास जावे आणि घ्यावे ऐसा डौल आहे. पाडुरंगपत गोडबोले यास कोकणातून चांगल्या तोफा आणावयाकरिता रवाना केले. मुंबईसहि जावे, तेथून चांगल्या तोफा खो करून आणाव्या, याप्रमाणे आज्ञा होऊन आजच गेले. वहिरजी मोरे याजकडील प्यादे परशराम वगैरे दोन आसामी छ ९ सवाली रवाना जाले ते छ २९ मिा लस्करात दाखल जाले. जाब तयार होत आहेत. येका दोहो दिवसी येथून रवाना होतील. आज्ञेप्राच कागद ज्याचे त्यास दिल्हे. मसलत थिजली. रंग पडत नाही. पर्जन्यकाल समीप आला अद्याप प्रथम दिवस आहे. मार्गील सिलक फार करून खर्च जाली. याउपरी कर्जासी गाठ आहे. बाहेरील कोठून यैवज यावयाचा नाहीं. विदित व्हावे हे विज्ञापना.

*¶This letter of which the first part is missing describes the atrocities perpetrated by the enemy on the Maratha garrison at Chiknaikanhalli. Many Brahmin and Maratha soldiers had their ears and noses cut off. The letter also announces the arrival of Murarrao Ghorpade in the Peshwa's camp at Shira.*

6448

No. 192] 1-2-1770

(कर्नाटक रु. नं. ९६४)

पो छ २१ सवाल सबैन

श्री

सेवेसी विज्ञापना. येथी वर्तमान तारीख छ ४ सवाल मुा कसबे वद्रर परगणे मजकूर प्रां श्रीरंगपटण येथे स्वामीचे कृपेकटाक्षेकरून येथास्थित असे विशेष. स्वामीनी कृपा करून पत्र छ १४ रमजानचे पाठविले ते छ ३० मिनहू पावोन आनद जाला व रविशंक्रमणाचे तील शर्करायुक्त पाठविले ते मस्तकी वंदून आदरेकरून भक्षिले व आज्ञेप्रा ज्याची पत्रे व तीलगुलाच्या थैल्या होत्या त्या प्रविष्ट केल्या. उतरे येऊन मागाहून पाठऊन देतो. श्रीमंताची पत्रे व बादली थैल्या येताच वाड्यातच तात्यानी प्रविष्ट केल्या. बाकी दोन बादली थैल्या राहिल्या त्या येक श्रीमंत सौ मातुश्री रमाबाईस दिल्ही व येक श्रीमत राजश्री दादास दिल्ही. वरकड राहिल्या थैल्या आज्ञेप्रा पत्राचे लखोटे करून नेऊन दिल्या. इकडील वर्तमान तरी वरचेवर आढळते ते लिहीत असतो. हैदर नाईक बसवापटणाचे आलीकडे चेनगिरीवर आहे. आपाजी राम व रजा आली याणी भला माणूस त्याजकडे पाठविला आहे. बीत बसल्यास मग आपण जाणार. येथून श्रीरंगपटणास जावे हा मनसबा वाटत आहे. इतक्यात आपाजी रामाने भला माणूस पाठविला आहे तो येऊन बीत बसल्यास पटणाकडे जावयाचे महकूब होईल. महिमाजी सिंदे याजबरोबर हजारबाराशे स्वार किरकोल व दोन तोफा देऊन आजच रवानगी मिराचे ताल्लुक्याकडे जाहाली. आपणाकडील बाळाजीपंत फाटक बरोबर दिले. ठाणी तमाम घेतात. कोणी ठाणे लढत नाही. काही ठाण्यात लोक ठेवितात, काही ठाणी पाडून जमीनदोस्त करितात. खंडण्या जीवन पाहून होतात. त्यात सोने रुपे होन रयतीचे हाल करावे तेव्हा उत्पन्न होते. काही रयतीत जीव राहिला नाही. स्वामीनी लाख रुपयाच्या हुंड्या पाठविल्या त्या पावल्या. ज्याच्या त्याणी कबूल केल्या. मुदतीस भरणा होईल. राजश्री विसाजीपंत यास माझे काम सांगितले त्यास माझा पाड काय? परंतु स्वामीनी पदरीचा कुटुंबांतील सेवक याचे चालवणे जरूर हे चितात आणून विसाजीपंतास सागितले, तेव्हा माझे कार्य जाहाले असेच समजोन

---

१ मुक्काम 'शडावर' असें असावें. नकलकाराची चूक दिसते.

आनद जाहाला' तो पत्री काय त्याहारा? याविसी मी विनति वारवार लिहित नाही. वहुत काय लिा कृपा केली पाहिजे हे विज्ञापना.

¶*The Peshwa's news-agent from Balur communicates that Haidar has pitched his camp at Chengiri and that Appaji Ram has despatched a special messenger to him to know the terms which should form the basis of the peace-talks*

---

*No 193]* *[10-2-1770*

पौ छ ८ जिल्काद सबैन
फाल्गुन हस्ते अलीवेग
साडणीस्वार.

श्री

विज्ञापना. चिकनाईकहाळींचे ठाणे श्रीमतानी घेऊन ठाण्यात च्यारसे प्यादे खडणीचे वसुलास व ठाण्याचे वदोवस्तास ठेविले होते. मोरो खडेराव कारकून सिलेदार ठाण्यात ठेविले. आणखी सिलेदार चार कारकून ठेविले व पचवीस राऊत नरसिंगराव नारायणराव लेले याचे पुत्र दोघे व सेव्याचा गुमास्ता पोतदाराकडील येक गुमस्ता व तिस खास वारदार काहीं वोथाटी वारदार इतके ठेविले होते. त्यास गावकरी लवाड. त्यास खडणीचा पैका पट्टू लागला व जाचहि होऊ लागला त्याणी हेदर नाइकाकडे भेद करून हजार दीड हजार पाईचे माणूस माघ शुध पौर्णिमेस शनवारी रात्रौ आणिले आणि गावकुसावरून दोन्या टाकून लोक घेतले. गाव मोठा. काहीं कळले, काहीं नाहीं, तो गावात सिरोन सरकारचें माणूस कारकूनसुधा कापून काढिले. काहीं लोक दरवाजा उघडून पलाले परतु तीनसेपर्यंत ठार जाले. मेरो खडेराव जखमी धरून नेला असें वर्तमान आहे. वरकड मेले कोण, वाचले कोण, याचे अद्यापहि ठिकाण नाहीं. परतु फार करून विल्हे लागले. वाचले असते तर कोणी तरी येताच. हैदरखानाकडील लोकानी गावातील रयत काढून दुसरे गावी घालून आपण ठाणें वोस टाकून गेले. च्यारसें माणूस ठाण्यात असता असें न व्हावें, परतु आमचे लोकाची गाफिली आणि गावकराचा दगा यामुळे असी गोष्ट जाली. हे वर्तमान श्रीमतास कलताच लस्करातून नरसिंगराऊ धायगुडे व शहाजी भोसले यास चिकनाईकहल्लीस रवाना केले व महिमाजी सिंदे याजवरावर हजार फौज देऊन गुरूमकोंड्याकडे पाठविलें होते, त्यास माघारे आणऊन चिकनाईकहल्लीस राहावयास

---

१ वाड नकलेची हे पत्र नक्कल आहे मूळ नक्कलेच्या बदावर 'कर्नाटक रुमाल न १६४' व 'तपासलें १८।६।९७' असे दोन शेरे आहेत

आज्ञा केली. तीनसें गारदी पाठविले आहेत. फिरोन सरकारचें ठाणे घालावें असें करून रवाना केले. तीनच्यारसें माणूस व ब्राह्मण मारले गेले, वाईट गोष्ट जाली. हे वर्तमान कचें स्वामीस कळावें म्हणौन लिहिलें असे. वरकड ठाणीं घेतली ती काईम आहेत. हैदरखान झाडीत आहे. हैदर नाईक पुढें मैदानांत निघता तर येक दिवसांत तमासा दाखविते. परंतु योग घडत नाहीं. गोपाळराऊ सावनुराकडे होते त्यास फौजसुधां बोलाविले. ते बुंदेहाळाजवळ येऊन राहातील. याप्रमाणें वर्तमान आहे. हे विज्ञापना.

¶*The loss of Chiknaikhalli to Haidar's forces is reported. The whole garrison was surprised and cut down.*

---

*No. 194*] [*13-2-1770*

पो छ १६ सवाल सबैन

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य
राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

पोष्य कृष्णराव बल्लाळ कृतानेक नमस्कार विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशललेखन करीत असिले पाहिजे विशेष. आपणाकडून हमेषा पत्रे येतात त्याजवरा पत्री परामृष करीत असिले पाहिजेत. यानंतर इकडील वर्तमान. श्रीमंत तुंगभद्रा दक्षणतीरें आल्यावर श्रीरंगपटणची ठाणी दाहावारा सोडविली. चित्रदुर्गवाले येऊन भेटले. कडपेकर याजकडील वकील आले. व महमद अलीकडी(ल) राजकारणे घेऊन आला होता. त्यासी बोलोन त्याची रवानगी केली. आंबंदा श्रीमंताचे मानस आहे की हैदरनाइकासीं सलोक न करिता तमाम इकडील पालेगार वगैरे मेळऊन पारपत्ये करावं यैसे आहे. चित्रदुर्गकर पाच हजार प्यादा व दीड हजार फौज चांगली व बाण दारूगोळी जंगी सामान आहे. चाकरी करावयाची उमेद आहे. कितेक ठाणी घेत घेत नागमंगल पो खासा स्वारी आली. पांचा सा लक्षाचा मुलूक सुटला. आणिक पांचसात ठाणीं चिकबाळापूरपो आहेत तीं सुटलीं म्हणजे चौदा पंधरा लक्षाचा मुलूक सुटल. बेंगरूळ व पटण मात्र राहील. तूर्त खासा स्वारी नागमंगलावर आहे. येथून पटण चौदा पंधरा कोस राहिले आहे. राजश्री मुरारराविहि गुर्तीहून निघाले आहेत. लौकरीच येऊन पोहचतील. हैदर नाइकाकडील सल्लखाचे राजकारण आहे. पाहावे. या प्रांतीं लशकरात कुळध्या दाहा पाइली, जोरी पाच पाइली,

6451

बाजरी साडेचार, हरभरे दोन, गहू दोन अडीच, तादूळ खर्ची तीन पाइली, तूप शेर, गूळ अडीच शेर, तेल चार शेर येणे प्रा. तूर्त चारा नाचणकाड. बहुत काये लिहिणे लोभ आसो दीजे हे विनती.

¶*Krishnarao Ballal informs Nana Fadnis that the Peshwa proposes this time to completely humble Haidar with the assistance of some polygars in the South "The Raja of Chitradurg has promised him his support Murarrao is on his way to join him Haidar too dreading consequences has already opened negotiations are the items of news in the letter*

---

*No 195]* *[15-2-1770*

पो छ ८ जिलकाद

सवेन फालगुन

हा अलीबेग साडणीस्वार

श्री

तीर्थस्वरूप राजश्री नाना वडिलाचे सेवेसी

अपत्य मोरोबानें साष्टांग नमस्कार विनती. येथील कुशल तागाईत छ १८ सवाल मुकाम मागडी कुशल असो विशेष. आपण छ २३ रमजानचे पत्र पाठविलें ते पावलें. लिहिलें वर्तमान कळलें. तीर्थरूपांची शरीरप्रकृति बरी आहे म्हणोन लिहिलें तें कळलें. आपाजी गणेश याचे फाजिलाचे पट पो ते पावले. श्रीमतास समाजाविले. त्याची उत्तरें सरकारचे पत्रात लिहिलीं आहेत त्याजवरून कळेल. तोफ्याचीं पत्रकें पा होतीं त्याचा फडशा तूर्त होत नाहीं म्हणोन पेशजीं श्रीमतानीं लिहिलेंच आहे इकडील वर्तमान तर ठाणी घ्यावयाचा उद्योग आहे. पुढें होईल तें लिहू. आबजी करडे याजकडे हजार रुपये कर्जदादन येणें त्यास महिपतराव करडे याचे ऐवजात वजा करून घ्यावें, म्हणोन लिा. त्यास करडे देशीं चाकरीस गेले आहेत व त्याचे नालबंदीची बरात आपणावर दिल्ही आहे, तेथें वजा करून घेतलेच असतील. इकडील वर्तमान तर श्रीमतानीं बुदेहाल वगैरे नागमगलपर्यंत ठाणीं घेतली, काहीं पाडलीं, काहीं ठेवावया लायेक मजबूद पाहून ठेविलीं. बदोबस्त केला. बहिरवदुर्ग पाहाडी जागा फार चांगली, दोन तीन दिवसात घेतली. वर मजबूद दाहा माणसें असल्यास काहींच व्हावयाचें नाहीं. परंतु सहजागरीच कार्य जालें. हाली मागडीचे गढी मुकाम आहेत. ठाणें पाडिलें. झाडीत पाहाडी किल्ले दोन आहेत, त्याचे आश्रयानें काहीं बुनगे होते त येक दोन स्वारिया पाठऊन लुटून टाकिले. हेदरखान झाडींतच आहे, बाहेर निघत नाहीं. यरवीं फडशा लोकरीच होता.

तहाचाहि प्रकार अद्यापि मनोदयानरूप बोलत नाहीं. मिराचे राजकारण आहे, बहुधां घडेल. च्यार जण च्यार खबरी त्यास लिहितात यामुळें बेहाराम[1] जाले आहेत. फौज छावणीस राहातें हे कललियावर नरम पडतील असें वाटतें. गोपाळराव त्याचे सुमारावरच दुर्गाचे मुलकांत आहेत. वरकड विशेष काहीं लिहावें असें अद्यापि नाहीं. होईल तेव्हां लिहून पाठऊं. सदैव पत्र पाठऊन संतोषवीत असावें. बहुत काय लिहिणें कृपा कीजे हे विज्ञापना.

[2]पैवस्ति छ ८ जिलकाद सबैन फालगुन

ह्या अर्लीबेग साडणीस्वार

७-२-१७७०,

¶*Moroba writes to Nana Fadnis that Haidar's territory up to Nagmangal has been overrun.*

---

*No. 196*] [*17-2-1770*

**श्री**

शेवेसी पांडुरंग गणेश मोडक कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता। माघ वा। सप्तमीपर्यंत मुकाम नजीक बेंगरुळ येथे आपले कृपेकरून सुखरूप असो विशेष. इकडील वर्तमान तर हैदर नाइकाचे तोंडावर फौज ठेऊन श्रीमंत पाचसात ठाणी घेत श्रीरंगपटणानजीक बारा कोसपर्यंत आले. तेथे पाच सात मुकाम होते. उपरात तो रोख सोडून बेंगरुळानजीक आले. येथे आलियाजवर बहिरवगड किल्ला पाहाडी फार विकट होता तो घेतला. आणिक एक दोन किले आहेत ते घेऊन बेंगरुळास लागणार. ठाणी घेतली होती त्यापैकी फौज हिकडे आली याजवर.चिकणहळी ठाणे होते त्यामध्ये तेथील लोक जुने होते त्याणी भेद करून हैदर नाइकास घेऊन दिल्हे. चित्रदुर्गवाल्याकडील व सरकारचे ऐसे च्यारसेपर्यंत माणूस होते व पाच सात ब्राम्हण ऐसे होते ते मारले गेले, ऐसे जाले. हैदर नाइकाकडील वकील सलुकाचा मजकूर बोलत होता, परतु सुरळीत बीत बसत नाहीं. हैदर नाईक तो झाडी सोडून लढाईस तो येकंदर येत नाहीं. आमचे पाठीमागें दाहा बारा कोसाचे अंतराने त्याजकडील फौज दोन तीन हजार लपोन फिरत्ये. कहीची तटें काहीं दगा करून नेतात. त्याजवर सरकारची फौज पाळत लाऊन एक दोनदा गेली परंतु गाठ पडिली नाहीं. बेंगरुळ विकट आहे. लवकर आले तर बरेंच जाले, नाही तर फौज ठेऊन श्रीमंत माघारे

१ बाहाराम = बहुरा = दिक्, भग्न. २ पैवस्ती नाना फडणिसांचे हातची.

फिरतील. फार करून छावणी होईलसे दिसत नाहीं. मग पाहावें. घरी प्यादा चौकीस कानोजी म्हातारा होता तो वारला. याजकरितां कृपा करून चवकीस, चांगलासा सुरलीत गडी द्यावा. यापूर्वीच आपण दिल्हे असेल परंतु सूचनार्थ लिा आहे. पुढें होईल मजकूर तो लेहून पाठवीन. श्रीमंत नानास एकादशीस देवाज्ञा होऊन उभयतास कैलासवास जाला म्हणून श्रीमंतास पत्र आपण लिा होते ते श्रीमंतास प्रविष्ट केले. त्यांचा तो कालच जाला होता. ते पुण्यवंत त्याप्रो त्यास श्रम न होता एकादशीस महायात्रेचे मार्गी देवाज्ञा जाली त्याचा खेद आपण विवेकेकरून एकदर करू नये. कळवि शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. साष्टी-पर्यंत गडी जरूर दिला पा हे विज्ञापना.

¶*Pandurang Ganesh Modak reports that the Peshwa is heading towards Bangalore and that Haidar still refuses to come to terms.*

---

*No. 197]* *[6-3-1770*

पो छ २२ जिल्काद सबैन
फाल्गुन ह्या परशराम

## श्री

सेवेसी सदासिव अनंत कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता छ ७ जिलकाद-पावेतो मुकाम किले नंदीगड पा बालापूर येथे स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. स्वामीनी कृपाळु होऊन छ ९ सवालचे पत्र पाठविले ते पावोन (परम) समाधान जाहाले. याप्रमाणे सदैव * * * आज्ञा जाहाली पाहिजे. * * * * किले मजकुरास मोर्चे आज लावि * * * * बालापूर घेतले. त्याचे बंदोबस्तास माहिमाजी सिंदे यांस ठेवावयाचा करार जाहाला आहे. माहादाजीपंत गोडबोले यास फडणिसी व हरि माणकेस्वर यास मजमू याप्रमाणे सांगितले. वरकड सर्व वर्तमान राजश्री देशमुख व आत्या याणी लिहिले आहे त्यावरून निवेदन होईल. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Sadashiv Anant reports the successful occupation of Balapur which he says is given in the charge of Mahimaji Sindia.*

6151

पो छ २२ जिल्काद

श्री

राजश्रिया विराजित राजमान्ये
राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

पोष्य कृष्णराव बलाळ कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता छ ७ जिल्काद मुा नंदीगड जाणून स्वकीये कुशल लेखन करीत आसिले पाहिजे विशेष. आपण साडणीस्वाराबरोबर पत्रे पाठविले ते पावले. येसच स्मरणपूर्वक हरघडी पत्री परामृर्ष करीत आसावे. येथील वर्तमान हैदरखानाकडील दाहा पंधरा ठाणी मातबर घेऊन वीस लक्षाचा प्रांत सोडविला. छ ६ जिल्कादी नंदीगडास त्रितीये प्रहरी मोर्चे लाविले. येका दो रोजा गड सर होऊन फत्ते होईल. किला घेतल्यावर कोलारचा किला घेऊन प्रांताचा बंदोबस्त करावा. आलीकडील सरदेस किला बंगरूळ येक राहिले, तेथीलहि राजकारणे आहेत, घडल्याने किला येईल. तो किला सरकारात आल्यावर पंचवीस लक्ष्ये रुपाया प्रांत पटीची पटीच सुटली. राहाता पटण आणि बिदनूर राहिले. श्रीमंताचेहि मानस आहे कीं तमाम या प्रांतातील पालेगार व सरदार कडपेकर कर्नोलकर पठाण आणून हैदरखानाचे पारपत्ये करून दोन तीन करोड रुपयाचा प्रांत मधेच त्याने दाबिला आहे तो सोडवावा येसे आहे. मुरारराव घोरपडेहि येऊन भेटले. हैदरखान ठाणे तरीकिरे येथे होता. राजश्री गोपालराव व रास्ते बुधिहाळ सरकारचे ठाणे आहे तेथून च्यार कोसावर होते. खानाने फाल्गुण शुध प्रतिपदेची रात्री सडा होऊन दगा करावयास पाच हजार फौज व दाहा बारा हजार प्यादे व पंधरा तोफा व बाणाचे चाळीस पनास उंट घेऊन रातोरात बारा कोस चालून येऊन तीन प्रहर गुास्त जाल्यावर छापा घालावा येसे तजविजीत होता. तो राव मार व रास्ते यास बातमी आली की खान मजकूर दगा करावयास येतो, हे येकून उभयता हुशारच होते. पाहाटची च्यारपाच घटका रात्र राहाताच त्याने तोफाची हाणामार करून गडबड केली. उभयेतानी आपली तयारी करून खान मार यास ठासून राखिले. आपण बुणगे लोक घेऊन संभाळून निघाले. रात्रीची वाल्मेल जाली, सबब दाहा वीस घोडी व माणसे जाया जाली. हैदर नाइकहि तेथून माघारे गेला. परंतु समये रात्रचा यास्तव थोडासा गलाटा जाहाला, परंतु संभाळून

निघाले. श्रीमंतीच लशकरामुळे हैदरखानाचा प्रांत खरात्रीखाले आला आहे. पाहावे. बहुत काये लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

¶*Krishnarao Ballal gives to Nana Fadnis the extent of the territory lately acquired by the Peshwa from Haidar and describes a sudden night attack of the enemy to surprise Gopalrao and Rastia which failed owing to the latter's vigilance*

---

*No 199]* *[8-3-1770*

पौ छ २२ जिलकाद सबन
फाल्गुन हा परशराम
प्यादा

**श्री**

सेवेसी विज्ञापना. येथील वर्तमान ता छ ९ जिलकाद मुकाम किले नंदीगड परगणे चिकबालापूर येथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान अलाहिदा पत्रीं लिहिलें आहे त्याजवरून विदित होईल. येथें छ ६ जिलकादीं आले. येताच मोर्चे किल्यास लाविले आहेत. येका दोहा रोजात किला फते होईल. बुधेहालात खंडो रघुनाथ ठेविले होते त्यास ठाणे टाकून गोपालराव याचे लस्करात आले. दहशत खाऊन ठाणें टाकून आले. गोपालराव, रास्ते बुधेहालानजीकच आहेत मीर रजा व टिपूसाहेब पाच हजार फौजेनसीं वगहलानजीक होते, त्यास हेदऱ्यानें आपणाकडे बोलाविलें. यास्तव तिकडे कडुरवाणावराकडे जात आहेत, यास्तव याचे पाठलागास बालाजी पलाडे वगैरे दोन हजार फौज रवाना केली आहे हेदर ना थोडकासा हावभरीत जाहाला आहे फौजेचा चागला जथ करून फिरोन गोपालराव याजकडे यईलसे वाटते येथून बातम्या पाठविल्या आहेत. तो बाहेर चागला निघोन लडाई देतो असे जाहरयास खासा स्वारी त्या रोखें जाईल. सलुखाचा प्रकार अद्याप काही नाहीं पुढ ठावणी होईल किंवा मातबर फौज ठऊन देसी येतील हें नकळे. छ १ जिलकादचीं पत्र गगापुरास खिजमतगार गेला त्याबराबर पाठविलीं आहेत म्हणोन पत्रीं लिहिलें आहे. त्यास खिजमतगाराबराबर पत्रे गेली नाहींत. गुरुजींचे खिजमतगाराबराबर पत्रे गेलीं आहेत त्याजवरून कळेल हदरनाईक बाहेर निघाला तरी मग कोल्हाराकडे जाणार. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Baji Govind writes to Nana Fadnis about the military tactics of Haidar and the measures taken by the Peshwa to meet them*

No. 200] [14-3-1770 ?
पैा छ १९ जिलकाद

# श्रीगणराज

सेवेसी. गोपाळराव गोविंद कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. सावनूरकरावर वरात दिल्ही. पैशासी संबंध नाहीं. वरचेवर. रा। मल्हार मुकुंद यास सांगोन त्यास मुल्क जप्ती होईल हे भयहि सुचविले. तथापि पैसा मिळावयाचे त्राणच त्यास नाहीं. भगवंतराव येथें आले त्यास पुशिले. तुम्ही आषाढ मासी रुपये देऊं म्हणत होता त्याची वाट काय ? तेव्हां त्यास जाबसाल सुचेनासा जाला. सावनूरकराकडे भगवंतराव यास पाठविले, तो तेथे पठाणाचा गवगवा असा कीं, प्राणाशीं गांठ. सत्तर हजार होनाचा ऐवज पठाणाचा देणे, त्यास पैसा द्यावयास नाहीं.. सरकारचा पैका न दिल्यानें राहिली दौलत तेहि जाते हे कळले असोन चिंता करीत नाहींत. कां कीं आधी पठाणाच्या हातनें वाचणे घडत नाहीं; तेथें दौलतेची चिंता काये ! या प्रकारचे वर्तमान. स्वामींनी तो सावनूरचा ऐवज तूर्त येईल येैसे वाटोन आम्हास देविला आणि आज्ञाहि जाहाली होती कीं पैका न देत तर मुल्क जप्त करणे. त्यास आम्ही इकडे आल्यावर वरातांचा ऐवज चौघावर देविला. तितकीहि खष्ट कुले. कर्ज मिळेचना. थोडे बहुत मिळाले तर, व्याज तिहोत्रा द्यावे येैसा प्रसंग प्राप्त जाहाला. फौजेचा गवगवा व ठाण्याची शिबंदी व तोफखान्याचा खर्च. आलीखान वगैरे गाडदी. खर्च तो अनिवार तेव्हां उपाये नाहीं. आजपावेतो सावनूरकराच्या पैक्याची वाट पाहिली. पैसा नये तेव्हां दोन चार महाल जप्ती करऊन महालचे ऐवजी रसदा घेऊन थोडासा ऐवज वरातेपैकीं उगविला आणि कामाविसीनें महाल दिल्हे. बाकी वरातचा ऐवज येणे तो व सरकारचा पैका मुल्क जप्ती केल्याविना येत नाहीं. मोरबा व आणिगीरि व हनगल तिही स्थलच्या सनदा देऊन रसदा घेतल्या आहेत. त्यास ठाणी अद्यापि बसली नाहीं. हनगलच्या लागास एक प्रहस्त गेला आहे. हस्तगत जाले असेल तर उत्तमच जाहाले. आणिगिरे, मोरबा, येथें जप्तीच्या चिठया पाठविल्याच आहेत. जवळच आहे. ठाणी घालावयाचे कांहीं संकट नाहीं. परंतु स्वामींचे पत्र जप्ती न करणे म्हणोन आल्यावर संदेह निर्माण जाहाला आहे. परंतु पहिली आज्ञा आहेच. येवढी स्थले तो घेतली पाहिजेत. रसदा घेतल्या आहेत, यास्तव उपाये नाहीं आणि वरकड मुल्क राहिला त्याची जप्तीचीच आज्ञा पाहिजे. श्रावण मास तो सहजेच गेला. पैका न ये. वाट कोठवर पाहावी. जप्तीच करावा हा आग्रह नाहीं. परंतु जाले वर्तमान रसद घेतल्याचे श्रुत व्हावे यास्तव विनंती लिहिली आहे. विदित होय हे विज्ञापना.

¶*Gopalrao Govind Patwardhan explains his financial difficulties caused by the miserable situation of the Nawab of Savanur.*

३ मोहरम सबैन

कासीद जथे रायेमल

श्री

सेवेसी विज्ञापना. येथील वर्तमान तागायत छ १३ जिल्हेज मुकाम मौजे हेसरगटे परगणे बेंगरूळ येथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान तरी श्रीमंताची स्वारी मुलवागलाहून माघारी फिरली. बेंगरूळावरून सिन्याचे रोखे येत आहे. बेगरूल मजबूद. अखेरीचे दिवस. वैरणीचा मोठा पेच. यास्तव बेंगरुळास मोर्चे लाविले नाहींत. हैदर ना॥ श्रीरंगपटणास गेला. खंडणीचे कांहीं जाले नाहीं. गोपाळराव येका दोहो रोजीं येऊन मिळतील. सरंजामी फौज छावणीस गोपाळराव याजबराबर ठेऊन खासास्वारी दरमजल देसी येणार. पुण्याहून पैका आला म्हणजे फौजेस नालबंदी देणार. कापड फौजेस नालबंदीचे देत आहेत. श्रीमंताची शरीरप्रकृत थोडकीसी बिघडली आहे. उष्णकाल बहुत, यास्तव लौकरच पुण्यास स्वारी दाखल होईल. रामचद्र त्रिंबक याजकडे पनास हजार रुपये तजकन्याचे निघाले याजमुळे मामलत दूर करून महिमाजी सिंद्यास सांगणार. येका दो रोजी वस्त्रे होतील. यंदा फौज देखील यवनसुधा भारी जमा जाहाली, तत्राप हैदराचें पारपत्य न जाहाले. भारी किला बेंगरुला-सारखा साध्य न जाहाला. पैकाहि न मिळाला. गोपाळराव संकटास्तव छावणीस राहातील. खासा असतां कांहींच न जाले, मग याच्याने काय होणार? गोपाळरावजीवर छपा पडिला त्या दिवशीं नारायणराव कृष्ण याचा भाऊ माधवराव यास गोळा पायास लागला होता, आठ पंधरा दिवस होता तो मृत्य पावला. याजमुळें गोपाळराव अजुर्दे आहेत. इकडे महर्गता मोठी. वैरणीचें संकट. छावणीस फौज राहील, परंतु महर्गतेमुळे बेजार होईल. हैदरखान यास कांहीं मानिणार नाहीं यैसे आहे. येका दो रोजीं गोपाळराव भेटतील. तेथें दोन च्यार मुकाम करून गोपाळराव विदा जाले म्हणजे जलद येतील. बहुत काय लिहिणे कृपा केली पाहिजे हे विज्ञापना.

¶*Baji Govind reports that the Peshwa was retracing his steps without assailing Bangalore and that the expedition as a whole must be regarded a failure as the enemy had not been much impressed.*

6458

पैा छ १ मोहरम आवसीची
सा घटका रात्र. चिमाजी
व शहाजी जासूद जथे
बाबोजी नाईक.

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाळाजी
जनार्दन स्वामी गोसावी यांसी

पोष्य माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंती उपरी. येथील कुशळ जाणून स्वकीय लिहीत जाणे विशेष. तुम्ही छ ३ जिल्हेजचे पत्र पाठविले ते छ १९ जिल्हेजी देवरायदुर्गाचे मुकामी पावोन लिहिले वर्तमान कळले. नव्या तोफांचे कारखान्याकरिता बाळाजी वामन दामले याणी नवे घर बांधिले. फार करून तयार जाले. पाच हजारपर्यंत अजमासे लागतील. कडक बिजली तोफ फोडून साडेपाच खंडी पंचरस काढिले व आनंदवलीस जंबुरे पंचरसी बारातेरा आहेत तेहि मोडून आणविले. चार साडेचार खंडी पंचरस निघेल. येकूण दाहा खडीचा अजमास आला. यासिवाय पंचरस करावयास तांबे कथील जस्त मिलोन चाळीस खंडी देविले, त्यास पनास पंचावन हजार रा लागतील. काही ऐवज दिल्हा व काही द्यावयाचा आहे. याखेरीज कोळसे रायवळ व खैराचे मिलोन दीडशे खंडी व मेण, राळ, तेल, तूप, सुंभ, काथा वगैरे सात हजार. येकून येकंदर सतसष्ट हजार अजमासे लागतील. यासिवाय कारेगराचा दरमहा अडसेरीसुधा तीन हजार अजमासे आहे. काम जलदीने चालत आहे म्हणून लिहिले ते सविस्तर कळले. यैसियास कडक बिजली व जंबुरे मिलोन दाहा खंडी पंचरस जाले. पुढें चाळीस खंडी पाहिजे ते सारेच खरेदी करून घ्यावयाचे नवते. आणखी फुटक्या तोफा असतील त्याचे काढावयाचे होते. केवळ खरेदीच करून देईन म्हटल्यास पैका फार होतो, याजकरिता पैका देऊन जितके खा केले असेल तितकेच पुरे करणे. तुम्ही पैक्याचा अजमास लिहिला, त्यापैकीं पैका देऊन पंचरस घेतले असेल ते घेतले; याउपरी खरेदीस पैका न देणे. सारांश गोष्ट, तोफा तर यादीप्रा जाल्या पाहिजेत. परंतु येकदाच साऱ्या करीन म्हटल्यास खरेदीस पैका फार लागेल. याजकरिता पुण्यात येक कनमुरडी व नारंजन दोन तोफा आहेत त्यांचे पंचरस काढावे. नगर दौलताबादेस जायबंदी तोफा असतील त्याचे काढून आणावे. दोहीं स्थळी नसल्यास पुरंदरचे मार्चास गणेश तोफ ठेविली आहे, ती खाली उतरून त्याचे पंचरस काढावे. याप्रा तिकडे तोफा

असतील त्यांचे पंचरस काढावे. मदगिरीस येक दोन तोफाचे पंचरस आहे. दुसरे लस्करांत फेरोजंग तोफ जाया जाली, त्याचे पंचरस काढिले आहे ते तुम्हाकडे पाठऊन देऊं. दोन महिनियानी तुम्हाजवल पोहंचेल. जसे जसे जमा होत जाईल तसतसे काम चालीस लावणे. दाहा खंडी कडक विजली व जंबुरे मिलोन जमा जाले. दुसरे तुम्ही चालीस खंडींचा अजमास लिहिला, त्यापैकी खोा करून दिल्हे असेल ते इतक्याचेच काम चालीस लावणे. दुसरे खरेदी करून न देणे. तीन हजार कारखान्याचा दरमाहा आहे म्हणोन लिहिले. त्यास तुम्ही सरंजाम तोफांचा केला असेल तितक्यांचा कारखाना चालीस लावावयाजोग कारागीर ठेवावे. जाजती असल्यास दूर करावे. जसजसा पंचरसाचा सरंजाम सिलकी तोफांचा होत जाईल तसे काम चालवावे. केवल खरेदीच करून तोफा करीन म्हटल्यास पैका मुबलग लागेल. याजकरिता लिहिल्याप्रा तोफाचा कारखाना चालिवणे. कोलसे वगैरे जिनस हा तर खरेदी करून दिल्हाच पाहिजे तो द्यावा. पंचरस मेलविल्यास सिलिकी तोफांचेच मिलेसे आहे. यास्तव पत्र पावे तोपावेतो खरेदी जाली ती जाली. या उपरी पंचरस खरेदी न करणे. सरंजाम सिलकी व खरेदीचा जमा जाला असेल त्याचे काम चालीस लावणे. वर्तमान वरचेवर लिहून पाठवीत जाणे. रा छ १९ जिल्हेज. हे विनंती.

¶*Madhavrao Ballal advises Nana Fadnis to observe utmost economy in the manufacture of guns by utilising metal of old guns and not making new purchases.*

---

*No. 203]* *[17-4-1770*

पौ छ १ मोहरम
सवैन हस्ते बाबोजी
नाइकाकडील जासूद.

**श्री**

सेवेसी हरि बलाल कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ २० जिल्हेज मुक्काम किले देवरायदुर्ग वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामीनी छ २२ जिलकादचे पत्र साडणीस्वाराबराबर व दुसरे पत्र छ २ जिल्हेजचे सांडणी-स्वाराबराबर पाठविले ते पावलें. लिहिलें वर्तमान कळलें. इकडील वर्तमान तर देवरायदुर्गास मोर्चे लागले अहेत. किला थोर पाहाडी बाका आहे. आंतील लोकांचे काहीं राजकारण लागले आहे, सिधीस जाईलसे दिसते. होईल तें लिहून. या किल्यामुळे सरकारचे तालुके बाळापूर मदगिरि चेनरायदुर्गास फार उपद्रव लागत होता. किला आला म्हणजे निर्वेध पटी जाली. येथून कूच

जाल्यावर जें होईल तें लिहून पाठऊं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना. पुण्याचीं पत्रें दोन खानग्या सांडणीस्वाराबराबर आलीं व लाख रुपयांची हुंडी आली ती सावकारानी कबूल केली. त्याची सरकारचीं उत्तरें मागाहून पाठऊन देऊ. चौकडे व पोशाक अफ्तागीर पंखा पाठविला तो पावला. जाब मागाहून पाठवितों हे विज्ञापना.

*¶Hari Ballal writes to Nana Fadnis that the strong hill fortress of Deoraidurg is being invested. He acknowledges the receipt of money sent from Poona.*

---

*No. 204]* *[20-4-1770*

श्री

तीर्थस्वरूप राजश्री अंताजीपंत मामा वडिलांचे
सेवेसी.

अपत्ये व्हिरवानें चरणावरी मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विनंती. तागाईत चैत्र वद्य दशमीपावेतों मुकाम देवरायदुर्ग नजीक मतगिरी येथें वडिलाचे आशीर्वादेकरून सुखरूप असो विशेष. वडिलीं पत्र फाल्गुन वद्य त्रयोदशीचे पाठविलें ते चैत्र वद्य तृतीयेस पावलें. कोंकणचें पत्र प्रस्तुत आलें नाहीं म्हणोन लिहिलें. हल्ली आलें असिलें तर पाठवावें. इकडील अधिकोत्तर वर्तमान ल्याहावें यैसे नाहीं. हैदरनाइकाची खंडणी अद्याप आली नाहीं. देवरायदुर्गास मोर्चे लाविले होते; किला कठिण होता, सभोवतीं झाडी व डोंगर ऐशी जागा कठिण, परंतु श्रीमंतांचे पुण्यप्रतापेंकरून लौकरच हस्तगत जाला. आणखी येक दोन किले ध्यावयाचे आहेत, तेहि किले देवरायदुर्गाचे किलेदाराचे स्वाधीन आहेत. किलेदार सापडला आहे, किले येतील. छावणीचा अद्याप ठराव नाहीं. लस्करांत महर्गता फार जाली होती. जोरी पांच शेर व तांदूळ च्यार शेर, हरभरे साडेतीन शेर च्यार शेर, तूप पावणेदोन शेर, तेल तीन शेर साडे तीन शेर, याप्रमाणें महर्गता जाली होती. मोगलांकडील फौज व मुरारराव घोरपडे व सावनूरकर पठाण, व चित्रदुर्गाचा राजा यैसे फौजसुधां आले आहेत. कळावें, बहुत काय लिहिणें, हे विज्ञाप्ति.

चिरंजीव राजश्री रामचंद्रपंत अणा व सदोबास आशीर्वाद. आलिया माणसाबरोबर पत्र पाठवीत असिलें पाहिजे.

G101

सेवेसी भिकाजी गोविंद कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. पत्र पाठऊन संतोपवीत जावे. राजश्री वहिरोपंत यास वर्षप्रतिपदेस अफ्तगीर दिल्हे, वहुत काय लिहिणें हें विनंती.

¶*Bahirao writes to Antajipant informing him of the capture of the fort of Deoraidurg and some other adjoining forts. The writer also quotes prices of some articles that had gone very high in the army.*

---

*No. 205]* *[24-4-1770*

पो छ १९ मोहरम सबैन
वैशाख हा। लालखान
सांडणीस्वार

श्री

विज्ञापना. ता। छ २७ जिल्हेज वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान फार करून किले कोट घ्यावयाचे ते घेतले. पुढे छावणीचा डौल त्यास सरकारची हुजरात सात आठ हजार व राजश्री गोपाळराव, रास्ते वगैरे संरजामी मिळोन वीस हजार फौज ठेवावी. ही गोष्ट न घडल्यास खासा श्रीमंतानीं छावणी करावी, श्रीमंत राजश्री नारायणरावसाहेव यास पुण्यांत पाठवावे, यप्रों मनसवा घाटतो. यास सिधांतास आठ दिवस लागतील. हुजरातचे फौजेंत सरदार राजश्री त्रिंबकराऊ मामा व आपा, वळवतरायांचे पुत्र, व वाळकोवा तात्या इतके आहेत. यांत कोण राहावयाचा ठराव होईल तो लिहून पाठऊ. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. राजश्री मामा छावणीस राहात नाहींत. राजश्री आपा व वाळकोवा तात्या राहातील. कळावे हे विज्ञापना.

¶*Haripant informs Nana Fadnis of the progress of the army and its future programme.*

---

*No. 206]* *[30-4-1770*

पो छ १९ मोहरम सबैन
वैशाख हा। कासमवेग
सांडणीस्वार

श्री

सेवेसीं हरि वलाल कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ ३ मोहरम मुकाम निजगल वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान निजगल किला पाहाडी अवघड तो घेणे याजकरितां राजश्री गोपाळराव, रास्ते

व गायेकवाडाची फौज यांस सांगोन् मोर्चे लागले. किला थोर. येके आंगें मोर्चे व हेदरखानाकडील कुमक हजार गारदी किल्यावर आले, तेन्हां श्रीमंत देवराय-दुर्गाजवल होते तेथून कूच करून किल्याजवल मुकाम करून चहूकडून किल्यास मोर्चेबंदी करून तोफाची मारगिरी सुरू केली. आठ दिवस किला झुंजला. आंतील लोकानी निकड फार केली. सेवटीं हला करावयाचें ठरलें. त्यास आज छ मजकुरीं प्रात:कालीं सर्व लोकांस ताकीद केली. श्रीमंत राजश्री रावसाहेव व श्रीमंत नारायणरावसाहेव तोफाजवल उभे राहून हला केली. आंतील लोकानी निकडीची मारगिरी केली असतां आपलेकडील लोकांनी मोठी शर्त करून हला करून किला घेतला. आंतील लोक कापून काढिले. असी आंतील लोकांची मारगिरी कधीं पाहिली नाहीं. असें असतां आपलेकडील लोकानी फार निकड करून हला चढविला, मोठे शर्तीनें किला घेतला. श्रीमंत राजश्री नारायणरावसाहेव थोरले श्रीमंताचे पाठीमागें उभे होते. त्यास उजवे हाताचे मणगटास मण्याजवल वरील अंगें गोली लागली ती वरून कातड्यातून आंतील आंगें नाडीजवल पार जाली. हाड व सिरा काही जायां जाल्या नाहींत. जखमा हलकी आहे. भगवंतें मोठी खैर केली. वहुत लोक श्रीमंताजवल उभे होते व गोल्या दाट येऊन पडत असत, परंतु यांसच गोली लागली. श्रीमंताचा पुण्य प्रताप थोर, तेणेकरून मोठी खैर जाली. परंतु श्रीमंत नारायणराव यांणीं कांहीं काहिली केली नाहीं. दम हिंमत धरून वसले होते. गोटांत आले. जखम सेकून बांधिली. जर हाड व सिरा सांपडल्या असत्या तर फार हैराण होते. परंतु हलकी जखम लागली. भगवंत त्यास रक्षिणार इतकेंच खरें ! सविस्तर स्वामीस कलावें. आपलेकडील हजार माणूस हल्याचे दिवसीं जखमी व शंभर ठार याप्रमाणें जालें. परंतु असा हला करून किला कधीं घेतला नवता. विदित जालें पाहिजे हे विज्ञापना.

¶*The storming of the hill-fort of Nijgal directed by the Peshwa in person is reported in graphic details. The Peshwa's brother received a bullet wound on the wrist which luckily happened to be not very serious.*

---

*No. 207]* *[1-5-1770*

पो छ १९ मोहरम सबैन
वैशाख हा कासंबेग सांडणीस्वार.

श्री

सेवेसी विज्ञापना. ता। छ ४ मोहरम पावेतों मु॥ निजगल कुशल असो विशेष. किले निजगलास राजश्री गोपालराव येऊन वैसले होते, त्याच्याने शेवट न जाहाला. याजकरिता खासा रावसाहेव आले. पाच सात रोज मोर्चे लाविले होते. हेदराकडील पालक लेक कुमकेस आला होता याजमुळे किल्यात

अवसान धरून राहिले. काल इंदुवारी प्रात:कालीच हला केली. मोठा मार परस्परें जाला. श्रीमंत राजश्री नारायेणराव यास उजवे हाताच्या मणगटास, गोळी चाटून गेली. जखम हलकी आहे. भगवंते खैर केली. चिंता नाही. आपाजी मुद्दे, गंगाराम पिसाल यांस जखमा लागल्या. भारी आहेत. वाचता दिसत नाही. पोखरगीर गोसावी व मिराजी सरनोबत कासी बलाल याजकडील हे ठार जाहाले. हजार बाराशे माणूस जखमी जाहाले. दोनतीनशे पावेतो ठार जाहाले. किला खालील दोन तबके घेतली. बाले किला मात्र राहिला आहे. खाली चौक्या बसल्या आहेत. किल्यावर पाणी नाही. येक दोन रोज लागतीलसे दिसते. हैदरखानाची लडाई व्हावी त्या लडाईत जे माणूस जखमी ठार व्हावे तितके माणूस या पाहाडापासी जाले. परंतु भगवंते खैर केली. किलाहि हस्तगत लौकरच होईल. महर्गता सर्वा गोष्टी जाहाली आहे. पैका फर्जेहि मिलत नाही. स्वामीस यैवजाविसी लिहिले आहे, त्याजवर भिस्त आहे. हैदरखानाचा पालक लेक या किल्यास कुमक आला, याजमुळे अवसान धरून आजपावेतो लडला. कलावे म्हणून लिहिले आहे. त्रिंबकरावमामाचा छावणीस राहावयाचा निश्चये जाला आहे. आपणाकडील बाजीपंत राहातील. श्रीमंत ग्रहणास कोपलाजवल तुंगभद्रेवर सुवर्णतुला करणार. साहित्यास विठलपंत वकिनीस रवाना होणार. बाले किल्यावर पाणी नाही. सातआठसे माणूस बाले किल्यास गेले आहे. कौल मागत नाही. मागितला तत्राप जिवंत सोडीत नाही. कापून काढणार. शेदीडशे माणूस दोन तबकात तिकडील कापून काढिले. काही धरून आणिले आहेत त्याची डोकी मारणार. रामबाण तोफ काल हल्यासमयी फुटली सिन्या हा. तोफ फार चांगली होती. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. स्वामीनी कृपापत्र छ १६ जिल्हेजचे पो ते छ २९ मिा पावले. तात्याचे पत्र प्रविष्ट केले हे विज्ञापना.

¶*The letter describes the attack on Nugal led by the Peshwa in person and in which Narayanrao received a wound on his right wrist. "The Peshwa desires to get himself weighed against gold on the Tungbhadra on the occasion of the eclipse" says the letter*

---

*No. 208]* *[5-6-1770*

पो छ २० सफर ईहिंद.

**श्री**

श्रीमंत राजश्री पंत प्रधान

स्वामीचे शेवेसी

विनंती सेवक नारो बाबाजी साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ १० सफरपावेतो स्वामीचे कृपावलोकनेंकरून सेवकाचें वर्तमान येथास्थित असे.

यानंतर हुजूरचें आज्ञापत्र सादर जालें, तेथें आज्ञा कीं नारंज तोफ सरकारची पंचरसी जायां जाली ती बंकापुरांत ठेविली आहे, तिचे पंचरस काढून दुसरी तोफा ओतावयाची आहे, किल्यांत ठेवावयाची उपयोगी नाहीं, याजकरितां तुम्हास लिहिलें असे. तरी तोफ पुणियास राजश्री बाळाजी जनार्दन याजकडे पत्र पावतां तरतूद करून रवाना करणें म्हणोन आज्ञा. त्यास, हुजूरचें आज्ञापत्रं आले तेव्हां नारंज तोफ पंचरसी जाया जाली, किले मजकुरी असेलच, ते पुणियास रवाना करावयास किले मजकुरीं गाडा बैल वगैरे सरंजाम नाहीं तो हुजूरून पाठवावयाची आज्ञा करून तोफ न्यावयाची आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत म्हणोन हुजूर विनंतीपत्र सरकारच्या जासुदाबरावर सेवेसी पाठविलें आहे. त्यास, किले मजकुरी नारंज तोफ जायां जाली सरकारची आहे ते पुणियास रवाना करावी लागती, तरी तोफ केवढी, किल्यांत कोणते जागा आहे, जाया जाली आहे कीं बार निघतात, चांगली आहे, येविसीचा शोध मनास आणून लिहोन पाठवणे म्हणोन किले मजकुरीं पत्र लिहिलें होतें. किल्याहून बलवंतराव बच्याजी व सिवाजी गणेश याचें उत्तर आलें कीं, कवताळ भन येथून रामबाण तोफ किल्यास आली, ती पातशहा बुरुजावर ठेविली आहे. तोंडास थोडी जाया होती, त्यास बांगडी मातबर देऊन पहिलीच तैयार केली आहे. दररोज दाहापंधरा वीस परियेंत बार काढावयाचे उपयोगाची आहे. श्रीमंत कैलासवासी नानासाहेबीं पांचसात तोफा कर्नाटकच्या स्वारीहून किल्यास पाठविल्या होत्या, त्या तोफेत येक नारंज तोफ मातबर होती. ते व आणखी तोफा हैदरखान याजकडे किला होता ते वेलेस नेल्या. त्यापैकीं येक तोफ सिद्दी बुरजावर आहे. इचे नांव गंगाप्रसाद. हीं तोफ तोंडी थोडीसी जाया आहे. बांगडी बसऊन मजबुत केली आहे. चांदरातीस ती तोफ सोडीत असतो. निकडीस दाहा बारा बार निघतील. आणखी येक तोफ पंचरसी पक्के तीन सेर गोल्याची ते सावनूरची पाडाव आहे. हैदरखानानें आणिली होती. येणेप्रमाणे पंचरसी तीन तोफा किल्यात चालत्या आहेत. याजसिवाय पंचरसी तोफा किल्यात नाहींत. या खेरीज बांगडी व विडी पांचसात लाहाण थोर तोफा किल्यांत आहेत म्हणोन लिहिलें आहे. पंचरसी नारंज तोफ जायां जाली. किल्यांत कोणी नाही. फुटक्या दोन तोफा रेहकल्याप्रमाणें पंचरसी किल्यांत आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Naro Babaji, who had been asked to get the gun Naranj* (नारंज) *sent to Poona to be recast, writes to the Peshwa that inquiries for the gun at Bankapur elicited the information that it was taken away by Haidar when he occupied Bankapur.*

No 209] [12-5-1770

पो छ १९ मोहरम सबेन
वैशाख हा लालखान
साडणीस्वार.

श्री

सेनेसी विज्ञापना. काल इदुवारी आनसीचे दाहा घटका रात्रीस श्रीमत राजश्री नारायेणराव मुहूर्तेकरून पाव कोसावर जाऊन राहिले. येका दोहो रोजीं श्रीमत सौभाग्यवती मातुश्री बाईचा मुहूर्त आहे. मग निघोन पुण्यास जातील हा डौल केला आहे. परतु फारा गोष्टीने मातबर फौज व तोफखाना सरदार चागले योजून ठेऊन आपण उभयेता बरोबरच पुण्यास येतीलसे वाटते. पुण्यास जावयाची तो मर्जी फार आहे. तूर्त हैदर नाईक श्रीरगपटणचे आलीकडे आहे. छावणीस राहतात असें जाहल्यास खडणी करावयाचा पैगाम लागेल. परतु खडणी करावयाची मर्जी नाहीं. नस्तनाबूद करून टाकावा हा मनसबा आहे. पुढें होईल तें लेहून पाठऊ. मागे स्वामीचीं येकदोन पत्रे आलीं, तीं पावोन सतोष जाहाला. याचप्रकारे साभाल जाला पाहिजे. छावणीस सरदार ठेवावयाचे धद्रच आहे. मनसबा उरला नाही. मामाचा आग्रह न राहवे ऐसे नाहीं, परतु मनोदयानरूप साहित्य जाल्यास राहावे असे आहे. तसी मर्जी येजमानाची नाहीं, याजमुळे बनत नाही. सेवट कसा होईल तो पाहावा. यातील बारीक बारीक मनसबे राजश्री तात्यास विदित आहेत. तात्यानी स्वामीस लिहिले असतील त्याजवरून विदित होतील. प्रस्तुत गकारनामकाचे व येजमानाचे रहस्य मोरोबा आवाने केले आहे. परस्परे आइक्य भावसा दिसतो; मग अतर्याम उभयेताचे कसे असतील ते त जाणोत. लोकिकीं तर चागले दिसो लागले त्याजवरून लिहिलें आहे हे विज्ञापना.

¶*The news about Narayanrao starting back on an auspicious day, about Haidar being in the vicinity of Seringapatam and about Trimbakrao Mama being left in command is given in this letter*

---

No. 210] [25-5-1770

पो छ २८ मोहरम सबेन
जेष्ठ हा साडणीस्वार.

श्री

विज्ञापना. राजश्री त्रिंबक राऊ मामा छावणीस ठेविले. राजश्री मुरारराव सेनापति, राजश्री गोपालराव, रास्ते आदीकरून पचवीस हजार फौज ठेविली.

खर्चाची वेगमी पुण्याचे ऐवजावर; त्यास, आपणाकडून ऐवज आला म्हणजे रवाना करूं. छावणीस फौज चांगली राहिली. कामकाज होणें धण्याचा प्रताप. हें वर्तमान येक दोन पत्रीं लिहिलेंच आहे. हिंदुस्थानांत राजश्री रामचंद्र गणेश याची व नवलसिंग जाटाची लढाई जाली. तीन प्रहरपर्यंत मथुरेजवळ युध जालें. जाटाचे फौजेस सिकस्त खादली. च्यार पांच हजार माणूस जाटा-कडील रणास आले. चाळीस तोफ व हती वीसपर्यंत व च्यार पांच हजार घोडे वगैरे लस्करांत आले. हें वर्तमान पुण्यास आलेच असेल. येथें पत्रें आली, त्यांत विशेष मजकूर आढळला तो लिहिला असे. आपलेकडील हजार बारासें माणूस ठार व जखमी मिळोन व आठशें घोडे ठार याप्रमाणें जालें. मोठी निकडीची लढाई होऊन फते आली. कळावें. श्रीमंत येथून कूच करून कपाटसंगमास ग्रहणाकरितां जात आहेत. तेथें तुला जाली म्हणजे कूच करून दरमजल पुण्यास येणार. जेष्ट वद्य पंचमीचा मुहूर्त आहे. घडेल तें खरें. अधिकोत्तर कांहीं लिहिजेसें नाही. सेवेसी. श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Hari Ballal writes to Nana Fadnis that it has been decided to leave Trimbakrao Pethe in command of the Karnatak force with Gopalrao Patwardhan and Murarrao to help him. He also reports the magnificent victory over Navalsing Jat gained by Ramchandra Ganesh near Muttra.*

---

*No. 211*] [*31-5-1770?*

घडणी रुमाल न. ९६९.

छ ७ सफर जेष्ठ सन सबैन.

**श्री**

यादी राजश्री त्रिंबकरावजी यासी पत्र की, चिकबाळापूरचे संस्थानिक, आम्हीं त्या प्रांतीं आसता, आले होतेत. त्यांनीं आपल्या संस्थानविशीं विनंती केली होती त्यास करार या प्रकारचा जाहाला की, नंदीगडावितिरिक्त संस्थान संपूर्ण त्यांस द्यावें. ते सांप्रत लाख रुपये नजर देतात व पुढे साळावाद खंडणी लाख रुपये देत जावी येणेप्रमाणे करार जाहला होता. हालीं सांप्रत त्यांजकडून वेंकटाचार्ये आम्हाकडे आले. त्याणीं सांगितलें की, या कराराप्रा राजश्री त्रिंबकरावजी यांसी पत्र द्यावें. आम्ही आवघे संस्थानिक त्यासी रुजू होऊन याप्रा करार त्यांस समजाऊन येवजाची निशा करू. त्याजवरून हे पत्र तुम्हास लिहिले आहे. तरी या कार्यासाठी मारनिले तुम्हाकडे येतील तरी हे कार्ये करून देणे म्हणून पत्र—१

6467

No 215] [16 6 1770]

श्रीगणराज

राजश्रिया विराजित राजमान्य

राजश्री नाना फडणीस स्वामीचे सेवेसी

पो मोरो बलाल कृतानेक नमस्कार विनती उपरी. येथील कुशल ताा छ २१ सफरपावेतो वर्तमान येथास्थित असे विशेष. आपला निरोप घेऊन मिरजेस आलो. त्याजवर आपणाकडे येक दोन पत्रे पाठविली. तदोतर श्रीमतहि स्वारीस निघाले, आम्हास बलाऊ पाठविले आम्ही गलगलियाच्या मुकामी जाऊन भटी घेतली. तेथून बराबर गलगनाथपर्यंत गेलो. तीर्थस्वरूप राजश्री गोपालराव दादा श्रीमताचे भेटीस आले. तेथून निरोप घेऊन घरास येणार होतो, त्यास तीर्थस्वरूपास सावनूर प्राती राहावयाची आज्ञा जाहाली. मजला तैसेच बराबर घेऊन गेले. शरीरी समाधान नवते. पुढे कर्नाटकात गेलियावर दिवसेंदिवस अधिकच अस्वस्थता होत गेली. सर्व मजकूर राजश्री हरिपंत तात्यानी आपणास श्रुत केला असेल. शरीरी अस्वस्तता आहे. तीर्थस्वरूप छावणीस राहिले यामुळे तिकडील खर्चाची बेजमी करून पाठविली पाहिजे व लोकाच्या वराता लस्करातून येतात त्याची वाट केली पाहिजे यामुळे मी येथे राहिलो. ऐशास बापूजी बलाल आपणाकडे येऊन ऐवजाकरता विनती करितील त्याप्रमाणे निर्वाह करून आपण दिला पाहिजे सालमजकुरी सरदारीत काही बाकी राहिली नाही. बालापूर, हरिहरची पे ऽ * नाही. सावनुरप्राती हैदरनाइकाचा उपद्रव, असे असून पैका पाठविला पाहिजे. पडली घोडी म्हणता फारच पेच पडला आहे आपली कृपा आहे त्यापक्षी आपणच निभावणार आहेत. पहिले दोन लक्ष तो पावते केलेच असतील. हालीचे तीन लक्ष कृपा करून देविल्यास सैन्यातील स्वस्थता होईल विदित हाय हे विज्ञापना.

¶*Moro Ballal Patwardhan requests Nana Fadnis to send sufficient amount of money to enable him to liquidate the arrears of the troops on duty in the Karnatak*

---

No 216] [11-7-1770

पो छ २ रबिलाखर
इहिदे.

श्रीगजानन

श्रीमत राजश्री नाना

स्वामीचे सेवेसी

विनती सेवक शिवाजी गोपाल कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत आषाढ वद्य ४ जाणोन स्वामीनी कृपा करून स्वकीये कुशल

लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. राजश्री रावो हरि यास स्वामीचें आज्ञापत्र येणें म्हणोन आलें, त्याजवरून यांची रवानगी करून सेवेसीं पाठविले आहेत. या प्रांतीचे व सेवकाचें साकल्य निवेदन करितील त्याजवरून सेवेसीं विदित होईल. स्वामीचे आज्ञेप्रमाणेंच वर्तणूक क़रीत असों; सारांश, मी बहुताचा वाईट जाहलों आहें, यामुळें बहुत लोक स्वामीचे मर्जीत आंतर पाडावयाच्या साधनांत आसतील; परंतु पूर्णाभिमानी स्वामी आहेत. आन्य दैवत जाणत नाहीं व अमार्गे चालणार नाहीं, हें ध्यानांत दृढ आसावें. स्वामी सर्वज्ञ आसोन विस्तार ल्याहावासा काये आहे? वरकड सन सबैनचा कागदपत्र तयार करावयास सुस्ती करीत नाही, हैदरखानाचा मुल्क व सरकारचा मुल्क जवळजवळ. तिकडून जमाव सरहदसे येऊन सरकारच्या मुल्कास उपद्रव करावयाच्या विचारात ते, यास्तव सरकारच्या मुलकाचें रक्षण व्हावयाकरितां सिबंदी जाजती ठेऊन जागांजागाचे बंदोबस्त करून रखवालीस सुभेदार आम्ही नेहमी धारवाडासच वैशाखपर्यंत गुंतलों. त्यानंतर येथें नवलगुंदीं वैशाखांत आलों. येथील कामकाज जमाबंदीचे उरकले. देसायाकडून येवजाचा निर्गम होणें, त्यास दिवसगत लागली, तोहि उलगडा होत आला. येक दोन दिवसानी गदगास जाणे होईल. कोपळ गदगचा बंदोबस्त करून माघारे धारवाडास येतील. हुजूरून तिन च्यार हजार फौज आली याजकरितां प्रस्तुत फारसी गडबड नाहीं. येंदा लस्करची पायमाली व नापीक जाहाल्याकरितां वसुलास ढील पडली. रयेतहि कानडे नातवान आणि थोटें. यास्तव युक्तीनें पेस्तरची लावणी होऊन वसूल घ्यावा लागतो. सख्ती जाहाल्यास पळतात, येसें वर्तमान आहे. प्रस्तुत तमाम लावण्या होतात यास्तव वसूल तटला आहे. पेरण्या जाहाल्यावर वसूल चालता होईल. वसूल पडोन कमाविसदाराचे उलगडे पडावयास आस्विन कार्तिक पाहिजे. सेवेसीं श्रुत होयें हे विज्ञापना.

¶*Jivaji Gopal impresses on Nana Fadnis the necessity of maintaining a strong force to defend the frontier towns against attacks from Haidar.*

---

*No. 217*] [*October 1770?*

## श्रीगणराज

सेवेसी गोपाळ गोविंद कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. गुरुवार दोन प्रहर तीन घटका स्वामीचे कृपेकरून वर्तमान येथास्थित असे विशेष. येलवंतीचें ठाणें गोली न वाजतां हस्तगत जालें. आंतील प्यादे हत्यार बाइकासुद्धां

---

१ दुर्मद, उद्धट.

जा(तील) तेथे 'पोह्चाऊन द्यावयाचा करार आहे. त्या [ फाटलें. ] कार्दाळे. पोंहाचाऊन देतो. [फाटले. ] लागेल म्हणून आज्ञा. त्यास तळकल घ्यावयाचें आहे यांत गुंता नाही, परंतु दोन दिवस जावयास येक दिवस तेथें च्यार दिवस जर आपण गळगनाथापासींच मुकाम करून राहिले तरी यावयास लागतील असें आहे. इतकियांत हरपनहल्लीवाल्यानी लबाडी केली तरी पारपत्य जालें पाहिजे. तोफा सेवकासमागमें; दिवसगत लागल्यानें स्वामी शब्द ठेवितील की, हे माहीत असतां उमजून लिहिलें नाहीं. यास्तव लिहिले आहे. रातोरात उत्तराची आज्ञा करावी त्याप्रमाणें तळकलास जावयाची आज्ञा जाली तरी जाऊं. आजी तळकल न घेतले तरी येतेसमई घ्यावें लागेल. तेवढें ठाणें राहिल्यानें वाईट, परंतु आजी गेल्यानें पुढील मनसब्यास पेच पडेल. राजश्री सुभानजी घोरपडे याही घेतली आहे. राजश्री रामचंद्र * * *

* * * * * *

पाठवितो. बहुतेक चिठीनें ठाणें देतील. तेथेंही प्यादे येलवंतीचे आहेत. न दिल्हे तरी उपाये नाहीं. आम्हांस समजलें त्याप्रमाणें लिहिले आहे. स्वामीची आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक घडेल. आम्हाकडे व विसाजी नारायेण याजकडे शब्द न यावा. सेवेसी विदित होये हे विज्ञापना.

¶*Gopal Govind writes how the place Yelvanti was captured by him and proposes to capture Talkal and other places.*

---

*No. 218]* *[19-11-1770*

## श्रीसांब

श्रीमंत राजश्री पंतप्रधान
स्वामीचे सेवेसी

पोष्य भगवंतराव बापूजी कृतानेक विज्ञापाना ऐसीजे. राजश्री त्रिंबक सूर्याजी यास स्वामीनी सांदे प्रांत वगैरे किलेकोट हैदर नाईक याजकडील घ्यावयास रवानगी केली आणि मशारनिलेस जामीन असावा म्हणून आज्ञा केली. त्याजवरून मशारनिलेस आपण जामीन असों. किलेकोट घेऊन सरकारांत न देत, बदमामली करितील तर आपण हजर करून देऊं. छ १ शाबान मुा इहिदे सबैन मया व अल्फ. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Bhagvantrao Bapuji stands surety for Trimbak Suryaji who was deputed by the Peshwa to capture the district of Sondha and its forts from Haidar.*

श्री

तीर्थस्वरूप राजश्री काका
वडिलाचे शेवेसी

आपल्ये केसो विश्वनाथ टिळक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ताा मार्गसीर्ष शुध ४ पावेतो मुाा श्रीकोल्हेश्वर कृष्णा दक्षणतीर ताा सातारा प्रांत कराड येथें सैन्यात आपले आसीर्वादे सुखरूप असो विशेष. इकडील वर्तमान यथास्थित असे. श्रीमंतास किंचित्समाधान नव्हते म्हणून दोन च्यार मुाा जवळ जवळ जाहली. प्रस्तुत चांगले आरोग्य आहे. आतां दरमजल कर्नाटक प्रांती मनोलीचे रोखें निघोन जाणार. उदईक राजश्री मुधोजी भोसलेहि याच मुकामी येऊन भेटी होणार. राजश्री त्रिंबकराव मामा याणी किले गुरुमकोंडा सरकारांत घेतला पुढें तिर्पतीकडे स्वारीस गेले. श्रीव्यंकेटेशदर्शन घेऊन कांहीं संस्थानिकापासून खंडणीदंडणी घेऊन मागती श्रीरंगपटण प्रांती येतील. इकडून श्रीमंतहि जातील तेसमई खंडणीदंडणीचा ठराव होणे तो होईल. प्रस्तुत मजकूरच आहे. या प्रांती धारण अस्त्यापदार्थे बरीच आहे. लशकरामुळें महर्गता तीन च्यार पायलीची आहे. पेशजी पर्जन्य पडिला होता तोच. दुसरा पडिला नाहीं. येणेप्रमाणें वर्तमान आहे. आपणाकडील सविस्तर आसिर्वाद पत्री ल्याहावयासी आज्ञा केली पाहिजे. सैन्यांत राजश्री पांडुरंगपंत दादा व राजश्री गोविंदपंत तात्या आहेत त्याणी पत्रे लिाा आहेत त्याजवरून कलेल. बहुत काये लिहिणें कृपा लोभवृध्दि केली पाहिजे हे विनंती.

हेाा राजश्री आपाजीपंत यांसी नमस्कार. लिाा परिसोन लोभ करून पत्री लेखन करीत असिले पाहिजे. हे विनंती.

हेाा राजश्री गणेशपंत मराठे यांसी साष्टांग नमस्कार विनंती उपरी. लोभ करून पत्र पाठऊन संतोषवीत असिले पाहिजे. दाजी गंगापुरी गेला म्हणून आमचा अविस्मर होईल तरी होऊं न द्यावा. लोभ करीत असावें. लोभाचें लक्षण जे कागदीपत्रीं स्मरण करून समाचार वारंवार घेतल्याने बहुत हर्ष होतो. बहुत काये लिहिणें. लोभ करीत असिलें पाहिजे हे विनंती.

मातुश्री मावसीबाई यांसी साां नमस्कार प्रविष्ट करावे.

¶*Keso Vishvanath writes from Kolheswar about the Peshwa's recovery from illness and his intention to proceed to Karnatak.*

जा(तील) तेथे *पोहचाऊन द्यावयाचा करार आहे. त्या [ फाटलें. ]
पोंहोचाऊन देतो. [फाटलें.] लागेल म्हणून आज्ञा. त्यास तलकल
आहे यांत गुंता नाहीं, परंतु दोन दिवस जावयास येक दिवस
दिवस जर आपण गळगनाथापासींच मुकाम करून राहिले तरी
लागतील असे आहे. इतकियांत हरपनहल्लीवाल्यानीं लबाडी केली तरी
जाले पाहिजे. तोफा सेवकासमागमें; दिवसगत लागल्यानें स्वामी शब्द
की, हे माहीत असतां उमजून लिहिलें नाहीं. यास्तव लिहिलें आहे.
उत्तराची आज्ञा करावी त्याप्रमाणें तलकलास जावयाची आज्ञा जाली तरी
आजी तलकल न घेतलें तरी येतेसमई घ्यावें लागेल. तेव्हां ठाणें रा
वाईट, परंतु आजी गेल्यानें पुढील मनसब्यास पेंच पडेल. राजश्री
घोरपडे याही घेतली आहे. राजश्री रामचद्र * *

* * * * *

पाठवितो. बहुतेक चिठीनें ठाणें देतील. तेथेंही प्यादे येलवंतीचे
दिल्हे तरी उपाये नाहीं. आम्हांस समजलें त्याप्रमाणें लिहिलें
आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक घडेल. आम्हाकडे व विसाजी
शब्द न यावा. सेवेसी विदित होये हे विज्ञापना.

¶*Gopal Govind writes how the place Yelvanti was c...*

तुमचे स्वरूपानसार ऊर्जित केले जाईल. कलम १

तुम्हाकडे कमाविशीनें ठेविला जाईल. कलम. १

आम्हास समागमें मसलतीस कितेक लोक चाकर व कुमकी मिळतील त्यास काही बक्षीस द्यावें म्हणोन. त्यास तुम्ही मनस्वी वचनें कोणास न देणें. सरकारातू(न) चाकरी पाहून कार्याकारण रदवदली आइकिली जाईल. कलम. १

सदरहूप्रमाणे पाच कलम लिहिल्याप्रमाणें मशारनिलेचें नांवे सनद देणे.

छ ३ शाबान इहिदे सबैन
मार्गसीर्ष

सनद लिहिणे

¶*Sanad to be granted to Trimbak Suryaji who has expressed readiness to wrest the Canara District from Haidar*

---

[1770?

No. 220] [21-11-1770

श्री

यादि निसबत राजश्री त्रिंबक सूर्याजी सुाा इहिदे सबैन मया व अलफ. स्वामींनी आज्ञा केली कीं, तुम्ही यामागें कामेंकाजे केलीं तीं देखिलीं नाहीं. हाली रुबेरू करून दाखवणे म्हणोन आज्ञा जाली. आज्ञा ते शिरसा. शेवकाची चाकरी मेहनत, खावंदाचा पुण्यप्रताप येश आहे; तरी कृपाळु होऊन सेवकास सनदा द्याव्या. संवदे प्रांतीची निमा वरघाट आहद सामराणी तहद बांधारी कोकणपटी किले मर्दनगडपासून गोकर्ण माहाबलेस्वर होनावरपर्यंत, ठाणीं व मुलुक

| | |
|---|---|
| तुमचें स्वरूपानसार ऊर्जित केलें जाईल. कलम १ | तुम्हाकडे कमाविशीनें ठेविला जाईल. कलम. १ |
| | आम्हास समागमें मसलतीस कितेक लोक चाकर व कुमकी मिळतील त्यांस कांहीं बक्षीस द्यावें म्हणोन. त्यास तुम्ही मनस्वी वचनें कोणास न देणें. सरकारांतू(न) चाकरी पाहून कार्याकारण रदबदली आइकिली जाईल. कलम. १ |

सदरहूप्रमाणें पांच कलमें लिहिल्याप्रमाणें मशारनिलेचें नावें सनद देणें.

छ ३ शाबान इहिदे सबैन
मार्गसीर्ष

सनद लिहिणे

¶*Sanad to be granted to Trimbak Suryaji who has expressed readiness to wrest the Canara District from Haidar.*

---

*No. 221*] [*1770?*

श्री

राजश्रिया. विराजित राजमान्य राजश्री तात्या
स्वामीचे सेवेसी

पोष्य सदाशिव मल्हार सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेख करीत असिले पाहिजे विशेष. महमद इसप याजविसी जे बोलणे ते आपल्यासी बोलला आहो, तरी हरयेकविसी यांचा गौर करीत जावे. रोजमरा वरचेवर पावऊन यांस आडचण कोणेविसी न (पडे) ते करावे. बहुत काये लिहिणे कृपा केली पाहिजे. हे विनंती.

¶*Sadashiv Malhar writes to Haripant Tatya asking him to promote Muhammad Isaf into service and pay him regularly. The writer is probably one of Mahadji Sindia's subordinates.*

श्री

*यादि निसबत राजश्री त्रिंबक सूर्याजी सुा इहिदे सबैन मया व अलफ. स्वामींनी* आज्ञा केली कीं, तुम्ही यामागें कामेंकाजें केली तीं देखिलीं नाहीं. हालीं एवेरू करून दाखवणें म्हणोन आज्ञा जाली. आज्ञा ते शिरसा. सेवकाची चाकरी मेहनत, खावंदाचा पुण्यप्रताप येश आहे; तरी कृपाळु होऊन सेवकास सनदा द्याव्या. सनदे प्रांतीची निमा वरघाट आहद् सामराणी तहद् बाधारी कोंकणपटीं किले मर्दनगडपासून गोकर्ण माहाबलेस्वर होनावरपर्यंत किले व ठाणीं व मुलुक याच्या सनदा द्याव्या. स्वामीच्या पुण्यप्रतापें सदरहू प्रांतात सरकारचा अमल होईल. त्यासी कर्जवाम करून मसलत सुरू केली पाहिजे. त्यासी येथास्थित सरकारचा अमल जाल्यानी दरम्यान कोण्ही रसदा व्याजयास सिद्ध होतील ते न व्हावें. किले व प्रांत सेवक श्रमसाहस करून सोडवितो तो तालुका सेवकाचें तार्बीनात असावा. जो कोण्ही साहेबकामावर उभा राहील, श्रमसाहस करील त्यास सेवक वचन देईल. धंदे रोजगार व बक्षिसे वगैरे देऊन मसलत पुरी करून कार्यसिधि जाहलियावर स्वामींनीं सेवकाचें वचन पार पाडणार स्वाम धणी समर्थ आहेत. भाऊबंद, पुत्र, पुतण्ये व सरदार व कारकून सुधा मसलतीस जातो. मसलत सिधीस गेल्यानतर सर्वेवाचें चालविणार खावंद समर्थ आहेत.

सदर्हूपैकी कलमें

सनदे वरघाट अहद् साम्राणी बाधारी कोंकणपटी किले मर्दनगड यापासून गोकर्ण माबलेश्वर होनावरपर्यंत किले व ठाणीं मुलुक जो हेदरखान याचा मुलुक असेल त्यात स्वारीसिकारी करून किले व मुलुक काबीज करावा. मसलतीस खर्च होईल तो, सरकारचा व हेदरखानाचा विवाड आहे तों पा सदरहू मुलुकावर फेडावा. सरकारात मागों नये. कलम. १

श्रमसाहस करून तुम्ही मसलत सरकार नक्ष राखून शेवटास नेल्यास

सदरहू मुलुकपैकी किलेजात व जमीदोज ठाणीं सुटतील व तालुका सुटेल त्यापैकीं किले व जमीदोज ठाणी यात माणसें घालून बंदोबस्त राखावा. ठाणीं, किले व तालुका सरकारात यावा. कलम. १

हेदरखानाचा सल्लख जाहालाच, तहात सदरहू किले जात वगैरे व तालुका सोडण जाहाल्यास सोडावा लागेल. कदाचि(त) सलूख होऊन तालुका व किल सरकारात राहिले तर किले खेरीजकरून तालुका

| | |
|---|---|
| तुमचे स्वरूपानसार ऊर्जित केले जाईल. कलम १ | तुम्हाकडे कमाविशीनें ठेविला जाईल. कलम. १ |
| | आम्हास समागमें मसलतीस कितेक लोक चाकर व कुमकी मिळतील त्यांस कांहीं बक्षीस द्यावें म्हणोन. त्यास तुम्ही मनस्वी वचनें कोणास न देणें. सरकारांतू(न) चाकरी पाहून कार्याकारण रदबदली आइकिली जाईल. कलम. १ |

सदरहूप्रमाणें पांच कलमें लिहिल्याप्रमाणें मशारनिलेचें नावें सनद देणें.

छ ३ शाबान इहिदे सबैन
मार्गसीर्ष

सनद लिहिणे

¶*Sanad to be granted to Trimbak Suryaji who has expressed readiness to wrest the Canara District from Haidar.*

---

*No. 221]* *[1770?*

श्री

राजश्रिया॰ विराजित राजमान्य राजश्री तात्या
स्वामींचे सेवेसी

पोष्य सदाशिव मल्हार सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेख करीत आसिले पाहिजे विशेष. महमद इसप याजविसी जे बोलणे ते आपल्यासी बोललों आहो, तरी हरयेकविसी यांचा गौर करीत जावे. रोजमरा बरचेवर पावऊन यांस आडचण कोणेविसी न (पडे) ते करावे. बहुत काये लिहिणे कृपा केली पाहिजे. हे विनंती.

¶*Sadashiv Malhar writes to Haripant Tatya asking him to promote Muhammad Isaf into service and pay him regularly. The writer is probably one of Mahadji Sindia's subordinates.*

6475

श्री

विज्ञापना. इकडील वर्तमान दर रवानगीस लिहीतच गेलों. पटणाजवळ आले. हैदर झाडींत. खडणीचें राजकारण म्हणावे तर पुण्याचे बोलणे. त्यास जरब म्हणावी तर ठाणी घेतली. मुलकाची खराबी फार जाली. परंतु दोन स्थलं मातबर, त्यात यकाचे गळीं पडते म्हणजे लौकर निकाल पडता. गळीं पडण्याचा प्रकार इकडून मलमलींत, कारण मजबूद स्थलं तोफखाना आपला थोडा, यामुले अनमान दिसतो. हैदरखान चित्तात आणितो कीं महिना दोन महिने हे मुलकात धामधूम करितील अखेर देशास जातील. मग जल्दी का करावी? असे दोहीकडील भाव आहेत. मसलत लाबणीवर पडलिसी दिसते. श्रीकृपेकडून घडेल ते खरें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. नकारखाना खासगीकडे सांगितला. तिकडेच ठेवावयाची मर्जी. मी दोन तीन वेळ विनती केली परतु मर्जी नाहीं. मग आग्रह कशास करूं? हे विज्ञापना.

¶*Hari Ballal writes that Haidar is refusing to come to terms though the army has by now occupied most of the Mysore territory and is at the gate of the capital itself He expects to reoccupy the lost territory when the Maratha forces retire for the monsoon*

---

No. 223] [25-1-1771

पो छ १० जिल्हेज

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
बाबूरावजी स्वामीचे शेवेसी

पोष्य गणेश शकर कृतानेक साष्टाग नमस्कार विनती. येथील कुशल तागायत छ ८ सवाल मुकाम पुणे सुखरूप असो विशेष. साप्रत आपणाकडून पत्र येऊन वर्तमान कलत नाहीं तरी येसें नसावे. सदोदित पत्र पाठऊन संतोषवीत आसिलें पाहिजे. यानंतर इकडील वर्तमान तरी खासा स्वारी [फाटले. एक ओळ.] गेली. तेथोन फोजा राजश्री मलबा बापू व कृष्णराव बलवत याजबरोबर दाहा हजार व तोफखाना देऊन राजश्री त्रिबकराव विस्वनाथ याजकडे रवाना केली. खासा स्वारी माघारे पुणियांस माघ शुा पंचमीस दाखल जाहाली. शरिरास औषध घेऊन उपाये येथास्थित करणार याप्रमाणें आहे व कर्नाटकचें वर्तमान तरी राजश्री त्रिबकराव मामानी गुरुमकुडा

घेऊन श्रीवेंकटेशास जाऊन बेंगरूळचे सुमारे आले आहेत. *हैदरखान पटणांत आहे. गोपाळराव गोविंद हे आदवानी व वल्हारीकडे त्यांच्या सरंजामांत खंडण्या आहेत त्या घ्यावयाबद्दल आले होते. त्यांस शरीरीं समाधान नाहीं म्हणून सडे मिरजेस आले, तेथें देवाज्ञा जाली. त्याची फौज वामनराव घेऊन राजश्री मामाकडे जाणार व मल्बाहि मागाहून पावलेच असतील. याउपरी मग तिकडे हैदर नाईक याजवर जाणार. खंडणीचे जाबसालाबद्दल आपाजीराम आला आहे. परंतु खंडनी मर्जीप्रमाणे होत नाहीं म्हणून राहिली. कळावें. राजश्री बाळकोबा तात्याहि, पौष वद्य अमवाश्ये देवाज्ञा जाले व विष्णु माहादेव पंडित व आबाजी पंत फडके हेहि देवाज्ञा जाले. याप्रमाणें चांगलेच लोक गेले येसे इकडील वर्तमान आहे. कळावें राजश्री निळो गोपाळ याजकडे आमचा यैवज येणें आहे तो राजश्री माहादाजीपंत यास ठाऊक आहे. त्याणीच दिल्हा आहे. तो उगवला पाहिजे, यास्तव पेसजी आपणांस दोन तीन पत्रें पाठविली आहेत, परंतु उत्तर आलें नाहीं. तरी त्याचा यैवज बाळाजी गोविंद याजकडे वरात तीन हजाराची होती ती राजश्री चितो अनंत याणी त्याजकडे पाठविली होती, परंतु त्याजकडून यैवज आला नाहीं. राजश्री गंगाधर बल्लाळ बुंधले यास ठाऊक आहे. त्याजला आम्ही पूर्वी लिहिले होते त्याचे पत्र आम्हांस आलें कीं यैवज देवस्थळी याजकडे गेला नसिला तरी तुम्हास पाटऊन देऊं. देवस्थली याचे पत्र घेतले कीं, आपल्याकडे यैवज आला नाहीं म्हणून पत्र घेऊन मुजरद जोडीबरोबर त्याजकडे पाठविले आहे. त्याचे उत्तर आलें नाहीं याजकरितां ते आपणांजवळ आले आहेत तरि मशार-निलेजवल हें सांगोन यैवज हरतजविजीने उगऊन घेतला पाहिजे. नाहीं देत तरी आम्हांस सरकारचीं पत्रें घेऊन ब्राम्हण करून पाठवावा तेव्हां यैवज आपला उगवेल. यास्तव हे काम आपण केलेंत तरी यैवज आपणच दिल्हासा होईल. वारंवार लिहावें तरी आपली मर्जी खटी होईल. राजश्री गंगाधर बलाळ याचें आम्हांस उत्तर आलें आहे ते पाहिजे तरी आपले घरीं आहे पाठऊन देतों. त्याचे हातचा दस्तायैवज आहे कीं देवस्थलीयाचें पत्र आलें कीं यैवज आला नाहीं म्हणजे रुपये देवाल त्यास देऊं म्हणोन आलें. त्याजवरून देवस्थळीयाचें पत्र घेऊन कासीदजोडी याजकडे पाठविली आहे. कळावें. राजश्री कृष्णाजी राम लघाटे हे आपणासमागमें गेले. त्यास त्याचे घरीं खर्चावेंचाची अनुपत फार आहे. घरी बाइकास दुखणी जाहालीं आहेत. त्यास रोजगार नाहीं, तेव्हां घरीं खर्चास येणें कलतच आहे. त्यास अंतरवेदींतील महाल सुटले त्यांतून येका माहालची जफ्ती यास सांगोन च्यार रुपये कर्ज फिटे तो अर्थ करावा. आपलेहि नातलग जाहालेच आहेत. आपले लोकास इकडे जागा नाहीं म्हणोन त्या प्रांते गेले

आहेत. तरी सर्वांचे कल्याण आपले हातीं आहे. केल्यास ईश्वर आपल्यात येश देईल आणि हेच कीर्त राहेल. आम्हीं लिहिले म्हणोन रागास याल तरी आपण, सूज्ञच आहेत. येथील लोकास राजश्री हरिपंत तात्या आहे म्हणून गरीबगुरीबाची जाबसाल व कामें होतात. तिकडे आपण आहेत. राजश्री माहादाजीपंत आपल्या जवळ आहेत. आम्हीं राजश्री त्रिंबकराव मामाकडे राजश्री धोंडो नारायेण तवल- दाराचा कारकून ठेविला होता त्यास मामाजवळ मेहनत केली. त्याणी बोलाऊन अफ्तागिर दिल्हें; आणि राजश्री माहादाजीपंत यास आपण दिल्हे नाहीं, तेव्हा चाकरी केली नाहींसे वाटतें. असो, आपण देनितीलच. परंतु सूचनार्थ लिहिलें आहे. बहुत काय लिहिणें कृपालोभ केला पाहिजे हे विनंती.

¶*Ganesh Shankar writes to Baburaoji about the death of Gopalrao Govind Patwardhan and of the return of the Peshwa to Poona on account of his ill-health, the movements of the army in the Karnatak are also reported*

---

*No 224]* *[10-2-1771*

पौ छ ९ मोहरम

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
बाबूरावजी स्वामीचे सेवेसी

पोष्य लक्ष्मुमण नारायण देशमुख साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल तागायत छ २४ सवाल मुकाम पुणे येथास्थित असे विशेष. आपणाकडून सांप्रत पत्र येऊन वर्तमान कलत नाहीं तरी ऐसे नसावे. सदैव पत्रीं संतोषवीत जाणें. इकडील वर्तमान तरी श्रीमंत फौज तोफखानासमेत स्वारीस निघाले होते. त्यास मिरजेआलीकडे दरमजल गेले. तदनंतर प्रकृत थोडकीसी ठीक नवती. यास्तव दाहा हजार फौज व दाहा तोफा राजश्री कृष्णराव बलवंत व मल्हार जगजीवन यांजबरोबर देऊन मामाकडे कर्णाटकात रवाना केले. गणोबा नाईक रास्ते यास सातसें राऊताची सरदारी नवी सांगितली. त्यास होनगुंदे गुजारत सरकारात व्यावयाचें केलें आणि आनंदराव भिकाजी याजकडे कमाविसीनिं सांगितलें होतें. त्यास तेथें अमल * * * * * सालमजकुरी गणोबा नाईक

यास होनगुदे कमाविसींनें सांगोन घेऊन द्यावयाविसीं आपास सांगितलें होतें. आपानीं मोर्चे लाऊन होनगुदे घेऊन दिल्हे आणि पुढें मामाकडे गेले. मलवास माघारे आणविले ते आले. आपणांकडील बगाजीपंत व सदासिवपंत करमरकर गेले होते. सदाशिवपंत आपले वडिलास भेटावयासी जावयासी मलवाबरावर माघारे आले. कोकणांत गेले. खासा स्वारी माघारी फिरली ती माघ शुा पंचमीस पुण्यास आली. पाटणकर, निंबाळकर, दरेकर, मान्ये, घोरपडे इतके मानकरी यांस समजाविस नालबंदी साल मजकूरची पावली होती. त्यास फौजेस निरोप देविला. खाशास मात्र बराबर ठेविलें. नालबंदी पुढिले सालीं धरावी ऐसा मनोदय आहे. परंतु मानकरी लोक आईकत नाहीं. पुढें सिधातात काय ठरेल तें पाहावें. दीड हजार फौज बराबर ठेविली आहे. विसाजी केशव अरमार सुधा तयार होऊन बिदनुरचे रोखें जात आहेत मामाहि बिदनुरचे रोखें येत आहेत. आपाजी राम वकील हैदर नाइकाकडील येथें आहे. जाबसाल येतात जातात. परंतु कांहीं निकालाचा जाबसाल पडत नाहीं. हैदर नाईक पटणांत आहे. श्रीमंताचा प्रताप थोर आहे. मनोदयानरूपच घडेल. मुंबईस इंग्रजानें तयारी केली आहे, कोणीकडे मुसाडी देईल हें नकळे. यास्तव साष्टीस गोविंद सिवराम व कांहीं फौज व गाडदी पाठविले आहेत. श्रीमंताची * * * आहे. बालकोबा तात्या व आबा फडके व विष्णु विश्वनाथ देवडीचे मृत्य पावले. स्त्रिया राहिल्या. चांगले माणूस गेले. गोपाळराव मिरजेस खासा आले होते ते व गणेशपंत रास्ते याजकडील कर्णाटकांत मृत्य पावले. मातवर माणूस गेले. आपणास कळावें म्हणोन लिहिले आहे. बहुत काय लिहिणे. कृपा कीजे हे विनंती.

¶*Lakshman Narayan Deshmukh writes to Baburaoji giving news about the illness of the Peshwa during the course of his march to the South. The Peshwa cancelled his programme and sent his forces to join Trimbakrao under Krishnarao Balwant and Malhar Jagjivan. Deaths of prominent persons are also referred to.*

---

*No. 225]* *[March 1771 ?*

## श्रीशंकर

सेवेसीं त्रिंबकराव विस्वनाथ कृतानेक नमस्कार विज्ञापना. पत्रीं आज्ञा कीं, राजश्री सखारामपंतीं तुम्हास गुरूमकुंड्याचे तालुक्याविसीं पुसलें होतें कीं हलीं

तेथें राजश्री बाजी रघुनाथ तुम्हांकडून आहेत ते लाख दीढ लाख रुपये र देतील कीं कायं ? तुम्हीं उत्तर केलें कीं सरकारचे काम इतबारानें मात्र कर चाकरी करितील. आगाऊ पैका देऊन मामलत करणार नाहीत. त्यास हा दीड लक्ष रुपये रसद देऊन मामलत करणार उभा राहिला, त्यास मामल सांगणार, तुम्हांस कळावें म्हणून लिहिलें, ऐसी पत्रीं आज्ञा. त्यास ज्य गोष्टींत सरकारचा नफा आणि मामलतीचा बंदोबस्त ते गोष्ट करावी. त्याम आमचे निसबतीनें बाजी रघुनाथ तेथें ठेविले, त्याविसीं आम्हीं सरकार उपयोग लिहिलें तर तें प्रमाणांतहि येणार नाहीं, तेव्हां लिहिणेहि ठीक नव्हे; परंत गुरामकुंडा गेल्यावर मागती कोणे श्रमानें आला ते विदित असतां लिहिणे कशास सरकारची जागा इस्तावा सालेसाल बांधोन दिल्हाच आहे, त्याप्रमाणें जमाहि आकारावी. जमेत नुकसान न यावें. जागा जतन करून खर्चांत करार करून सरकारांत पैका देऊन निभावणी झाल्यास रसद घेऊन मामलत सांगावी हे उत्तम. प्रस्तुत दरबारची चाल भलत्याचे मामलतीवर भलत्यानें उभें राहावें, सिबंदी तोडून खर्च कमी करावा, जागा जतन होणे ते खावंदाचे कपालावर मागे गमाविली त्यांचे पारपत्य कोणी केलें ? पुढें गेली तर कोण करितो ? कची जमा मात्र नाकर्तेपणे कमीही जाली तरि कची समजाविली हा मात्र गुण. मग फाजिल सरकारांत जाले तर मखलासी वगवसिला असल्यास होतच आहे. मग चिंता काय ? आंज आम्हीं लिहिणें अनुचित. तथापि खावदाचेंहि आम्ही यैसे आम्ही आपले मनांत आणून वर्तनूक करितों. याकरितां मात्र लिहिलें. आम्हांस वरें वाईट करावें न करावें कोणी पुसेल तर बोलावें, ते नसतां लिहिणे हेहि अनुचित; परंतु वर्षा दो वर्षी निदर्शनास येईल ते अगोधर सेवक लोकीं सुचवावें, त्याहावें हा मात्र सेवाधर्म म्हणून लिहिलें. येरवी बदोवस्तानें खर्च होऊन राहिले. लाख पनास हजार रुपये तर तेही पोल्यास अखेर सालीं येतील. गुदस्तां पाऊण लक्ष रुपये त्याणी खर्च वेंच इमारत करून आणून दिल्हेच होते, पुढेंहि देतील; परंतु त्या गोष्टी पसंद नसतां लिहिणें अनुचित हेच खरें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Information was sought from Trimbak Vishwanath whether the agent appointed by him at Gurumkonda was prepared to pay one and a half lakhs. In case of the latter's inability the Peshwa would consider transferring the Taluka to another candidate who would agree to the sum. Trimbakrao Vishwanath sends a spirited reply that the place has been reoccupied at a great sacrifice and considerations of money must not be allowed in the assignment of such an important outpost. The whole letter is in Trimbakrao's hand.*

6480

नकल

श्री

श्रीमंत राजश्री रावसाहेब
स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक त्रिंवकराव विश्वनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ताा छ २२ जिलकाद मुाा मोतीतले नजीक श्रीरंगपटण तीन कोसपावेतो स्वामीचे कृपेकरून वर्तमान येथास्थित असे विशेष. स्वामीच्या आज्ञेप्रो टुमकुराहून कूच करून हेबुरावर आलो, तो हेदरखान सात आठ हजार फौज व पंचेतालीस तोफा व पंधरा हजार गाडदी व बारवाले फिरंगी यासिवाये करनाटकी प्यादे वगैरे बेमवल्ग वाण घेऊन मोठे तरतुदीने मागडीवर आला. चोरी छपीने सरकारच्या फौजेवर छपा घालावा याअर्थे येका दोन वख्त तयार होऊन यावयाचा विचार केला. येकदा तर तीन कोस निघोन आला. हजार दोन हजार दिवटीचे पोत करून बैलाचे सिंगास बाधून लस्कराकडे पिटावे, त्या रोखे आमच्या फौजेनी जावे आणि आपण निराळेच येऊन गोटावर पडावे इत्यादिक मायावी कर्तुत्व. आमच्या तर वातम्या जागा जागा बारीक बारीक होत्या. वातमी येऊन पोहचताच येकदा तर फौजेची तयारी करून गोटाबाहेर जाऊन उभे राहिलो. त्यास वर्तमान कलताच माघारे जाऊन मागडीच्या रानात आवलून राहिला. आम्ही कूच करून त्याचे समोर भैरवदुर्गाजवल येऊन हेबुराजवल येक दोन मुकाम केले. हैदरखान विदनुरच्या झाडीत सिरल्यानंतर मग आम्हास झाडीत सिरो देईल हा भरवसा न पुरे. याअर्थे विदनूरचा रोख सोडून तुरविकिन्यावर आलो. तो हैदरखान मागडीच्या झाडीतून निघोन नागमंगलावरून मेलकोटे देवाचे स्थल चौफेर विकट जागा त्याच्या आश्रियास येऊन राहिला. ते वातमी आम्हास कलताच सडी फौज करून राजश्री कृष्णराव वलवंत याजवरावर राजश्री सखराम हरि व नीलकंठराव थोरात व भवानजी वाग व महिमाजी मु(ढे) व अंतोजी माने, दोरगे, निगडे मंडली वगैरे फौज देऊन राा केले. त्यास सखाराम हरि व निलकंठराव थोरात व भवानजी वाग व महिमाजी मुढे व आंतोजी माने व दोरगे व निगडे मंडली पुढे गेले. तेव्हा हे वर्तमान त्यास कलताच हैदरखानाची हजार दीड हजार फौज गोट सोडून गोटापुढे आली होती त्याजवर चालून घेतले. मागे उपरालियास कृष्णराव होते. तेव्हा हैदरखानाचे फौजेस उधलून मारीत मारीत गोटात नेऊन घातले. आडीच तीनसे हैदरखानाचे घोडे पाडावा करून आणिले, तों हैदरखानानी तोफा, गाडदी पुढे घालून तोफाची व वाण, जेजालाची मारगिरी फार केली. ते

6481

सातताच्या वार्डातून रा मारा गिरमाजी कारकून सरकार याणी लिहिले, तरी तुम्ही जंजिरे विजयदुर्ग येथे जाऊन आरमारची तयारी जलदीने करून सर्व साहित्य आरमारावर चढऊन आरमार सिलेपोस दर्यास तरते करून जंजिरे मजकुरच्या माडावर खबरदार राहाणे. हेदराचे आरमाराची बातमी दुरुस्त राखणे. सरकारचे आरमार बान्यावर खबरदार राहिल्याचे वर्तमान वरचेवर हुजूर लिहीत जाणे. हुजरून आज्ञा होईल तदोतर आंग्रा करणे. तोपर्यंत जजिन्यासमीपच राखणे. जाणीजे छ २८ सावान बहुत काय लिहिणे.

*¶The Peshwa instructs Janoji Dhulap to keep the fleet under him ready as Haidar's fleet under the command of Raghoji, the rebel son of Tulaji Angria, was reported to be heading towards Vijaydurg*

---

[2-4-1772

No. 232]

पौ छ २९ मोहरम सन
इसने. चैत्र वद्य १२ बुधवार

श्री

राजश्री हरबाजीराव धुलप सुभेदार गोसावी यांस

अखंडितलक्ष्मीआलकृत राजमान्य स्नो चिमणाजी रामचद्र आसीर्वाद विनंती उपरी. येथील कुशल तागायत छ २० माहे मोहरम जाणून स्वकीये लेखन करीत असिले पाहिजे विशेष. आपण पत्र पाठविले ते पावले. लोक तूर्त सिडलगटेकर कानडे आसामी पाठविले ते आज येथे पावले. नरसिह नाईक सिडलगटेकर येथे होता याणें इमानेइतबारे चाकरी नेमिल्या जागे उत्तम प्रकारे केली. आता मोबदला लोक आले, तेव्हा मशारनिलेस लोक सुद्धा तुम्हाकडे पाठविला आहे; येऊन पोहोचेल. नरसिह नाईक याचा येक आसामी तेथें मयत जाला. बाकी येकोणीस आसामी माघारे पाठविले आहेत. तुम्हास कलावे. बाकी लोक लौकर पाठऊन द्यावे येविसीं पाच च्यार वेला लिहिले आहे त्याप्राणें लोक सत्वर पाठऊन द्यावे. पहिले कानडे पलत होते. त्याचे पारपत्य चागले [illegible] कानडे पलत नाहीं. हालीं मावले तटाचे तटावरील

No. 230] [15-6 ·

पाा छ ७ राविल.

श्री

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य-
राजश्री सखाराम हरि गोसावी
यासी

श्री माधवराव बलाल प्रधान आसीर्वाद सुहूर सन इसने सबैन मया व अलफ. तुम्हास निरोप समई रस्तेविसी सागणे त्याप्रकारें सागितलें असतां तुम्ही सिरे प्रांती स्वस्त जाऊन बसला. हे इकडे मनसुब्याचे तोड लागले असता या दिवसात लस्करात माहागाई फार. तीन सेरप्रमाणे दाणे मिलत नाही असे असता या दिवसात तुम्ही मेहनत करून रस्त आणून पोहचवावी ते न जाले. हे गोष्ट मनसुब्याचे प्रकारें तुम्हापासून चुकोन गेली. असो. याउपरी पत्रदर्शनी वीस पंचवीस हजार रस्तेचे बैल घेऊन तुम्ही दरमजल येऊन पोहचणे. गरूडगिरीकडील गुंता उरकलाच असेल. अतःपर येक घडीचा विलंब न करितां रस्त घेऊन हुजूर येऊन पोहचे ते करणे. तुम्ही तुरविकीरा याचे सुमारे लस्करापासून येक मजल दाहा बारा कोसावर राहाणें. आधी जरूर लौकर लिा-प्रकारें करणे. जरूर जाणोन लिा असे. जाणिजे छ १ रावल. बहुत काय लिहिणे.

¶*The Peshwa gives a sharp reprimand to Sakharam Hari for not arranging timely supplies for troops acting in the campaign and asks him to send them at once.*

---

No. 231] [6-12-1771

पाा छ १८ रमजान
मार्गसीर्ष वद्य ९ पंचमी

श्री

राजश्री जानोजी धुलप गोसावी यांसी

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य-श्री माधवराव बलाल प्रधान आसीर्वाद सुा इसने सबैन मया व अलफ. रा तुळाजी आगरे याचे मूल हैदर नाइकाकडे गेले. त्यापैकीं राघोजी आगरे याणी हैदर नाईक याचे आरमारची सरदारी कबूल करून हैदर नाईक याचे आरमार पाल २ दोन व गुराव ९ नव सिलेपोस तयार करून सदाशिवगडास आले. पुढें येऊन उपद्रव करावयाची उमेद राखतात,

सावताच्या वार्डातून रा मोरो गिरमाजी कारकून सरकार याणी लिहिले, तरी तुम्ही जंजिरे विजयदुर्ग येथे जाऊन आरमारची तयारी जलदीने करून सर्व साहित्य आरमारावर चढऊन आरमार सिलेपोस दर्यास तरते करून जंजिरे मजकुरच्या वाडावर खबरदार राहाणे. हैदराचे आरमाराची वातमी दुरुस्त राखणे. सरकारचे आरमार बाऱ्यावर खबरदार.राहिल्याचे वर्तमान वरचेवर हुजूर लिहीत जाणे. हुजरून आज्ञा होईल तदोतर अज्ञिप्रा करणे. तोपर्यंत जंजिऱ्यासमीपच राखणे. जाणीजे छ २८ साबान बहुत काय लिहिणे.

¶*The Peshwa instructs Janoji Dhulap to keep the fleet under him ready as Haidar's fleet under the command of Raghoji, the rebel son of Tulaji Angria, was reported to be heading towards Vijaydurg.*

---

[2-4-1772

*No. 232*]

पो छ २५ मोहरम सन

इसने. चैत्र वद्य १२ बुधवार

**श्री**

राजश्री हरबाजीराव धुलप सुभेदार गोसावी यांस

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो चिमणाजी रामचंद्र आसीर्वाद विनंती उपरी. येथील कुशल तागायत छ २० माहे मोहरम जाणून स्वकीये लेखन करीत असिले पाहिजे विशेष. आपण पत्र पाठविले ते पावले. लोक तूर्त सिडलगटेकर कानडे आसामी पाठविले ते आज येथे पावले. नरसिह नाईक सिडलगटेकर येथे होता याणें इमानेइतबारे चाकरी नेमिल्या जागे उत्तम प्रकारे केली. आता मोबदला लोक आले, तव्हां मशारनिलेस लोक सुद्धा तुम्हांकडे पाठविला आहे; येऊन पोहोचेल. नरसिह नाईक याचा येक आसामी तेथें मयत जाला. बाकी येकोणीस आसामी मावळे पाठविले आहेत. तुम्हास कळावे. बाकी लोक लौकर पाठऊन द्यावे येविसीं पाच च्यार वेळा लिहिलें आहे त्याप्राणें लोक सत्वर पाठऊन द्यावे. पहिले कानडे पळत होते. त्याचे पारपत्य चागले पळाल्याचे जाल्यावर आतां कानडे पळत नाहीं. हाली मावळे तटाचे तटावरील रात्रीचे पळोन जातात. कानड्याचे कोणत्या प्रकारें पारपत्य केला असेल त्याप्रमाणे मावळ्याचे करावे. ही गोष्ट धन्यास कळल्यावर कोठवर जाईल ? न कळता प्रकार आपणास कोणता आहे ? आपल्या लोकाचे कोणत्या रीतीने चालवितों त्याचा अर्थ राजश्री बळवंतराव मल्हार याणी सागितलाच असेल. तुम्हांकडील मावळ्यानी अबरू सोडिली इतके लिहिले म्हणून रागास न यावें. कारभार सरकारचा

6489

यास्तव दराऊन लिहिणें लागलें व वरोब्याचा अर्थ यास्तव साध्यांत ल्याहावें लागलें. अत:परी पलोन गेल्या लोकांचे पारपत्य करून त्यांसच इकडे पाठवावे, वहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

¶*Harbaji Dhulap is advised not to spare deserters but to enforce strict discipline among his men if he does not want to incur the displeasure of the Peshwa.*

---

*No. 233]* *[7-5-1772*

## श्रीशंकर

+सेवेसी विज्ञापना. ता। छ २ सफर मु॥ नर्जीक चेनरायेपटण येथे असो विशेष. स्वामींचे आज्ञापत्री तर वनेल तसा सलूखच करावा. कारण कीं तिसरी छावणी पडेल. दोन छावण्यामुले मवलग पै॥ खर्च जाला. हिंदुस्थानातूनहि पैका न आला. व तुम्हाकडीलहि मसलत सेवटास न गेली. याउपर पैका पाठवणे वनत नाही तर निदान पन्नी पंचवीस लक्ष रोख, वाकी पंचविसाची पका निशा न होवे तर जातीचा दस्ताऐवज हैदरनाइकाचा लिहून घेऊन नंदीगड, चिकवालापूर, ता। किलेमुधा व मिडगिसी आदीकरून सर्व किले मुलुक सोडून देऊन सलूख करणे येसे साफच येके पत्रीं लि॥. तेच प्रमाण मानून त्याच अन्वये पचवीस लक्ष रोख व जवाहीर व हती यासिवाय सा लक्षाचे म्हणजे तिही लक्षाचा माल येकून येकतीस व्यावे. तूर्त वाकी येकूणीस लक्ष राहिले ते वर्षांत तिही मुदतीनी दर सा लक्ष तेतीस हजार याप्रा। दस्तऐवज वाहादराचा लिहून घ्यावा. नावास श्रीरंगपटणातील सावकार आहेत त्यांचे रोखेहि घ्यावे ते पकी निशा नव्हे. वाहादराचा रोखा तोच खरा, याप्रा। ठराऊन ऐवज पर्दर घ्यावयास सरकारचे पोतेनीस व पोतदार ऐसे राजश्री राव सेनापति व राजश्री लक्षुमणराव रास्ते उभयता मोती-तलावावर फौजसुधा राहावयास गेले त्यावा। दिल्हे. सोडचिठ्याहि किल्याच्या सेनापतीवा। दिल्या. आज्ञेप्रा। येथवर मजकूर आला तो विदित व्हावा याकरिता लिहिला असे. हा तह दोन वर्षे मेहनत केल्यासारखा न जाला. नंदीगड, देवरायदुर्ग, चिकवालापूर, गुडीबिंडा, मिडागिसी ही स्थले स्वामींचे प्रतापे खासा-स्वारीचे येणे जाले त्या साली व येक दोन आलीकडे घेतली ही पुन: येणे कळतच आहे. आपला तालुका आर्धाच थोडा, त्याचे संनिध हे जागा. याउपर पके बांधून करील तेव्हा समयोचित सरकारचे जाग्यास दगाच जाणावा. लोकिकातहि

+ सदर पत्र त्र्यंबकराव मामाच्या हातचें आहे.

चांगलेंसे न दिसले व येथे आम्हीं चौघे आहो यांसहि समर्पक न वाटले, परंतु तिसरी छावणी कसी होते? फौज दो छावण्यामुळे खराब जाली. इतकेहि निभावेल. स्वामीचा प्रताप तसाच आहे, परंतु मुख्यत्वेंकरून स्वामीचे शरीरी सावकाश नाहीं हेच चिंता मोठी ईश्वरे निर्माण केली. त्या वर्तमानावरून शत्रूने वोढ धरून पके निशीचा पंचविसा लक्षाचा करार असतां लवाडीस येऊन हैदर वोलू लागला. सेवटी आज्ञेचे अन्वये कबूल करून लिहिले प्रकारे उरकावेसे केले. परंतु सेनापति व रास्ते मध्यस्त खरे, परंतु तेहि खटेच कीं, स्वामीचे शरीरी आरोग्य असंत तर पंचवीसच घेऊन करारास कां फिरलास हे निमित्य ठेऊन छावणीहि करून हेच पंचवीस पोटास खाऊन किले न देतां पारपत्यहि करितो, परंतु उपाय नाही. ईश्वरे मोठे कालजींत आम्हा सर्वास घातले. यामुळे लाचार जालो. त्यास कराराप्रा बहुतकरून निर्गमात येईलसे वाटते. याउपर हे येकूणीस येणे. विकृत सवंछरपर्यंत ठराव पौ बाकी खरसंवछर होऊन गेला. त्याचे येणे पंधरा. नंदन संवछर लागला याचे पंधरा. येकूण तीस लक्ष आणि येकूणीस, येकूण येकूणपनास लक्ष. बाजबीज येणे. हे विना फौज आल्याखेरीज हैदर देणार नाही, तेव्हा मागती मोहीमच दिसते. मग दिल्हे जागे येणे, शत्रू जर्वेत येणे कठीण. त्यापेक्षा पंचवीस रोख पदरी पडतांच मातबर जागे न सोडावे. लबाडासी लबाड बोल्याचे पाप नाहीं. स्थले हाती असल्याने लौकर जरबेत येऊन येकुणपनास लक्षाचा निकाल येकेच वर्षात मेहनत केल्याने होईल हाहि येक विचार, परंतु स्वामीस आरोग्य त्यापक्षी सर्व घडेल. नाही तर तिकडील वर्तमानावरच फिरोन लबाडीच्या गोष्टी बोलतो, कालहरण करून पाहातो येवढेच संकट. तथापि प्रसंगोचित स्वामीस सुचवावे त्याहात्रे या आशये रास्ते व सेनापतीचे मनातील भाव घेऊन कोणासहि नच कलतां सेवेसी जलद लिहून पा॥ असे. श्रीचे कृपेने आरोग्य आणि मर्जीस आल्यास उतर अति सत्वर आले तर जागे त्याचे हाती न गेले त्या पूर्वीच उतर पोहचल्यास होईल. परंतु सर्व समर्पक लिहून छावणी होऊन येक वर्ष मोहीम जाली, पा॥ उगाच येक पक्ष अवसर जानोन लि॥. मर्जीस कालदेश जाणोन न आल्यास योजिल्या प्रा॥ जागे देऊन सलूख होतच आहे. उतर कसे ते लौकर यावे. हे विज्ञापना.

¶*Trimbakrao Pethe solicits the Peshwa's advice regarding the policy to be adopted towards Haidar. Reports of the Peshwa's illness had considerably modified Haidar's attitude and emboldened him to infringe some of the articles of the treaty signed last year. Trimbakrao asks whether the treaty should be adhered to or whether they should renew the conflict. The letter is a pathetic commentary on the increasing illness of the Peshwa as he was at this particular moment the nation's main-stay.*

6191

आपले लाकानसी.आपले जागा खबरदारी केली आहे. इकडील लोकहि आपलाले जागा खबरदार आहेत. ज्या तलावर होते त्याच तलावर सर्वत्र जेथील तेथेच आहेत. किंचित वक्रता रो वामनराव यांजवर दाखविली होती. हीं कालवर जेथील तेथे येथास्थित आहेत. चौ पांचा रोजांत कूच होऊ सकेल, तर कूच करूण इकडे यावें हाहि विचार आहे. हयेदर ना(इ)काकडील यैवजाची मार्गप्रतीक्षा आहे. चौरोजांत यैवज येणार म्हणून वार्ता आहे. या दिवसांत मुल्याची प्रकृतींत भ्रम व हवालदील आहे. घटिकेत काही, घटिकेत काहीं, येसेहि यैकतो.

¶*A report from the Maratha Camp in Karnatak says that Raghunathrao, since getting intelligence of the plot hatched against him in Poona, is taking every means to strengthen his position. The news has so upset him that he is reported to have lost balance of mind.*

# Index to Selection No. 37

## *Karnatak expeditions of Madhavrao I (1761–1772)*

(N.B.—Figures denote numbers of letters)

B—*concld*



C



D



E



G

## H

L—*contd*



M—*contd.*

M

## N



## N—*contd*



## P



## R

R—*contd.*



S



S—*contd.*



T

T—*contd.*



U



V



V—*contd.*



W



Y